# जैमिनीअश्वमेध-कथासार

अथवा

## जैमिनीअश्वमेध ग्रंथांतील सुरस गोष्टी.

लेखक-हरि विठ्ठल वावडे.



प्रकाशक-

बाळकृष्ण लक्ष्मण पाठक, बुकसेलर,

मोतीबाजार-मुंबई.



किंमत १। रुपया.

# प्रस्तावना.



श्रीव्यासांनीं रचलेलीं पुराणें संस्कृत भाषेंत असल्यामुळें त्यांचा अर्थ भाविक जनांस कळत नव्हता; ह्मणून श्रीधर, महिपती, शिवदास, गोमा आदि कवींनीं त्यांच्या आधारें रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप, काशीखंड, भक्तिविजय, शिवलीलामृत, रामाश्वमेध, जैमिनी अश्वमेध, इत्यादि प्राकृत ओंवीबद्ध ग्रंथ निर्माण केले. त्यांच्या सुलभ अर्थाचीं कांहीं कथासार पुस्तकें छापिलीं गेलीं आहेत. त्याचप्रमाणें हा 'जैमिनी अश्वमेध' सरळ गोष्टीरूपानें तयार करवून आबालवृद्ध स्त्रीपुरुषांच्या वाचन कर्मणुकीकरितां सादर केला आहे. त्याची चवथी आवृत्ति लौकर संपल्यामुळें ही पांचवी आवृत्ति छापिली आहे. त्याचा सर्वांनीं लाभ घ्यावा.

यांत पांडवांनीं कौरवांस मारल्यामुळें त्यांस गोत्रवधाचें पाप घडलें. त्याच्या निरसनार्थ श्यामकर्ण सोडून अश्वमेध यज्ञ केला; त्या बद्दलच्या जैमिनीनें जन्मेजय राजास सांगितलेली कथा वर्णन केली आहे.

प्रकाशक.

श्रीशंकर प्रसन्न.

# श्रीजैमिनीअश्वमेधकथासार.

## मंगलाचरण व अश्वमेधकथन.

हे सर्व विद्यांच्या अक्षयसदना, विघ्ननाशका गणराया, तुला माझा नमस्कार असो व मयुरवाहनी हंसगमनी सरस्वती देवी, तिला मी वंदन करितों. जे ब्रह्मांड कपित्थनगरीं राहणारें कुळदैवत सिद्धनाथ त्याला माझें नमन असो. तसाच जो आत्मज्ञानी सद्गुरु महाराज त्यास नमस्कार करून प्रार्थना करितों कीं, मला ग्रंथ कथा वदविण्यास स्फूर्ति द्यावी.

आतां वक्ता श्रोतेजनांस विनंति करितो कीं, जो नारायण अवतार व्यासमुनी, त्याचा शिष्य जैमिनी त्यानें महाभारतांत अश्वमेधपर्वांत अश्वमेधकथा वर्णन केली आहे, ती मी तुह्मांस सांगतों ती श्रवण करावी.

एकवेळीं परिक्षितीनंदन जैमिनास ह्मणाला—हे मुनिवर्य, धर्मराजानें अश्वमेध केला ती कथा मला कथन करावी, तेव्हां जैमिनी ह्मणाला—राजा! तूं धन्य आहेस, तुझें भाग्य थोर ह्मणूनच मला श्रोता मिळालास तरी सांगतों ऐक. धर्मराजानें स्वधर्मानें राज्यकीर्ति संपादिली होती, श्रीकृष्ण भगवान् नेहमीं त्याच्याजवळ असत. अशा त्या शुद्ध व पवित्र धर्मराजानें हयमेधाच्या मिषानें यज्ञ करण्यास आरंभ केला. तो हस्तनापुरांत राज्य करीत असतां, त्याच्या मनाला गो-

त्रजवधाची चिंता उत्पन्न झाली. त्यास राज्यभाग वगैरे न आवडून मन भ्रमानें वेड्यासारखें झालें. इतक्यांत तेथें भीम आला, त्याला गोत्रजहत्त्येबद्दल विचार पुसूं लागला; तोंच तेथें अकस्मात व्यासमुनि आले; त्यांस पाहतांच धर्मानें चरण वंदून यथोक्त पूजन केलें. मग नम्र वाणीनें हात जोडून ह्मणाला-महाराज, ब्रह्महत्यादि दोषांचे निरसनार्थ कांहीं उपाय सांगावा. माझे दिव्य नेत्र भीष्म व द्रोण होते, ते नसल्यामुळें मी अंध बनलों आहें. यामुळें या राज्यास धिःकार असो. श्रीकृष्णानें मला बोध केला परंतु हृदयमंदिरांत शोकाग्नि जाळीत आहे, तरी आतां भीमसेनास राज्य देऊन तिर्थाटनास गेल्याशिवाय मी पावन होणार नाहीं. असें ऐकून व्यास ह्मणाला-राजा! तूं निष्पाप असतां पापी ह्मणवून कां घेतोस? तूं मायाभ्रमानें भुलला आहेस ह्मणून पापपुण्यकर्ता ह्मणवितोस. यास्तव अश्वमेधयज्ञ कर. ह्मणजे निष्पाप होशील. त्वां कृष्णाच्या मतानें युद्ध करून राज्य जोडलेंस तें टाकीन ह्मणशील तर स्वधर्म, पुण्य व धन बुडविशील. तरी आतां न भितां धैर्यानें बंधुवर्ग, यादवांसह श्रीकृष्ण यांच्या साह्यानें अश्वमेध करून इहलोकीं कीर्ति व परलोकी सुसंपत्ती संपादन कर.

व्यासाचें वचन ऐकतांच धर्म ह्मणाला-स्वामी, आपलें वचन यथार्थ आहे. परंतु मजजवळ द्रव्य नाहीं. प्रजेजवळून धन घ्यावें तर दुर्योधनानें त्यांस पीडा दिली. राजांपासून मिळवावें तर ते युद्धांत निमाले. धनाशेनें मी मेदिनीस पीड-

णार नाहीं. व्यास ह्मणाला-राजा पूर्वी मरुत्त राजानें यज्ञ करून ब्राह्मणांस द्रव्यानें तृप्त केलें. ते द्रव्य टाकून गेले, तें धन आणून अश्वमेध कर. धर्म ह्मणाला-तें ब्राह्मणाचें द्रव्य आणल्यावर मला श्रीरंग अंतरून जग हांसेल आणि ह्मणतील कीं, आमचेंच द्रव्य आह्मांस दिलें. ह्मणून ब्राह्मणाचें द्रव्य हें त्रैलोक्यांतील एक विष आहे. यास्तव त्या द्रव्यानें यज्ञ करणें योग्य नाहीं.

व्यास ह्मणाला-राजा, तूं धन्य आहेस. तरी धर्मशास्त्राचें वचन ऐक. जेव्हां त्या ब्राह्मणांनीं धनाचा त्याग केला तेव्हांच ते ब्रह्मत्वास मुकले; तें आणल्याबद्दल दूषण नाहीं. पहा परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय करून यज्ञांत विप्रांस दान दिली, त्यांच्यापासून दैत्यांनीं हरण केली; मग ती आतां राजे कां भोगितात ? ह्मणून तें द्रव्य आणून यज्ञ करा. धर्म ह्मणाला-ब्राह्मणांची संख्या किती असावी ? दक्षिणा किती द्यावी? व अश्वाचें लक्षण कसें असावें ? व्यास ह्मणाला-ब्राह्मण वीस हजार, गज रथ घोडा एकेक, एक हजार गाई, रत्नें एक शेर व कनक एकेक मण अशी दक्षिणा द्यावी. अश्व शुभ्र, पुच्छ पिवळें, श्यामकर्ण, अकुंठित गमन करणारा असून चैत्री पौर्णिमेच्या दिवशीं सोडून एक वर्ष रक्षावा. स्वतः भोग वर्ज्य करून असिपत्रव्रतानें राहावें. पत्नीसह शयन करून इंद्रियदमनानें एक वर्ष रहावें; जेथें अश्व मलमूत्र करील तेथें एक हजार गाई दान द्याव्या, हवन करून द्रव्यानें ब्राह्मण तोषवावे. अश्वाचें पूजन करून स्वनामाचें

सुवर्णपत्र मस्तकीं बांधावें. व्रतासह अश्वमेध केल्यानें अगाध पुण्य जोडतें. इंद्रानें शत यज्ञ केले पण इंद्रियदमन न झाल्यामुळें व्रत विपरीत झालें, यास्तव मदनास जिंकिलें पाहिजे. भीष्म, कार्तिकस्वामी, शुक व हनुमान् यांनीं मदनाचें मर्दन केलें. जर मदनविजयशक्ति तुझ्या आंगीं असेल तर हें व्रत कर.

असें ऐकून धर्म भीमास ह्मणाला—तूं व्यासवचन ऐकलें आहेसच, तरी अश्वसाधन व याग होणें कठीण आहे. मग व्यासास ह्मणाला—श्रीकृष्ण जवळ नसल्यामुळें मी संकटांत आहें. तव्हां भीम ह्मणाला—राजा, तूं देहलोभानें भ्रांतींत आहेस. श्रीकृष्ण जवळ असतां हें काय बोलतोस ? यज्ञावांचून स्मरणमात्रानें तो पावन करील. आह्मीं बंधु साह्य असतां चिंता कां करितोस ? कुंतीउदरीं नरकेसरी जन्मलों आहों तरी रिपुगजांचें विदारण एका क्षणांत करूं ! नंतर अश्वरत्न कोठें आहे ह्मणून व्यासांस विचारतांच, त्यांनीं सांगितलें—येथून चारशें कोसांवर भद्रावती नगरींत यौवनाश्व राजाचे मंदिरांत श्यामकर्ण आहे. त्याचें दहा अक्षौहिणी सैन्यासह रक्षण करीत आहे. तेथें वाऱ्याचेंही गमन होणें कठीण. तो तुह्मांस मिळणें मुष्कील आहे. असें ऐकून भीम हांसून धर्मास ह्मणाला—आतां तुह्मीं सर्व चिंता सोडून द्या. मी श्रीकृष्णास हृदयीं धरून अश्व घेऊन येतों. पुढें, तिघे वीर घोडा आणावयास भद्रावतीस जातील.

# अध्याय २ रा.

## भीमाचा पण व धर्मकृष्णसंवाद.

नंतर भीम धर्मास ह्मणाला—मी एकटाच भद्रावतीस जाऊन यौवनाश्व धरून घेऊन येतों. मी जर अश्व न आणीन तर मातृपितृहत्यारी जनाचें पातक मला घडेल. धर्म ह्मणाला—भीमा ! त्या बलाढ्य यौवनाश्वापुढें तूं जातों ह्मणतोस, परंतु मला चिंता वाटते. इतक्यांत वृषकेतु भीमास ह्मणाला, तुला एकट्याला जाणें शोभत नाहीं. जसा श्रीरामानीं लक्ष्मणास, बरोबर नेला तसा मला बरोबर घेऊन जावें. धर्म ह्मणाला, तुझ्या पित्याला आह्मीं रणांत वधिला, तेव्हांपासून तुला पाहतांच आह्मांस लज्जा वाटते. जो रणांत दानांत शूर त्याचा आह्मीं संहार केला, त्याच्या सकुमार कुमारास संग्रामास कसा नेऊं ? वृषकेतु ह्मणाला—तुह्मीं त्याचेवर उपकार केलेत. पापसागर शोषून मुक्तीचें मंदीर दिलेंत. तो दुर्योधनाचा सेवक होऊन धर्माचा द्वेष करीत होता. जरी दानशूर झाला तरी कृष्णविन्मुख दान निष्फल होय. ह्मणून त्याला निजपदास नेलात हें योग्य केलेंत; त्याची मला मुळींच खंती नाहीं. त्याच्या अवगुणामुळें कांहीं अपकीर्ति राहिली आहे ती मी युद्धकाळीं हरण करीन आणि पुत्रपणाची रीत दाखवीन. असें ऐकतांच भीमानें संतोषून त्याचें चुंबन घेतलें. त्याचें तें वचन धर्मानें ऐकतांच अश्रुपात टाकून

ह्मणाला, तुझें अनंत रक्षण करो. नंतर भीम वृषकेतूस ह्मणाला–चल मजबरोबर, अश्वरत्न आणून धर्मवासना पूर्ण करूं. मग मेघवर्णास सांगितलें, तूं धर्मसदन रक्षण करून व अर्जुनसेवा करून नगराचें रक्षण कर. मेघवर्ण ह्मणाला– माझी उपेक्षा कां करितां ? मला बरोबर न्यावें. घागरींत अगस्ति जन्मला, त्यानें समुद्र गिळिला; पण तो कुंभाचा गुण नव्हे, रेताचा गुण होय. तशी माझी जन्मभूमि हीन आहे पण बीज तुह्मीं समर्थ आहां; यास्तव वंशामारखा संग्रामांत पराक्रम दाखवीन.

अशा प्रकारें भीम व मेघवर्ण यांचें भाषण झाल्यावर निघांनीं जावें असा निश्चय केला.तेव्हां धर्मानें भीमास सांगितलें–व्यास उद्योगास जात आहेत त्यांस मार्गस्थ करावें. मग धर्मानें व्यासांचें यथोक्त पूजन करून आशिर्वाद घेतला व व्यास स्वस्थानीं गेले.

इकडे धर्म चिंतेत पडून विचार करूं लागला कीं, आह्मांस संकटीं तारणारा मुरारी द्वारकेंत आहे. मग याग सिद्धीस कसा जाईल ? असें मनांत आणून श्रीकृष्णाचा धांवा केला. तो ऐकतांच भक्तकैवारी स्त्रीशयनादिक टाकून तांतडीनें निघाला. त्यास पाहतांच आदिशक्ति घाबरून ह्मणाली–कोणता भक्त संकटांत पडला आहे ह्मणून जाणें झालें ? श्रीकृष्ण चरणचालीनें रात्रींत जाऊन महाद्वारांत उभे राहिले आणि द्वारपाळास आल्याचें वृत्त कळविण्यास सांगितलें. द्वारपाळास कृष्णमूर्ति पाहून आनंद झाला. त्यानें साष्टांग

नमस्कार घातला आणि ह्मटलें-स्वामी ! धर्मराजा आपल्या भेटीची चिंता करित आहेत तरी लौकर जाऊन दर्शन द्या. श्रीकृष्ण ह्मणाला-समर्थी नरपति पहावा अशी राजनीति आहे, ह्मणून प्रवेशाची आज्ञा घेऊन ये. लगेच द्वारपाळानें धर्मराजास कळविलें त्याबरोबर पांचही जण श्रीहरीस भेटण्यास आले. नंतर भीम, अर्जुन, नकुळ, सहदेव भेटले. मंदिरांत येतांच कुंती, द्रौपदी भेटल्या. मग सिंहासनावर बसवून पूजा केल्यावर धर्म ह्मणाला-मला गोत्रवधाग्नि जाळतो आहे, तो कोणत्या उपायानें निववावा. व्यासानें अश्वमेध सांगितला आहे. त्याचा भीमाच्या मतानें संकल्प तर केलाच पण तो मला असाध्य वाटला ह्मणून तुझें चिंतन केलें, आतां तुला वाटेल तें कर.

असें धर्माचें वचन ऐकून कृष्ण किंचित् विनोदानें ह्मणाला धर्मा ! तूं भीमाला प्रधान केलेंस तरी याग सिद्धीस पावलाच. माझा भार भीमानें घेतला त्यामुळें मी निश्चिंत झालों. शास्त्राचा विचार असा आहे कीं, जो खादाड, स्थूल उदाराचा, अवर्ण स्त्रियेचा स्वीकार करणारा, सासऱ्याकडे राहणारा यांचा विचार ऐकूं नये. जो कुयोनींत रमणारा, कामिनीजीत त्याची वाणी ऐकूं नये. ऐकल्यास हानी होते. भीमाचे बुद्धीनें तूं वर्तन करतोस तरी याग सिद्धी पावला यांत संदेह नाहीं. भीम जरासंध जाणतो, यानें हिडिंब बकाशीं युद्ध करावें. तो भूतळींच्या राजांस पाहतांच पलायन करील. यौवनाश्व राजा काळासमान आहे, त्याच्यापुढें याचें कांहीं चालणार नाहीं. श्रीरामानें अश्वमेध केला तेव्हां हनुमंतास बरोबर देऊन घोडा

सोडिला. शेवटीं लवकुशांनीं घोडा धरून हनुमंतासही बंदींत टाकलें; तेव्हां रामानें जाऊन सोडून आणिला. तर आतां तुला काय ह्मणावें ? तूं भीमवचनास भुलून असाध्य विचार केलास; हें मला बरें वाटत नाहीं. असाच विचार न करितां, अर्जुनानें जयद्रथवधांत पण केला, तेव्हां मी संकटांत पडून त्याला कपटविद्येनें मारिला. तोच विचार तेथें झाला. बळ न जाणतां संकल्प करून धर्मास संकटांत घातला आणि आपण उगाच राहिला. बरें, जें ईश्वराच्या चित्तास आलें त्याचें निवारण कोण करील ? ब्रह्मलिखित कधींच चुकणार नाहीं. अशीं हीं कृष्णाचीं वचनें ऐकून भीम पुढें उत्तर देईल.

---

# अध्याय ३ रा.

## श्रीकृष्णभीमसंवाद व भद्रावतीस आगमन.

जनमेजय जैमिनीस ह्मणाला-भीमानें श्रीकृष्णास काय उत्तर दिलें तें मला सांगा. जैमिनी सांगतात-भीम कृष्णास ह्मणाला. तुझे गुण माझ्या मुखानें ऐकावे ह्मणून राजास वचन बोललास, तरी सांगतों एक.मी तुजपेक्षां खादाड नाहीं,तूं क्षुधकाळीं अवघे चराचर खाऊन उपवासी ह्मणवितोस. ब्रह्मादिक तृणवत् करून दाढेशीं रगडतोस आणि शेवटीं आपणासही भक्षितोस! असा तूं खादाड आहेस ! तुझ्यापेक्षां स्थूल उदराचा कोणी नसून ब्रह्मांड तुझ्या उदरांत सांठतें. असें हें तुझें पोट माय देवकी कशी भरीत असे याचें मला आश्चर्य वाटतें. असें

ऐकतांच श्रीकृष्ण हांसूं लागले. भीम पुढें ह्मणाला—रुक्मिणी तुला अनुकूल असतां जांबुवंतीला पर्णिलीस, तिच्याबरोबर एकांतीं रमतांना तुला भय वाटूं नये ह्मणून तूं धर्मरायास स्मरत होतास. तूं क्षीरसागराचा गृहजांवई बलाढ्य ह्मणवितोस आणि अगस्ती ग्रासावयास आला तेव्हां त्याला कां मारलें नाहींस ? तुझ्यासारखा ब्रह्मांडांत स्त्रीजीत नाहीं. सत्यभामेच्या वचनास्तव वडील बंधु इंद्र जिंकून पारिजातक आणलास तूं लौकिकलाज सोडून थोरपणाचें राज्य करतोस अशा तुला काय ह्मणावें ? तूं अन्य योनींत रमून मच्छ कच्छ वराह होऊन शेवटीं खांबांत नारसिंह होऊन गुरगुरतोस.तुझ्यासारखा निर्दय कोणी नाहीं. तूं आईस मारून एकवीस वेळ पृथ्वी निःक्षत्रिय केलीस. आईबाप सोडून वनांत सीते सीते ह्मणून रडत शेवटीं वानरांस शरण गेलास. गोकुळांत गोपबाळ होऊन गाई चारीत गोपाळांचें अन्न खाल्लेंस, अस्सा तूं अप्रमाण आहेस. मोहिनीरूप धरून राक्षसांला मोहून विरोचनाची स्त्री होऊन गृहाचार केलास तुझे गुण वर्णन करितांना शेष लाजला तेथें माझा पाड काय? हे आपले गुण ऐकावे ह्मणून तूं मला पाहून बोललास. इतर तुझी भीड धरितात पण मी निःशंक तुझा दास आहें. तुझ्या बुद्धिविचारानें चालल्यास संसाराचें निर्मूळ व सर्व कामांचा संहार होतो ह्मणून तुझें कोणी ऐकत नाहींत. ज्यानें जातिकुळावेगळें व्हावें त्यानें तुझें वचन ऐकावें व शेवटीं सर्वस्वाला मुकावें. भीष्मानें तुझें वचन ऐकलें त्याचें निसंतान झालें, ध्रुवानें चिंतन केलें त्याला अंतरिक्षांत ठेविला, नारदानें पोटाशीं धरिला त्याला

लंगोटी लाविलीस, भीमानें भय हरण्यास चिंतलें तेथें तूं अधि-क भीति दाखवून कर्मांचा नाश करतोस. मी धर्मप्रधान झालों हा तुझाच महिमा ! तुझे चरण स्मरून मीच संकल्प करविला तुझ्या स्मरणमंत्रानें विघ्न टळून जन्ममरण तुटतें असें वेदपुराण बोलतात. आह्मीं तुझे जिवलग आणि सखे असें सर्वजण बोलतात. आह्मीं तुझें चिंतन केल्यावर जर इच्छा पूर्ण झाली नाहीं तर मग वेद पुराणें खोटीं ठरतील ! आह्मीं चिंतिलेलें जर न होईल तर श्रुतीचे बोल खरे कोण मानील ? हें ऐकून कृष्ण खदखदां हांसूं लागला.

भीम आणखी ह्मणाला—तुझ्या नामाच्या बळानें काळास मुखांत घालीन, तूं जे राजे सांगितलेस त्या मशकांची गणना ती काय? ही पृथ्वी पालथी घालून पाताळ आकाशांत उडवून सर्वांची अभिमानवस्त्राची गांठ सांडून टाकीन, मी धर्मास स्नान घालून अश्वमेध करवीन आणि तुझ्या वचनास उणें आणीन तेव्हां तुला स्मरण देईन. तूं मला नामसाह्य देऊन अंतर्गृहांत उगाच राहा,तुझी महिमा खोटी करावी हा आमच्या वंशाचा गुण आहे. ‘ आयुध धरणार नाहीं ’ हा तुझा पण भीष्मानेंच लटका केला; त्याचा मी हट्टी नातु व तुझा दास तुला लट-काच करील ! असें त्याचें भाषण ऐकून कृष्ण हर्षानें उचंब-ळून त्याला आलिंगन देता झाला व प्रेमाश्रुंनीं न्हाऊं घातलें.

नंतर देव भीमास ह्मणाले—भीमा ! सावध हो, यज्ञ निर्विघ्न होईल. आतां तूं श्यामकर्णासाठीं लौकर प्रयाण कर. असें ऐकून भीम बोलला—असें कांहींतरी बोल. तूं अभयदान द्यावें

कां भीति घालावी ? चिखलांत गाय रुतली असतां धन्याची वाट पाहते तेव्हां जर धन्यानेंच येऊन तिला बुडविली तर तिनें कोणास सांगावें ? तशी तूं आमचा आधारभूत असतां, जर उपेक्षा केली तर आह्मीं कसें वांचूं ? हें ऐकून कृष्ण धर्मास ह्मणाला—तूं पापक्षालनार्थ यज्ञ करतोस तें पाप माझ्या हातीं अर्पून निष्पाप होऊन सुखी रहा. तेव्हां भीम ह्मणाला, तूं राजास ठकवितोस काय ? पण मी सावध आहें तुझ्या हातीं जें अर्पावें तें अनंत गुणानें पावावें,हें कार्य धर्मास ठाऊक नाहीं. तो तुला कसा अर्पण करील ? अश्वमेध संपादून जें पुण्य प्राप्त होईल तें तुझ्या हातीं अर्पण करून धर्मराज सुखी होईल. त्याला पुण्यफलाची आशा नाहीं, हा यज्ञ तुज-करितांच करावा असा धर्माचा निश्चय आहे. मग धर्म समाधान पावून सर्वांनीं भोजन करून शयन केलें.

प्रातःकाळीं भीम, वृषकेतु व मेघवर्ण उठून कुंतीस व कृष्णास वंदन केलें. कुंतीनें भीमास सिद्धमोदक दिले, ते घेऊन अर्जुनास ह्मणाला-तूं धर्मपालन व द्विजरक्षण कर. मी वासुदेवाचे प्रसादेंकरून अश्व घेऊन येतों. असें सांगून तिघेजण पर्वताशिखरावर येऊन भद्रावतीकडे पाहूं लागले. तों भोंवतीं शतसहस्र अरण्य असून, कमळांनीं सरोवरें भरलीं आहेत, भ्रमर गुंजारव करीत आहेत, मयूर नाचत आहेत. देवळें, बंगले, मठ, किल्यांचे तट, शस्त्रास्त्र, यंत्रें शोभा देत आहेत. पुढें एक रम्य वन दृष्टीस पडलें. तेथील अनेक वृक्षलतांची व पशुपक्ष्यांदिकांची अवर्णनीय शोभा पाहून त्या त्रिवर्गास आनंद झाला, व तेथेंच

एक कनकस्फटिकाचें सागरासारखें विस्तीर्ण कनकरत्नरौप्य शिळायुक्त तळें आढळलें. तें पाहतांच भीम वृषकेतुस ह्मणाला-आतां दुपारचे वेळीं येथें श्यामकर्ण पाणी पिण्यास येईल तरी आपण या पर्वतांत गुप्त राहून अश्वाचें हरण करावें. अशा विचारानें ते तिघे गुप्त राहिले. पुढें श्यामकर्ण येतांच त्याचें हरण करतील.

# अध्याय ४ था.

## श्यामकर्णहरण.

वृषकेतु भीमास ह्मणाला-यौवनाश्वराजाचें सैन्य दहा अक्षौहिणी आहे असें व्यासांनीं सांगितलें, त्यांतील कांहीं अश्वरक्षणार्थ राजा पाठवील. त्या सैन्याची धुळा पाहतांच जसा गंगानट पाहिल्यानें पातकांचे भार पळतात त्याप्रमाणें वाताभ्यास होईल असें मांगत आहे तों मदोन्मत्त हत्तीचे कळप वस्त्राभरणांनीं मंडित असे वीरांसह जलप्राशनार्थ आले पुनः नगरीकडे पाहतो तों धुळी उसळलेली पाहतांच भीमास ह्मणतो-आतां सैन्य निघालेंसें वाटतें. तो ध्वज दिसला, तेव्हां यौवनाश्व येत असावा असें वाटतें. त्यावेळीं अनेक प्रकारचीं वाद्यें वाजत छत्रचामरादियुक्त सर्व रंगाच्या अश्वरत्नांच्या हारी निघाल्या उष्ट्री नकुळी, हंसी, मयूरी व निरी अशा घोड्यांच्या पांच गति चाबुकस्वारांसह अतिवेगानें जलप्राशनार्थ आल्या. त्या पाहतांच भीम वृषकेतूस ह्मणतो—यांत श्यामकर्ण दिसत नाहीं, तो मंदिरांत बांधला असेल काय? तो जर यांत नसेल तर आमचे श्रम

व्यर्थ गेले. त्या श्यामकर्णावांचून आह्मांस धर्मसदन प्राप्त व्हावयाचें नाहीं. असें भीम बोलत आहे तोंच श्यामकर्ण दिसला. त्याला पाहतांच मेघवर्ण कटिबंध घट्ट आवळूं लागला. असें पाहतांच भीम ह्मणाला—हे पुत्रपुत्रा ! हें काय करतोस ? मेघवर्ण ह्मणाला-मी श्यामकर्ण पाहिला, आतां मला धीर धरवत नाहीं. मी जर यौवनाश्वासह श्यामकर्णास जीवंत धरून न आणीन तर सोमवंशांत कृमीच जन्मलों.जसा समुद्रांत शेषाला गरुड मुखांत धरून नेतो, त्याप्रमाणें सैन्यसागरांतून श्यामकर्णास आणीन.

असें बोलून उड्डाण करून राक्षसीमायाजाळानें अंधकार पाडिला, आणि विद्युल्लता व मेघधारांचा वर्षाव सुरू केला. त्यांत देवविमानांचा चुरा झाला. ही खतमी देवदूतांनीं इंद्रास लागलीच कळविली. ती ऐकतांच तो क्रोधानें लाल झाला. मग शोधाकरितां एका चतुर दूतास पाठविलें. त्यानें येऊन नमन करून ह्मटलें—हे महापुरुषा ! तूं कोण, तुझा वंश कोणता, आणि काय उद्देशानें आला आहेस ? भीतीनें इंद्र घाबरल्यामुळें त्यानें मला पाठविलें आहे. मेघवर्ण ह्मणाला—आह्मी सोमवंशी पांडव आहों. भीमसेनाचा जो घटोत्कच सुत त्याचा मी पुत्र मेघवर्ण आहें. हस्तनापुरीं धर्मराजानें अश्वमेध आरंभिला, त्याच्याकरितां श्यामकर्ण नेण्यास भीम, वृषकेतु व मी आलों आहें आह्मांस चतुर्भुवनाची पर्वा नाहीं, तेथें इंद्रपदाची गणना ती काय ? पांडवापासून इंद्र उगाच भय कां पावतो ? हाड श्वान चघळतो तें लोकांनीं पाहतांच श्वानास वाटतें कीं, हे माझें हाड घेतील तसें हाड हें इंद्रपद, तेथें श्वान हा इंद्र; त्याजकडे

पांडव थुंकूनही पाहणार नाहींत. असें निंदास्पद भाषण ऐकतांच दूतास खेद झाला. त्यानें धांवत जाऊन इंद्रास सांगितलें तें ऐकून कौतुक पाहण्याकरितां इंद्र निघाला.

इकडे मेघवर्णानें मोहनास्त्रानें सैन्यास मोहनी घालून श्यामकर्णास पाठीवर बांधून आकाशांत उडाला. त्यावेळीं सैन्यांत हाहाःकार उडून मारा, धरा असा आकांत झाला; देवांनीं पुष्पवृष्टि केली. तेव्हां दूतांनीं अश्व नेल्याचें वृत्त राजास कळविलें. तें ऐकतांच राजा क्रोधायमान होऊन काळसैन्याची होळी करतील असे वीर घेऊन एक अक्षौहिणी सैन्यासह शस्त्रास्त्रांनिशीं दशदिशा शोधीत निघाला. तों आकाशांत श्यामकर्णासह वीर दृष्टिस पडला. त्याला ह्मणूं लागले–हे दुर्मती! अश्व सोड, [illegible] आमच्या हातें यमसदनास जाशील. मेघवर्ण ह्मणाला–तुह्मी कां श्रमतां? हस्तचपेट्यानें सर्वांस मारीन, परंतु अश्व सोडणार नाहीं. काळमुखीं पडलेला जीव जर पुनः मिळेल तरच हा अश्व तुह्मांस प्राप्त होईल. असें ऐकून वीरांनीं अगणित बाण सोडून मार्ग रोधला. तेव्हां मेघवर्णानें अश्वास पाठीवर बांधून करतळानें बाणांचें चूर्ण करून पर्वत शिळांनीं त्यांचा निःपात केला व गगनमार्गें चालूं लागला. त्यावेळीं वृषकेतूनें भीमास जागविलें तेव्हां त्यास आनंद झाला.

सैन्य पडल्याचें वृत्त राजास कळतांच तो सेवकांस परचक्र केवढें आहे तें विचारूं लागला. सेवक ह्मणाले–एक अश्व घेऊन आकाशांत गेला, एकानें रणांत आकांत केला व एक उभा आहे. असें ऐकून राज[illegible]

ग्नि किंवा तीन देव अश्वहरणार्थ आले असावे. असें बोलून निशाणीं धाव घेऊन सहपरिवारें युद्धास आला. तें पाहतांच वृषकेतूनें भीमाजवळ युद्ध करण्याची आज्ञा मागितली. जसा लक्ष्मण रामआज्ञा घेऊन इंद्रजितास जिंकावयास गेला, तसा वृषकेतु यौवनाश्वास जिंकण्यास धांवला. त्याच्यावर मुंग्यांच्या हारीमारखे बाण येऊं लागून अंधकार पडला. तेव्हां वृषकेतूनें तार्त्र शरानें राजाच्या सैन्याचा संहार केला आणि आकाश निर्मळ करून पितामहास वंदिलें. नंतर महारथी सैन्यानें वृषकेतूस बाणांनीं व्यापिलें. देव विमानें पळवूं लागले. असे पाहतांच भीम क्रोधानें रणांत आला. त्याला वृषकेतु ह्मणाला—स्वामी, तुह्मी मला सेनायुवती दिली, तिचा अभिलाष धरला तर दिनपती तुह्मांस हांसेल. ही सेनायुवती सामऱ्याचे चरण पाहून लज्जित होईल. तरी आह्मां दोघांत निवड पाडावी ही वडिलांची रीत नव्हे. इच्यापासून यशनंदन होईल तो तुमच्या पायीं अर्पण करीन. त्यावर भीम ह्मणाला—तुला स्त्रीजीत जाणून मी धांवत आलों, पण तूं विवेकी ह्मणून तिच्या आधीन झाला नाहींस. जर सुनेला सासरा शिक्षा न करील तर ती मर्यादा सोडून इकडे तिकडे संरावैरा जाइल व शब्द वडिलांस लागेल. असें बोलून भीम मागें फिरला व वृषकेतूनें रण माजविलें रणांत सैन्य पडून हाहाःकार झाला.

तें पाहतांच यौवनाश्व धांवत रणभूमीवर आला, आणि रणभूमीवरील प्रेतें पाहून या वीराची जननी धन्य होय असें बोलला. नंतर त्यास पाहण्याकरितां जवळ जाऊन ह्मणाला—तूं को-

याचा वंश व देश कोणता ? आणि कां सेनेचा नाश केलास? वृषकेतु ह्मणाला—माझा कश्यप वंश जो पांडवांचा द्वेष करणारा व दुर्योधनाचा मित्र; अर्जुनाला जीवदान देऊन यमसदनीं गेला तो कर्ण माझा पिता; माझें नांव वृषकेतु. धर्मयज्ञाकारितां श्यामकर्ण पाहिजे. त्यावर राजा ह्मणाला—तूं एकटा युद्ध करून दमलास तरी माझा रथ घेऊन युद्ध कर. वृषकेतुनें सांगितलें—मी दानशूराचा पुत्र, मला तुझें रथदान नको. मी भूमीवरून युद्ध करीन. तूं सिद्ध हो. नंतर दोघे युद्ध करूं लागले.

# अध्याय ५ वा.

## वृषकेतु व यौवनाश्व युद्ध व मैत्री.

नंतर वृषकेतूस राजा ह्मणाला—तूं आधीं माझेवर बाण टाकः कारण, तूं बाळ बळहीन आहेस. वृषकेतूनें ह्मटलें—तूं वृद्ध, पुष्कळ पुत्रांचा पिता ह्मणून बळहीन झालास. तुला कृष्णदर्शन नाहीं ह्मणून बळहीन; मी कृष्णदर्शनानें बलाढ्य आहें. तूं पुत्रोत्पादनीं व विषयसंगीं लोभी ह्मणून मला वश झालास. असें ऐकतांच राजानें दहा बाण सोडले, त्यांचें वृषकेतूनें तीन बाणांनीं खंडण करून तीन बाण सोडले ते राजाचें रक्त पिऊन पतन पावले. मग वृषकेतूनें चंद्राकार बाणानें राजाचें छत्र चामरादिक धनुष्य छेदलें. मग राजानें आठ बाण सोडून हृदय भेदलें. त्याबरोबर एक बाण सोडून सारथ्याचें शिर छेदून आकाशांत उडविलें आणि राजास व्याकुळ केलें. त्याबरोबर सैन्य पळूं लागतांच दहनाक्षानें

सैन्य जाळूं लागला. तों राजानें वरूणास्त्रानें विझवून सैन्य शांत केलें. मग वृषकेतूनें पवनास्त्र सोडतांच, राजानें शिळावृष्टी करून त्याचें शरीर शतचूर्ण करितांच, भीम पुत्रास सोडविण्यास गदा घेऊन धांवत आला त्यावर शरवृष्टि केली ती भीमानें वारिली, तोंच कर्णपुत्रानें पर्वत छेदले. मग राजानें तीक्ष्ण बाणानें हृदय भेदतांच धरणीवर पडला व भीम शोक करूं लागला. नंतर भीमानें खवळून गज अश्व मारून सैन्यास वातचक्रांत टाकलें, तेव्हां आकांत होतांच राजपुत्र सुवेग गदा घेऊन भीमावर येऊन ती वक्षःस्थळीं ताडिली. ती सहन करून त्याला शंभर वेळ भोंवंडून भूमीवर आपटला.

असे दोघांचें युद्ध होऊन मूर्च्छित पडले. तोंच वृषकेतूनें पन्नगास्त्र व राजानें गरुडास्त्र सोडलें. मग राजानें पिशाचास्त्र सोडतांच वृषकेतूनें वैष्णवास्त्र टाकलें. अशीं शस्त्रास्त्रें टाकल्यावर राजा मूर्च्छित झाला. त्याला वृषकेतु वस्त्राचा वारा घालून ह्मणाला—कृष्णाराधनेंत जें पुण्य घडलें त्याच्या योगें राजा वांचों असें बोलून कृष्णाचा धांवा केला. त्याबरोबर राजा सावध झाला, तों वृषकेतु सेवा करित आहे त्याला राजानें आलिंगन देऊन ह्मटलें—धन्य तूं दानशूराचा पुत्र ! आपलें पुण्य वेंचून मला प्राणदान दिलेंस. आतां मी तुजशीं झुंजेन तर जगांत निंद्य होईन. जीव व राज्य मी तुला अर्पण केलें; तर आतां सुवेग व भीमाजवळ जाऊं चल. पुढें सुवेग भीम, यौवनाश्व व वृषकेतु भद्रावतीस जाऊन हस्तनापुरास येतील.

---

# अध्याय ६ वा

## हस्तनापुरीं गमन.

वृषकेतु व राजा रण शोधित चालले तों सुवेग व भीम दिसले. भीमास राजा ह्मणाला-मी पुत्रासह शरण आहें, तरी युद्ध करूं नये. नंतर त्यांच्या भेटी झाल्या. तोंच मेघवर्ण अश्व घेऊन पुढें उभा राहिला. त्यासही आलिंगन दिलें. मग राजा भीमास ह्मणाला-वृषकेतु माझा प्राणदाता होय. अन्न, वस्त्र, विद्या, धन, पोषण, पालन व व्रतबंधन इतकें करून जो लग्न करील, त्याला जो पीडील तो महापापी होय. बरें हा श्यामकर्ण नेणारा बलाढ्य वीर कोण तें मला सांगा.

भीम ह्मणाला-हा घटोत्कच नांवाच्या माझ्या मुलाचा पुत्र; याचें नांव मेघवर्ण. असें ऐकून राजा धन्य संतति, असें बोलत भीमास ह्मणाला-वित्त दळभार कृष्णार्पण करून आपलें शरीर धर्मकार्जी अश्वरक्षणीं समर्पिलें आहे. माझें अयुतसंख्या कुंजर व सात अक्षौहिणी सैन्य धर्मकार्यास देतों, नंतर चौघेही शुभ्र कुंजरावर बसून नगरांत जाण्यास निघाले. सेवकांस पुढें पाठवून गुढ्या, तोरणें, ध्वज, पताका उभारून राजमार्गीं कन्यका उभ्या कराव्या. याप्रमाणें सेवकांनीं नगर शृंगारलें. भीमादिक नगरांत जातांच त्यांच्यावर कन्यकांनीं सुवर्णपुष्पवृष्टि केली. राणी प्रभावतीनें आरती ओंवाळून ह्मटलें-माझें मंगळसूत्र गळत होतें तें ज्यानें दृढ केलें, तो कर्णपुत्र विजयी होवो. मग पांचहि जण राजभुवनांत जाऊन भोजन करून सुखासनावर पडले.

प्रातःकाळीं सुवेग पुत्राकडून राजानें डांगोरा पिटविला कीं, सर्वांनीं स्त्रीवित्तपुत्रासह हस्तनापुरास हरिदर्शनास चलावें. राणीस सांगितलें, तूंहि सकल स्त्रियांसह वस्त्रें अलंकार घेऊन द्रौपदी, सुभद्रा, रुक्मिणी यांस गौरवाव्या. राजानें आईसही निघण्याबद्दल जाणविलें. पुढें सर्वजण जाण्यास सिद्ध झाले; परंतु राजजननी ह्मणाली—मी तिकडे येत नाहीं, तुह्मांस ही दुर्बुद्धि कशी आठवली? उगाच वित्तक्षय कां करितां? कोठचा हरी आणि कोठचा धर्म! तुह्मी घरीं राहून धर्मवृद्धि करा. ती ह्मातारी ऐकेना ह्मणून राजा स्वतः जाऊन आईस ह्मणाला—मात! धर्म नगरास चल, तेथें भागीरथीचें स्नान व हरिदर्शन होऊन संसारक्षीण हरेल. कुंती, द्रौपदी, रुक्मिणी, सत्यभामा इत्यादिकांच्या दर्शनानें पाप क्षालन होईल. व्यासादिकांच्या दर्शनानें दोष जळून जन्मसार्थक होईल. असें ऐकून वृद्धा क्रोधायमान होऊन ह्मणाली—धर्म, कृष्ण, याग सर्व लटकें आहे. मी येत नाहीं, माझ्या सुना डाकिनी माझें वित्त चोरून नेतील. मग मी धर्माचें काय घेऊं? गव्हांचें शेताचें सेवक वाटोळें करतील; सांठलेलें दहीं दूध गोपाळ खातील. दासी धान्य विकून काष्ठादिक जाळून टाकतील. कणगीची लिंपण काढून गूळ साखर खातील. घरांतील वस्त्रं पात्रें यांचा नाश करतील. मग मी कृष्णाचें काय घेऊं? मला संसारच गोड आहे. मी जीवंत आहें तोंपर्यंत द्रव्य खर्चूं नको. मग पाहिजे तें कर.

अशीं आईचीं दुष्ट वचनें ऐकून राजानें तिला बांधून नेण्याचा विचार करून बळेंच डोलींत घातली. तेव्हां ती रुदन करूं

लागली. राजा सर्व जनांसह एकवीस गांव ओलांडून मार्ग क्रमूं लागला. नंतर मी पुढें जातों असें भीमानें राजास सांगून तो धर्मराजाजवळ गेला व सर्व वृत्त कथन करून यौवनाश्व सकुटुंब आल्याचें कळविलें. मग श्रीकृष्णास लोटांगण घालून तुझ्या चरणप्रतापानें कार्य साधून आल्याचें सांगितलें. अर्जुन, नकुळ, सहदेव यांच्या भेटी झाल्या. धर्मराजानें यौवनाश्वास सामोरें जाऊन आणण्याची आज्ञा दिली. पुढें सर्व मिळून राजास गौरवानें नगरांत आणतील.

# अध्याय ७ वा.

## हस्तनापुरांत येणें व सर्वांच्या प्रेमभेटी.

धर्म भीमास ह्मणाला—यौवनाश्व आल्याची बातमी द्रौपदीस जाऊन सांग. मग भीम द्रौपदीकडे जातांच तिनें वंदन करून त्याला आसनावर बसविलें आणि सर्वांसह क्षेम असल्याचें विचारलें. भीमानें सांगितलें—धर्मप्रसादानें व श्रीकृष्ण शिरीं असतां मला काय उणें आहे ? पण एक चिंता उद्भवली आहे. ती हीच कीं, यौवनाश्व राजाची राणी प्रभावती दहा हजार स्त्रियांसह तुझ्या भेटीस येत आहे. तिचा मानेल असा गौरव करावा. पण तुझी शोभा जो श्रीकृष्ण तो कोठें गेला ? द्रौपदी ह्मणाली—प्राणवल्लभा ! तो अंतर्गृहांत आहे, तो धर्मास सोडून जाणार नाहीं, त्याच्याशिवाय आह्मांस शोभाच नाहीं. असें बोलून भीमास सुखी केलें. मग भीम ह्मणाला—आतां तूं सुवेषानें अलंकारवस्त्रांनिशीं लौकर ये.

असें सांगून सभास्थानीं गेला. मग कृष्ण धर्मादिक मिळून राजास सामोरे चालले. रत्नखचित शिबिकेंत सहस्र दासींसह द्रौपदी बसली, वाद्यगजरानें ध्वजापताकांनीं मंडित होत्सातें सर्व सैन्य नगरप्रदेशीं आलें. पुढें श्यामकर्ण, त्याच्या मागें वृषकेतु व त्याच्यामागें यौवनाश्व सहकुटुंब उभा होता धर्म हत्तीवरून उतरून राजास भेटला व तूं पांचवा बंधु असें ह्मणाला. मग श्रीहरीस लोटांगण घातलें. परस्परांचीं भाषणें झाल्यावर सर्वांच्या भेटी झाल्या. मग राजानें अर्जुन कोठें आहे ह्मणून विचारतांच दोघांचें क्षेमालिंगन झालें. सुवेग राजपुत्र सर्वांस भेटला. द्रौपदी प्रभावतीस भेटून वस्त्रालंकार देती झाली. अशा प्रेमभेटी होऊन सर्व सभास्थानीं येऊन सुखगोष्टी करूं लागले. मग भोजनें होऊन झोंपी गेले. असे तीन महिने गेल्यावर कृष्ण धर्मास ह्मणाले-चैत्रपौर्णिमा मागें गेली, यज्ञारंभ करण्यास अकरा महिने आहेत. तरी मी द्वारकेंत उग्रसेनादिकांस भेटण्यास जातों तुह्मी यौवनाश्वासह अश्वाचें रक्षण करा असें ऐकून धर्मानें आज्ञा देऊन ह्मटलें—मी भीमास बोलाविण्यास पाठवीन तव्हां सहकुटुंब यावें. कृष्ण ह्मणाला- धर्मा! तुझ्या दास्यत्वाकरितांच मीं सगुणरूप धरलें आहे. तें दास्यत्व जर न करीन तर माझें जिणें व्यर्थ होय. मग मी कृतकृत्य होण्यास कुटुंब बरोबर आणीन असें सांगून देव निघून गेले. धर्म नगरांत येऊन व्यासांस धर्मलक्षण विचारूं लागला. तें पुढें सांगेल.

# अध्याय ८ वा.

## चतुर्वर्ण–धर्मनीतिकथन.

व्यास सांगतात--धर्म अनंत आहेत, पण तुला थोडक्यांत सांगतों. हरिमुखापासून ब्राह्मणवर्ण झाला, त्याचे स्वधर्माचरण ऐक. श्रुतिस्मृति शास्त्रार्थानें धर्माचरण, ब्रह्मचर्यव्रत व सद्गुरुसेवा करावी; नित्यनेम व इंद्रियदमन करावें. विषयवासना सोडून वैराग्य धरावें. वमनासारखें परधन, आईसारखी परस्त्री समजून परनिंदा प्राण गेल्यासही करूं नये. नित्य पंचमहायज्ञ, तीर्थाटन करून कुटुंबरक्षण करावें. स्वधर्म हाच उत्तम व पुरुषोत्तमाचें स्मरण करावें. हा ब्राह्मणांचा स्वधर्म जाणावा.

आतां हरिभुजांपासून झालेला क्षत्रियवर्ण ऐक. धर्मानें प्रजापालन करून षष्टांश द्रव्य घ्यावें. दारुण युद्ध, शरणांगतांचें रक्षण व वेदाध्यन करावें, युद्धीं पलायन करूं नये; अश्वमेधादि यज्ञ, पंचमहायज्ञ, ब्राह्मण, दीन अनाथांचें पालन व अपराधाप्रमाणें दंड करावा. वितंडवाद न करितां पृथ्वीचें पालन, सैन्याचें रक्षण करून पाप आचरूं नये, हा क्षत्रियधर्म होय. हरीच्या मांड्यांपासून झालेला वैश्यधर्म ऐक. पशुरक्षण व धर्मानें शेती करावी उदीमपणांत असत्य बोलूं नये. सर्व वस्तूंचा विक्रय न्यायानें करावा. विहिरी, तळीं, आरामस्थानें, घरें ब्राह्मणांस द्यावीं, इंद्रियें दमन करून निंदा कुकर्म करूं नये. पुरुषोत्तम हृदयीं धरावा.

आतां हरिचरणापासून झालेला शूद्रधर्म एक. तीन वर्णांची सेवा, शिवभजन, मर्यादापाळण, इंद्रियदमन, शेती करून न्यायानें द्रव्य मिळवावें. स्वधर्मव्रतरक्षण, तीर्थादि गमन, विप्रसेवा हा धर्म शूद्रांचा होय. चहूं वर्णांचा धर्म असा कीं, स्वधर्मसदन पाडूं नये, प्राणीमात्रावर दया हेंच वस्त्र फाडूं नये, कुबुद्धी विचारवन तोडूं नये, दारू पिऊं नये, सन्मानवृक्षावर चढूं नये, स्वधर्मानें राज्यमार्गीं वागावें, निंदा कुकर्माचा संग करूं नये, हरिकथा ऐकावी व जन्ममरण खंडावें. आतां स्त्रियांचें लक्षण एक—पतिसेवा न करणारी स्त्री नरकांत पडते. सर्पावर पाय पडला असतां जसें भय उत्पन्न होतें, तसें बाहेर जातांना मानणारी, पतिसेवेशिवाय दुसरें कांहीं आवडत नाहीं, पति आज्ञेनें तीर्थव्रतदान करते. भ्रतारविरहानें दुःखित, त्याचें वचन मानणारी, मासरा, दीर, सासु, नणंदा, जावा यांचे वचनांत राहणारी अशी जी स्त्री ती कुलवधु जाणावी. जिची टाळु व जीभ काळी, पदांगुळें जमिनीस लागत नाहींत, जी निःशंक गायन करणारी, लटकाच कान—कंबर खाजविणारी, परपुरुष पाहून हास्य करणारी, त्याच्यापुढें बाळाचें चुंबन घेणारी, धांवत खेळत चालणारी, मिथ्या लाजणारी, निळ्या चोळीची आवड कामाशिवाय परगृहीं जाणारी, हंसतभाषणी, माळीण, बुरडीण, न्हावीण, नाचणारी, कुंटीण, दूती यांची संगत करणारी, नृत्य गायन, कामशास्त्र यांची आवड, पतीस पाहून क्रोधी, पतित्यागी, कामाकरितां गुरुसेवा करणारी अशा स्त्रिया व्यभिचारिणी होत.

आतां विधवा स्त्रियेचा धर्म सांगतों--विधवेनें मस्तकावर केंश ठेवूं नयेत, अंगांत चोळी घालूं नये. जर केंस ठेवील तर केंसांचे संख्येइतकीं युगें नर्क ..ग भोगील. तांबूल खाल्ल्यानें रक्तनर्कात पडेल. पलंगावर ..जूं नये, एकवेळ जेवावें. वस्त्र मलीन नेसावें. अतीतास नारायणरूपी मानून पूजन करावें, तीर्थ यात्रेस जावें. आपल्या धर्मापासून चारी वर्ण भ्रष्ट झाल्यास तें पातक राजास लागतें ह्मणून राजानें धर्मरक्षण करावें. दुष्ट, पातकी, चहाडखोर, द्यूतकर्ता, नास्तीक, खळ यांस राजाजवळ ठेवूं नये. हरिचिंतन, शिवपूजा न करणारा, विप्रवचन न मानणारा यांस समीप ठेवूं नयेत. चांडाळयाती निंद्य असून नित्य स्नान..नि ..तगा..स साधू देवासमान.. मानताात. यास्तव धर्मरक्षण करावें. नंतर ' कोणत्या धर्मानें लक्ष्मी स्थिर होईल ' असा धर्मानें प्रश्न केला.

# अध्याय ९ वा.

## लक्ष्मी स्थिर होणें व भीमाचें द्वारकेंत गमन.

व्यास ह्मणाले--धर्मा, तुला घरीं लक्ष्मीनारायण स्थिर होण्याचा उपाय सांगतो ऐक. जेथें शुद्धाचार, सत्यवचन, शुभचिंतन, पतिसेवा, मातृपितृ व वडील बंधुसेवा, कृतज्ञता, भ्रांतिवचन नाहीं, श्राद्धक्रिया, सुचिर्भुक्ति, पराक्रम न सांगणें देवालयें, विप्रमंदिरें, आरामस्थानें बांधणें, व्रत, तप, दानें चालत असून कलह नाहीं, अशा स्थानीं लक्ष्मी स्थिर राहते. जे, दुष्ट, दुर्जन, चाहाडखोर, शूद्र स्त्रीशीं गमन करणारे अशांस

लक्ष्मीनारायण कधींच शिवत नाहीं. लवणादिक रसविक्रय, वस्त्र, सोन्याची चोरी, द्यूतक्रिया अशा घरीं लक्ष्मी राहात नाहीं. धर्मा ! तुझ्या द्यूतकर्माच्या अवगुणामुळेंच तुला तेरा वर्षें वनवास घडला. त्यावेळीं तूं कोणाचें ऐकलेंस नाहीं असें मला समजलें ह्मणूनच कौरवांचा क्षय मांडला. नळासारखा पुण्यश्लोकी द्यूतव्यसनांत शोक पावून ऋतुपर्ण राजाचा सेवक होऊन स्त्रीपुत्रांचे वियोगानें दुःखित झाला. यास्तव वडिलांचें वचन ऐकावें. द्यूत खेळूं नये, खेळल्यास राज्य, स्त्री आणि धनाचा पण लावूं नये. जेथें ब्राह्मणांना अपमान, जेथें शिकार व दारूपान, मातृनिंदा, तेथें लक्ष्मी राहात नाहीं. जे हरिकथा ऐकत नाहींत, द्विजचरणजीवन पडत नाहीं तेथें लक्ष्मीनारायण रहात नाहीं.

इतकें सांगून व्यास धर्मास ह्मणाले—आतां यज्ञारंभ जवळ आला. तरी श्रीहरीस बोलावणें पाठवावें. तेव्हां भीमास बोलावून सांगितलें—तूं द्वारकेस जाऊन कृष्णास सहकुटुंब घेऊन ये. अशी आज्ञा होतांच भीम द्वारकेस गेला. तों देव बंधूसह भोजन करित बसले होते. अनेक प्रकारचीं पक्वान्नें भक्षण करित असतां अष्टनायिकांपैकीं एक सत्यभामा विनोद करूं लागली. मामा रुक्मिणीस ह्मणाली आतां चक्रपाणी जेवावयास शिकले आणि धर्मराजप्रसंगानें ऐश्वर्यवान् झाले. बाळपणाच्या ताकभाकर लोणच्याचीं आतां आठवण कशी होईल ! यमुनातिरावर घोंगड्या पसरून गोपाळांसह शिदोऱ्या खात असतां गोपाळांस गाई वळा

वयास लावीत आणि आपण त्यांच्या शिदोऱ्या सोडून उच्छिष्ट खात असत, तें आतां कसें आठवेल ? गळ्यांत गुंजांचे हार, माथ्यावर मोरांचीं पिसें, खांद्यावर कांबळी हे पूर्वींचें वैभव ! आतां छत्रचामरादि चतुरंग सेना, मिष्टान्नें दिव्य युवती, हा सर्व प्रताप धर्माचा होय. यांच्या गौळणी फार आवडत्या होत्या.

इतकें ऐकून रुक्मिणी ह्मणाली—हे मुळचेच अवगुणी ! देववचनानेंच मी यांच्या चरणीं भाळलें. पण यांच्या संगतीनें मायबापांची आस तुटून संसारसरिता आटून जन्ममरण तुटलें. पुढें काय होईल नकळे ? सर्वांचे बोलणें ऐकून कृष्ण हांसत होते, पण आई जवळ होती ह्मणून उत्तर कांहीं देववलें नाहीं. मग आई ह्मणाली—तुह्मी निर्लज्ज होऊन हें काय बोलतां ? त्याला सावकाश जेवूं द्या. मी याला नवमास उदरीं वाहिला आहे; त्याचें काम मी करीन, तुह्मीं उगाच मंदिरांत असा. हें ऐकून सत्यभामा ह्मणाली—आत्याबाई ! तुह्मांला काय ह्मणावें ? ज्याचे उदरांत अनंत ब्रह्मांडें त्याला गर्भांत कसा धरिलात ? याची साक्ष चराचरांत सज्जन कोणी देत नाहीं. गोवर्धन सर्वांनीं उचलला पण यांचें नांव झालें ! आणि मी रतिसमयीं कुचाग्रावर धरतें ! जनांत पुण्य यश नाम होतें तें यांचें चरणीं अर्पण केलें. तरी आतां नामरूपाची कहाणी काढूंच नये. असें ऐकून कांहीं प्रिय वचन कृष्ण बोलणार होते; परंतु दारांत भीम उभा होता हें जाणून देव संतोषले. सैरंध्रीला पूर्वींचें नेत्रसंकेत करून भीमास उभा

करविला होता. तिने म्हटलें, देव आत्तांच भोजनास बसले आहेत तरी भरल्या पायांनीं आंत जाऊं नको. कारण अन्नास दृष्ट लागेल. देवांनीं भीमास उभा करविलें कारण त्याचे विनोदबोल ऐकावे. ते पुढें सांगतों.

## अध्याय १० वा.

## भीमविनोद व कृष्णाचें धर्मागारीं निघणें.

भीम कृष्णास ह्मणाला—तूं आपल्यापोळ्या आहेस, मी दारांत अतीत उभा असतां सावकाश भोजन करीत आहेस. लोकांत नीती सांगतोस कीं अतीताला अन्न द्यावें, दाता कृपाळु ह्मणवितोस आणि एकटा जेवतोस. देवकी आत्या कोठें गेली? द्वारकेंत दुष्काळ पडला कीं काय? राजदुहिता माझ्या भगिनींस घराचार आला ह्मणून स्वार्थास प्रगटल्या काय? असें ऐकतांच श्रीकृष्ण भीमानें ऐकावें ह्मणून फेण्या पापड चटचट चावून दूध घटघटां पिऊं लागले. तेव्हां भीम ह्मणाला—काय याचा कंठ! ओंगळ्यानें किंवा मुसळ घालून मोठा केला आहे? जर ती सुइण मिळती तर तिचें नाकच कापलें असतें! असें ऐकतांच कृष्णास हांसूं आलें. मग भीम ह्मणाला—जर कंठांत वडा किंवा लाडू अडकला असेल तर मुष्टिघातानें किंवा गदेनें पाडीन. पण हा माझा तर्क निष्फळ होय. कारण जो सर्व भूगोल गिळणारा त्याच्या मुखांत घांस कसा अडकेल? असा अनेक प्रकारें भीमानें कृष्णाचा विनोद केल्यावर कृष्ण ह्मणाला—भीमा! ये लौकर, मी तुला

पाहिलें नाहीं. अपराधाची क्षमा करून मजबरोबर जेव भीम ह्मणाला—आधीं तूं तृप्त होऊन आतां जेव ह्मणतोस तुझा स्नेह मला कळला. मग कुंतीची आण घालून भीमास जेवावयास बसविलें. दोघेही जेवल्यावर कर्पूर विडे घेऊन सभास्थानीं बसले.

नंतर कृष्णानें सांब, अनिरुद्ध, प्रद्युम्न व कृतवर्मा यांस बोलावून सांगितलें—तुह्मीं भेरी वादन करून नगरवासी यांस सांगावें कीं, वस्त्र-वित्त वस्त्र-भूषणांसह धर्मनगरास अश्वमेध पाहाण्यास चलावें. वसुदेवासह बलरामानें मात्र येथें राहावें. अश्व, गज, गाडे, रथ, बैल इत्यादि भरून भांडारींची संपत्ति घ्यावी. अशी आज्ञा होतांच डांगोरा पिटल्याबरोबर ब्राह्मण, सराफ, सोनार, तेली, तांबोळी, कांसार, चाटी, कोष्टी; रंगारी आदिकरून सर्व नगरवासी आपल्या कुटुंबासह निघाले. कृष्ण सफेत घोड्यावर बसून चतुरंग सैन्य व प्रजाजन यांसह चालला. द्वारकेबाहेर निघतां दुपार झाली. तों एक कुंटिणी बैलावर बसून चालली होती, तिचा बैल उंट पाहून बुजाला, त्यामुळें ती बैलासह पडली. तिला पाहून लोक हांसून ती स्वकर्मानें पडली असें ह्मणाले. देव धांवत पाहण्यास आले, तों पुनः बैलावर बसली तेव्हां देवानीं जाणलें कीं, हा बैल पतितोद्धारक आहे.

पुढें माळीण भेटली. ती कृष्णास ह्मणाली—तूं दुपारींच कोठें चालकास? तुझ्याकरितां केलेल्या माळा सुकल्या, तरी माझा फुलें घेऊन मला मुक्तिधन दे. मग मी सुखस-

ज्नास जाईन. देवांनीं सांगितलें, तूं धर्माचा आश्रय कर ह्मणजे मुक्तिधनास तुला काय उणें आहे! असें सांगून द्रव्यानें तिचा गौरव केला. नंतर तेलीण भेटली. ती ह्मणाली– दुर्बळास कां मारतोस ? रस्त्यांतील सैन्यदाटीनें माझ्या तेलाच्या घागरी फुटतील, तरी तूं प्रकाश करून मला वाट दाखीव. ज्यानें तुजबरोबर स्नेह लाविला, त्याला पुनः देह मिळणें नाहीं. तरी माझें द्रव्य सुगंध स्नेह त्यानें आपला देह शोभवून माझा मोह दूर कर. असें ऐकून श्रीहरीनें धांवत जाऊन मार्गात प्रकाश केला व सुखानें स्नेह चालीव असें सांगितलें. असें मार्गांत कौतुक पाहून भीम श्रीहरीस काय बोलला तें ऐका.

# अध्याय ११ वा.

## वसुदेवबोध, कृष्णरुक्मिणीसंवाद व गोप गौळणीविनोद.

भीम ह्मणाला–कृष्णा! मला जें आश्चर्य वाटलें तें तुझ्या शिवाय कोणाला विचारूं ? न्हावीण, बुरडीण, तेलीण, दुष्ट कुंटीण व माळीण अशा मैत्रीणी करून तूं मला लाजत नाहींस. या तुला जशा जाणतात तशा आपल्या पतीस जाणत नाहींत. कृष्ण ह्मणाला–जर तुला आंगवण असेल तर स्वइच्छेनें यांतील एक स्त्रीरत्न घे. मग एका स्त्रीस ह्मणाला–दंतहीन, तूं भली दिसतेस तरी या वेळी भीमाला

माळ घाल. भीमानें ह्मटलें—ज्या कृष्णरत झाल्या त्या अन्य पुरुषाची वासना पुरी करणार नाहींत. ही जर मला वरील तर त्वरीत यमपुरीं जाईल. ज्या कामिनी कृष्णसंगती आहेत त्यांच्या मनांत सवतीमत्सर नाहीं. जांबुवंती, रुक्मिणी कृष्णाबरोबरच क्रीडतात कीं नाहीं ? मग देवांनीं भीमास सांगितलें—जें स्थान तूं श्रेष्ट पाहशील त्याचें रक्षण करून मजजवळ आण. त्यावेळीं [illegible]ावरून सुईण पडली. ती श्रीहरीस ह्मणाली—वसुदेव आणि [illegible]रून यांची मी सुईण आहे, पण जन्मकाळीं तूं मात्र [illegible] वदन पाहिलें नाहीं तरी माझा उद्धार कर. इतक्यांत [illegible] जवळ आला, तेव्हां भीमास कृष्ण ह्मणाला—हिला [illegible] उंटावर घाल. वडील मजकडे पाहात आहेत. तिला [illegible] उंटावर घातल्यावर दोघांनीं हात जोडून वसुदेवाजवळ अश्वमेधास धर्माकडे जाण्याची आज्ञा मागितली.

वसुदेव ह्मणाला—मला या भवसागरांत टाकून जातोस ! जा लौकर ये. पण मी वचन सांगतों ऐक. ब्राह्मणांस धन दे, व धर्माचें वचन ऐक. वेदसंपन्न व षट्शास्त्री ब्राह्मण आणि धर्मयुद्धांत कुशल, सुशील अशा क्षत्रियांस बरोबर ने. जे अभिमानी, स्त्रीआधीन, बढाईखोर, आत्मस्तवनी, वृद्ध, कामातुर, श्वशुरगृहवासी, अपुत्रिक, धन घेणारे, जुगारी, ऋतुकाळीं स्त्रीत्यागी, कुयोनींत रमणारे, व्यभिचारी, कृपण, दरिद्री, महापापी अशा नारीनरांस समागमें नेऊं नको, आणि व्यर्थ द्रव्यक्षय करूं नको. असें बापाचें वचन ऐकून चरणवंदन केलें.

तेव्हां भीम ह्मणाला—पुण्यवंतावर दया करशील यांत नवल काय ? पण पातक्यांवर कृपा केली पाहिजे. जसा वृक्ष पालकास व छेदकास सारखी छाया करितो, त्याप्रमाणें तूं जगाचा कल्पवृक्षः सर्वांवर कृपा करून जडजीवांस तारिलें पाहिजे. असें भीमाचें वचन ऐकून सर्व जनांनीं त्यास धन्यवाद दिला. मग वसुदेवानें कृष्णास आलिंगन देऊन, विरहदुःखानें मी आतां कसा वांचेन असें ह्मटलें. तेव्हां श्रीकृष्णानें सांगितलें—तुह्मीं दुःख करूं नका, मी लौकरच परत येईन.

नंतर श्रीकृष्ण पुढें चालले तों एक सुंदर सरोवर लागलें. त्यांतील दिव्य कमळ पाहून रुक्मिणीस जवळ बोलावून ह्मणाले—पहा ती कमलिनी ! तिला दिनकरनाथानें भोगिली, हत्तीहंसांनीं सेविली, तरी कामवासना तृप्त न होतां आतां भ्रमराशीं पडली आहे. पतिविरहानें म्लान व आगमनानें हर्षयुक्त होते; आणि मध्यें भ्रमराशीं शयन करिते. जळो या स्त्रियांचें असलें दुष्ट मन ! मी सूर्याची स्त्री, हा विचार न करितां भ्रमराबरोबर क्रीडा करते; अशी स्त्रियांची अघटित करणी आहे ! स्त्रिया बोलतील एक व करतील दुसरें ! पुण्य सांगून पाप आचरतील व पति सांडून परनर संतोषानें अखंड भोगतील. सर्पीण, वीज, हातांत धरवेल; पारा स्थिर होईल, परंतु स्त्रियांचें चंचल मन कोणत्याच उपायानें किंवा मंत्रानें आवरणार नाहीं ही चिखलापासून झाली ह्मणून दुष्टबुद्धि धरिली. जशी जन्मभूमि चांगली

असेल तसे उत्तमांकुर निघतील. जो स्त्रियांचा विश्वास धरतो त्यासारखा मूर्ख नाहीं.

असें ऐकून रुक्मिणी ह्मणाली-पद्मिणीसारखी पतिव्रता त्रिभुवनांत नाहीं. हरिस्वामीवांचून ती कांहींच जाणत नाहीं. नाथ पृथ्वीचें गमन करितो तेव्हां ती म्लान व उदयकाळीं हर्षित होते. हत्ती व हंस हे तिचे बालक पति जवळ असतांना ते जवळ आले तरी दूषण नाहीं. पति विदेशास गेला नसतां तान्हें मूल घेऊन शयन करावें. पतिविरहाग्निमुळें कमलिनी दग्ध झाली, तिच्या अंगसंगामुळेंच वाळ ( भ्रमर ) काळे झाले पण ते जीवापासून सुटले. आतां विरहज्वालेनें वांचली कशी ह्मणाल तर हृदयाचे ठायीं पतिचरणामृत आहे ह्मणून!

आतां जन्ममूळ सांगतें ऐका- देवांनीं त्रिविक्रम अवतार धरून गदाग्रानें ब्रह्मांडगोल फाडला. तेथें गंगाजल निघालें, त्यांत हरिचरण धुतले; त्या पंकापासून हिचा जन्म झाला ह्मणून ही पतिव्रता! आणि शुद्ध ह्मणूनच शिवानें मस्तकीं धरिली. पूर्वीं हरिपदानें पृथ्वी क्षीण झाली ह्मणून ती रजस्वला! तिच्यांत हरीच्या पायांचें पाणी पडलें. त्या पंकापासून इचा जन्म झाला. देवा, तुह्मांला पुष्कळ स्त्रिया ह्मणून मजकडे पाहात नाहीं, पण मी तुह्मांस पाहातें तशी पद्मिणी हरीस पाहते. अशी ही पतिव्रतांत धन्य होय, हिची करणी तुह्मांस कां भासली सांगा. असें ऐकून कृष्ण समाधान पावला. ती रात्र त्या सरोवरावर राहून श्रीहरि दुसरे दिवशीं सैन्यासह चालला.

श्रीकृष्ण आला, असें ऐकून गोकुळांतील हरीचे बाळ पणींचे मित्र पुढें आले. त्यांस श्रीकृष्ण प्रेमानें भेटला. त्या वेळीं गोपाळांनीं श्रीकृष्णाची विनोदलीला केल्यावर श्रीहरि त्यांच्या बरोबर आनंदानें नाचूं लागला. व त्यांस वस्त्रालंकार देऊन तोषविलें. हा सोहळा पाहून भीम खदखदां हांसला. नंतर गौळणी येऊन त्यांनीं श्रीकृष्णाच्या विनोदचेष्टा केल्या. देवानें त्यांसही वस्त्रालंकार देऊन पाठविल्या.

पुढें श्रीहरी यमुनातीरावर येऊन तंबू देऊन देवकी, यशोदा, रोहिणी यांस ह्मणाला तुह्मीं वसुदेवभगिनी, कुंती, अनुसूया, अरुंधती इत्यादिकांची सेवा करावी. मदनादिकांस सांगितलें—धर्मनंदन आदि राजांचें समाधान करावें. रुक्मिणी आदि स्त्रियांनीं पंचदीपांनीं धर्मराज ओंवाळून अयुत युवतींसह द्रौपदीची सेवा करावी. आतां मी पुढें जातों तुह्मीं भीमाबरोबर मागून या.

असें सांगून श्रीकृष्ण सेवकांसह पुढें जातांच याज्ञिक भेटले. त्यांचे चरण वंदन करून आशिर्वाद घेतले. पुढें संन्यासीगणांची भेट झाली. तेथून महानगरांत प्रवेशतांच वेश्यागण मिळाला. त्यांतील एक ह्मणाली—अग! या कृष्णनाथास धरा, हा दाता कामी व सदाचा स्त्रीलंपट आहे. दुसरी बोलली—हा नित्य मुक्त असून सोळा हजार स्त्रिया भोगतो. वहु पुत्रवान्,ज्याला पुराणपुरुष व निष्काम ह्मणतात त्याला स्त्रियांचे काय प्रयोजन! जर तुह्मीं समूळ काम सोडाल तरच तो सांपडेल. ज्यानें वक्र कुब्जा भोगिली तो काय ही स्त्रीमंडळी

सोडिल ! असें ऐकून कृष्ण पुढें हांसत चालला. नंतर बंदीजन पाहीले, त्यांनीं श्रीकृष्णाचें स्तवन केलें; तें ऐकून हरीनें आपल्या गळ्यांतील मुक्तमाळा काढून त्यांच्या गळ्यांत घातली पुढें अनुसाल्व अश्व हरण करील.

# अध्याय १२ वा.

## श्रीकृष्ण यादवांसह पांडवांची भेट व शामकर्णहरण.

श्रीकृष्ण नगर प्रवेशून पुढें चालला असतां एक श्रोत्रिय ब्राह्मण भेटला. त्याला नमन करून आशिर्वाद घेऊन पुढें निघाला, तों एक नर्तकी भेटली. तिचें बोलणें ऐकून वस्त्रालंकार देऊन राजगृहास आला. तों समोर विदुर भेटला, त्यास आलिंगन देऊन त्याचा हात धरून सभास्थानीं आला. तेथें धृतराष्ट्र, धर्म, अर्जुन, नकुळ, सहदेव, कुंती, सुभद्रा, द्रौपदी यांचीं क्षेमालिंगनें झालीं. मग धर्मानें विचारलें–कृष्णा ! सर्व परिवारासह आलासना ? कृष्ण ह्मणाला–वसुदेव व बळराम यांस नगरांत ठेवून सर्वांसह आलों आहें. मग धर्मानें अर्जुनाला दळभारासह सामोरें जाण्यास सांगितलें. कृष्ण अंतःपुरांत जाऊन द्रौपदीस ह्मणाला–बंधुजाया लाजतील व सत्यभामेचा गर्विष्ठपणा जाईल अशा स्वरूपानें नटून सामोरी चल. द्रौपदीनें ह्मटलें–कुरूपता आणि सुरूपता ही तुझीच सत्ता ! तूं साह्य असतां मला काय उणें आहे?

तेव्हां देवानें आपल्या हातानें द्रौपदीला सुंदर केली. मग अर्जुनादिक दळभार, द्रौपदी, सुभद्रा दासदासींसह निघाल्या. दोन्हीं सैन्यें एकत्र मिळालीं; वाद्यनादानें आकाश कोंदून गेलें. देवकीला धर्मानें वंदन करून आलिंगन दिल्यावर यशोदा, रोहिणी, कुंती, देवकी यांच्या भेटी झाल्या; द्रौपदी व प्रभावतीनें देवकीस वंदन केलें. सत्यभामा, रुक्मिणी, द्रौपदीस भेटल्या; अशा परस्परांच्या आनंदाच्या भरांत भेटी होतांच, यौवनाश्वानें देवकी व रुक्मिणी आदि स्त्रियांस नमस्कार केला. प्रद्युम्नादिक कृष्णपुत्रही भेटले, धर्मानें सर्वांस वस्त्रालंकार दिले. यादवपांडव सभास्थानीं व स्त्रिया पडद्याआंत बसल्या.

तेथें सत्यभामा द्रौपदीस ह्मणाली—तुझे पांच भ्रतार त्यांस वश कशी करतेस ? माझा पति तो एक मला वश होत नाहीं. तूं पांच आवरून आमचेंहीं निधान नेतेस, तरी पांचास शयनीं वंचून हृदयीं कसा धरितेस ? इतुकें करून कांहीं लज्जाही न वाटून निर्भय असतेस. त्यावर द्रौपदी ह्मणाली—तुमचें मन कपटी ह्मणून वश होत नाहीं. जेथें विषयअहंकार तेथें नारायण असत नाहीं. प्रथम षड्रिपु जिंकून मग पांच अमंगळाचा उच्छेद करावा ह्मणजे देव मनोमंदिरांत प्रवेश करील. पारिजाताच्या पुष्पांनीं वेष्टून पति नारदास दान दिला, तोही फिरून घेतला याची लाज वाटत नाहीं. हें आपलें निंद्यकर्म झांकून ठेवितां आणि दुसऱ्याचें उकरून काढितां ! असें ऐकून भामा कुंठित झाली.

नंतर सत्यभामेनें श्यामकर्ण पाहण्याची इच्छा कृष्णास कळविल्यावर, धर्माज्ञेनें दळभार सिद्ध होऊन अश्व मध्यभागीं सोडिला. त्याला पाहतांच सर्वांचें समाधान झालें. इतक्यांत असें अपूर्व वर्तलें कीं, त्याच संधींत तेथें अनुशाल्व दैत्य श्यामकर्ण धरावयास आला. त्यानें अश्व पाठीवर बांधून आपल्या सैन्यांत उड्डाण केलें, आणि सुसर नांवाच्या प्रधानास ह्मणाला-कृष्ण यादवांसह धर्मनगरांत आला आहे. त्यानें माझ्या बंधूस मारलें आहे, तरी आतां गृध्रव्यूह सैन्य रचावें ह्मणजे गरुड तेथें येणार नाहीं. मग त्या घातकर्त्या हरीला धरून मजजवळ आणा. जो अनंत अपराधी किंवा राजद्रव्यभक्षक असला आणि त्यानें हरीस धरून आणला तर त्याचे अपराध क्षमा करीन. त्याचा सखा अर्जुन त्यालाही धरून आणावा. त्याला धरण्याचा उपाय गांगेय, बळी, बिभीषण, ध्रुव, प्रल्हाद, नारद जाणतात, पण ते दूर राहिले. तर आतां आपणच जावें. असा निश्चय करून गृध्रव्यूहांत अश्व रक्षून चतुरंग सैन्यासह सिद्ध झाला. पुढें दोघांचें सैन्य मिळून युद्ध होईल.

# अध्याय १२ वा.

## पांडवअनुशाल्वदैत्ययुद्ध व कृष्णाचा पराजय.

श्रीकृष्ण धर्मास ह्मणाला-तुह्मां सर्वांस अनुशाल्वानें तृणसमान मानून श्यामकर्ण नेला; तरी आतां तुह्मीं सात्यकी वीरादि समस्तांनीं रथस्थ होऊन युद्धकौतुक पाहण्यास उभें

रहावें. मी, धृष्टद्युम्न, पार्थ, भीम आणि वृषकेतु युद्धास जातों. नंतर देवांनीं दारुक सारथ्याबरोबर रथ पाठवितांच, त्यांत श्रीकृष्ण बसून हातांत विडा घेऊन ह्मणाला—जो पुरुषार्थी असेल त्यानें अनुशाल्वाला धरून आणण्याचा विडा उचलावा. पण कोणी विडा उचलीना. मग प्रद्युम्नानें विडा उचलून रथांत बसला. कृष्णानें दुसरा विडा घेऊन त्याच्या साह्यार्थ वीर शोधिला. तो विडा वृषकेतूनें उचलून पण केला कीं, जर मी श्यामकर्ण न आणीन तर शूद्र ब्राह्मणीगमन करितां जें पाप होतें, तें माझ्या माथां बसेल. असें बोलून कृष्ण व धर्म यांस वंदून रथांत बसून प्रद्युम्नाच्या मागें निघाला.

रणांत येतांच प्रद्युम्न दैत्यास ह्मणाला—तूं पराक्रमानें अश्व चोरून आणलास, तरी तुझीं बाणानें खंडें करितों. असें ऐकून दैत्य हांसून ह्मणाला-अरे, तुझे कुसुमाचे बाण ते मज मेरूला कणासारखे आहेत. मग प्रद्युम्नानें पांच बाण सोडतांच, एक बाणानें अर्धमार्गांत त्यांचें खंडण केलें, आणि एकाच बाणानें कृष्णाजवळ उडविला. त्याला पाहतांच कृष्णानें सावध करून क्रोधानें ह्मटलें-अरे ऊठ, ही द्वारका नव्हे, हें धर्मनगर बरें! इतक्या वीरांदेखत तुला उडविलें! तोंड दाखविण्यास लाज वाटत नाहीं. तुला रुक्मिण प्रसवली तेव्हां शंबरानें चोरून नेलें त्याचवेळीं तुझा घात कसा केला नाहीं! तूं सिंहिणीच्या पोटीं कोल्हा जन्मलास! तुझ्या प्रतापानें मी निर्भय असेन अशी जी आशा होती तिचा भंग केलास! असें बोलून लाथ मारावयास

धांवला. हें पाहतांच भीम धांवत जाऊन ह्मणाला, हेंच काय तुमचें शहाणपण ! ह्मणून लाथ मारतां ? हा भयानें रण सोडून पळाला नाहीं, बाणानें उडाला ! तुह्मीं बलाढ्य ह्मणून कधीं पलायन केलें नसेल ? काळयवन पाठीस लागला तेव्हां मुचकुंद प्राणदाता झाला ? तूं परदुःख जाणत नाहींस. प्रद्युम्नाला अभिमान होता त्याचें देवांनीं निरसन केल्यावर भीमाचाही अभिमान हरावा ह्मणून ह्मटलें—आतां तूं दैत्यांस जिंक. मग भीम गदा घेऊन धांवत गेला आणि सर्व सैन्याचा निःपात करून दशदिशांस लाविलें.

असें पाहून वृषकेतु ह्मणाला—हें तुमचे मनास कां आलें ? पुत्रमुखांतील युद्धफळाचा पिता घांस घेतो. असें ऐकून जन हांसतील ! पुत्रास युद्ध फळ द्यावें कीं आपण खावें ? भीम ह्मणाला—जर फळें कठिण असलीं तर पित्यानें पिळून रस पुत्रमुखांत घालावा. असें भीम बोलत आहे तोंच दैत्यानें एका बाणानें भीमाला कृष्णाजवळ उडविला. त्याला पाहतांच कृष्ण ह्मणाला—भीमा, तुझें बळ कोठें गेलें ? हा हिडिंब नव्हे बरें ! मग कृष्णानें अभिमान धरून रथारूढ होऊन गमन केलें. दारुकानें रथ हांकतांच गरुड वर येऊन बसला तों वृषकेतु युद्ध करित होता.

दैत्यानें कृष्णास पाहतांच ह्मटलें तूं माझा बंधु मारलास तेव्हां मी जवळ नव्हतों. तुझ्या मुलाला व भीमाला उडविलें पाहिलेंस ना ? तसा तुला उडवितों. पण साधूच्या अभेद

मनाच्या ठायीं पलायन करशील तर मात्र तेथें कांहीं चाल- णार नाहीं. असें बोलून पांच बाणांनीं चार घोडे व दारुकास पाडलें. त्याबरोबर देव अदृश्य झाले. तेव्हां ह्मणाला-आधीं दर्शन देऊन अदृश्य कां झालास ? जर याला पातक कारण झालें असेल तर तें या जन्मीं केलेलं नाहीं किंवा माझ्या न- गरांतील शूद्र ब्राह्मणीगमन, कन्याविक्रय, रजस्वलाविवाह, पतिव्रतादिगमन, ऋतुस्नातसंग या पापांच्या अंशानें अदृश्य झाला असावा. मग त्याला पश्चात्ताप होऊन ह्मणाला-जो मला नारायणदर्शन करवील त्याला सुकृतधन देईन. मग कृष्णानें दर्शन देतांच दैत्यानें ह्मटलें, आतां बाण सोड. कृष्णानें तीन बाण सोडले त्यांचें एका बाणानें खंडण करून एका निर्वाण शरानें कृष्णास मूर्च्छित केलें. तेव्हां दारुकानें रथ धर्माजवळ आणिला. पांडवसैन्यांत हाहाःकार झाला.

नंतर सत्यभामा हांसून कृष्णास ह्मणाली-प्रद्युम्न पडतांच त्याला कठिण शब्द बोललेत आणि तुह्मी समर्थ असतां दै- त्यभयानें पळून कां आलेत ? तर समर्थांनीं केलें तेंच बरें. ह्मणून आतां उठून सैन्यास अभय द्यावें. मी चंडिका होऊन दैत्यवधार्थ जातें. असें ऐकतांच श्रीकृष्णास हांसू आलें. मां- झ्यापेक्षां माझे भक्त समरंगणीं धीर देणारे आहेत हें जनांस कळण्याकरितां देव लीला दाखवितो. पुढें वृषकेतु दैत्यास ध- रून आणिल.

# अध्याय १४ वा.

## अनुशाल्व शरण आला व यज्ञारंभ.

सत्यभामेचें वचन कृष्णाचे अंतःकरणांत खोचलें, मग रथांत बसून युद्धास निघाला. वृषकेतूनें कृष्णांस पाहतांच अनुशाल्वास ह्मणाला–अरे दैत्या ! उभा रहा. असें बोलून सात बाण सोडले. तें पाहतांच दैत्यानें दहा बाण वृषकेतावर सोडून चार बाणांनीं चार अश्व मारले. इतक्यांत सूर्यानें अरुणाबरोबर विजयरथ पाठविला; त्यांत बसून वृषकेतु पुनः युद्ध करूं लागला. नंतर त्या दैत्यास अकस्मात् कृष्णाजवळ धरून आणलें. तव्हां कृष्णानें वृषकेतूस भेटून आलिंगन दिलें. दैत्य सावध होतांच कृष्णचरणीं मस्तक ठेवून वृषकेतूस भेटून ह्मणाला–तूं वैरी नव्हेस, मित्र होय. तूं मला कमलनेत्र भेटविलास, त्यानें मी धन्य झालों. ज्यानें माझा बंधु मारला तोच हा गरुडध्वज ! आज सर्व वैर जाऊन मित्रत्व जोडलें. माझ्या बाणांस मान देऊन तूं लटकीच मूर्च्छना घेतलीस, अशा तुज भक्तकैवाऱ्यास पाहून मी धन्य झालों.

मग धर्माजवळ जाऊन दैत्यानें नमन केलें. धर्म ह्मणाला–आह्मीं पांच बंधु तसा तूं सहावा. आह्मांस सहाय्य करून अश्वाचें रक्षण करावें. दैत्यानें सांगितलें–हें शरीर धर्मकार्यास अर्पण केलें आहे. इकडे वृषकेतूनें सैन्य जिंकून श्यामकर्ण धर्माजवळ आणून दिला. मग सर्व सभास्थानीं बेऊन, भोजनें वगैरे झाल्यानंतर सर्वांस वस्त्रालंकार दिले. कृष्ण

द्वारकेहून आल्यास एकविस दिवस झाले. पुढें यज्ञारंभाची चैत्री पौर्णिमा येतांच, धर्मानें दीक्षा घेतली. श्यामकर्णाची पूजा करून सुवर्णपत्र मस्तकीं बांधलें आणि रक्षणार्थ अर्जुनाची योजना केली. त्याच्याबरोबर कृष्णपुत्र प्रद्युम्न, वृषकेतु, यौवनाश्व, अनुशाल्व सैन्यासह निघाले. अर्जुन सर्वांचा आशिर्वाद घेऊन रथारूढ झाला. कृष्णानें श्यामकर्णास दक्षिण दिशेस जाण्याचा संकेत केला. श्रीकृष्ण व भीमादिकांनीं अर्जुनाची बोळवण करून ते हस्तनापुरांत परतले.

इकडे श्यामकर्ण फिरत फिरत माहिष्मती नगरांत आला. त्या नगरीची रचना अवर्णनीय होती. तेथील नीलध्वज राजा प्रसिद्ध होता. त्याचा प्रवीर नामक पुत्र अंगनांसह वनांत क्रीडा करीत असतां, मदनमंजरी नांवाच्या तरुणीस राजपुत्र ह्मणाला—हीं फुलें पहा कशीं सुंदर आहेत, त्यांची माळ गुंफून माझ्या गळ्यांत घाल. मग ती फुलें तोडीत निघाली. श्यामकर्ण तिच्या दृष्टीस पडला तेव्हां तिनें पतीस कळविलें. मग प्रवीरानें श्यामकर्ण धरून पत्रिका वाचिली. तींत लिहिलें होतें कीं “ धर्मानें यज्ञानिमित्त घोडा सोडिला असून अर्जुन रक्षक आहे. जो बलाढ्य असेल त्यानें अश्व धरावा. त्याशीं अर्जुन युद्ध करून श्यामकर्ण सोडवील. ” अशी पत्रिका वाचतांच अश्व धरून नगरांत पाठविला, स्त्रियांचीही रवानगी केली, आणि सैन्य सिद्ध करून युद्धास उभा राहिला. पुढें दोन्ही सैन्यांचें युद्ध होईल.

# अध्याय १९ वा.

## नीलध्वज—आख्यान.

नंतर अनुशाल्व, पार्थ, यौवनाश्व व वृषकेतु अश्वशोधार्थ चालले. तो प्रवीर वीर दृष्टीस पडला. तो वृषकेतूस ह्मणाला—अरे धावऱ्या धावऱ्या काय पाहतोस ? श्यामकर्ण मी नगरांत पाठविला. युद्धसामर्थ्य असेल तर अश्व सोडवा. आधीं तूं युद्ध कर, मग पार्थ येईल. असें बोलून पांच बाण वृषकेतूवर सोडून सारथी व घोडे मारून नलिका बाणानें मूर्च्छित केला. तेव्हां अनुशाल्वानें प्रवीरास मूर्च्छित केलें. ही बातमी नीलध्वजास कळतांच तो सैन्यासह रणांत आला. त्याचें व पार्थाचें तुंबळ युद्ध होऊन, नीलध्वज खालीं पडला. थोड्या वेळानें सावध होऊन, जांवई अग्नीची योजना करून पार्थसैन्य जाळूं लागला. ह्मणून पार्थानें वरुणास्त्र सोडलें तरी अग्नि शांत होईना. तेव्हां अर्जुन विचारांत पडून, अग्नीची स्तुति करून ह्मणाला—धर्म तुझ्याकरितांच यज्ञ करीत आहे आणि तूंच जर सैन्यसंहार करशील तर यागसिद्धी कशी होईल ? खांडववन मीच तुला दिलें व तूं मला गांडीव दिलेंस आणि आतां निष्ठुर कां झालास ? तरी यज्ञास साह्य करावें.

इतकी कथा ऐकून जन्मेजय जैमिनीस ह्मणाला—गृहजामात जो अग्नि तो कनिष्ठ कर्म कसा आचरला आणि तो जांवई कसा झाला तें मला सांगा. जैमिनीनें सांगितलें—नील-

ध्वजाची स्त्री ज्वाळा, तिला स्वाहा नांवाची कन्या झाली. तिचें सुंदर स्वरूप पाहून बापास चिंता उत्पन्न झाली कीं, हिच्या योग्य वर त्रिभुवनांत दिसत नाहीं. मग त्यानें तिला चित्रपट दाखवून सांगितलें, यांतील वर पसंत कर. तो पाहून ह्मणाली—मला मानव वर नको; देवलोकीं वर शोधून आणावा. बापानें ह्मटलें—तर मग इंद्र वर तुला योग्य आहे. तेथें सर्व सुख तूं भोगशील. तो इंद्र स्त्रीलंपट आहे, त्याला बोलाविलें असतां तो त्वरित येईल. मुलगी ह्मणाली—बाबा ! हा शब्द तुह्मीं कां बोललेत ? असा तो पापरूपी झाडाचे वनासारखा मला नको. मी मानव न वरण्याचें कारण सांगतें ऐक—नवरा मेल्यावर अथवा जीवंतपणीं जी स्त्री परसंगी होते ती महानरकव्यथा पावते. प्रथम मानव पति भोगून मरण येतांच अग्निपुरुषाशीं शयन करावें लागतें, तोही व्यभिचार होय. ह्मणून मला त्या अग्नीस द्यावें. असें ऐकतांच सर्व स्त्रिया हांसून ह्मणाल्या—अगे तो सर्वभक्षक, सप्तजिव्हा, चतुःशृंगी, मेषवाहनी, स्पर्श होतांच जाळणारा, त्याच्याबरोबर एकांतगमन कसें करशील ! अशी तिची निर्भर्त्सना केली तरी तिला खेद वाटला नाहीं. ती ब्राह्मणांस ह्मणाली—कोणत्या उपायानें अग्नि प्राप्त होईल तें आचरण सांगा. ब्राह्मण ह्मणाले—शुद्ध होऊन पूजन करून केशर, कस्तुरी, चंदन, कापूर, अगर यांचें चूर्ण करून तीळ, क्षीर, तुपानें हवन करावें. असें ऐकून तिनें तसें व्रत करतांच अग्नि प्रसन्न होऊन ब्राह्मणरूपानें राजाजवळ कन्या मागण्यास आला.

राजा ह्मणाला- तिला अग्नि वर पाहिजे ह्मणून व्रत करीत आहे. ब्राह्मण ह्मणाला-मी तिच्या व्रतानें प्रसन्न होऊन अग्निच आलों आहें. असें ऐकतांच सभाजन ह्मणाले-राजा, याची परीक्षा करून मग कन्या द्यावी. हा कन्याभिलाषी ब्राह्मण असावा. प्रधानानें त्यास ह्मटलें-तूं आपलें स्वरूप दाखीव. तोंच त्याच्या तोंडांतून ज्वाळा निघाल्या, त्यांनीं प्रधानाच्या वस्त्राचें केंसासह दहन झालें. मग त्याची राजानें स्तुति करितांच तो शांत झाला. मग नीलध्वजाच्या बहिणीनें परिक्षा पाहण्यास घरांत नेतांच रूप प्रगट केलें, त्याबरोबर मंदिर भस्म होऊन तिचें वस्त्र जळालें, त्यामुळें ती नग्न धांवूं लागली.

राजास तो अग्नि असें कळतांच ह्मणाला-जर माझें घर सोडून जाणार नाहींस तर तुला कन्या देतों. येथें जे शत्रु येतील त्यांचें दहन कर. असें ऐकून प्रधान ह्मणाला-राजा ! हें अकार्य काय करितां ? याला घरीं ठेविला असतां हा आक्रांत करील; यास्तव त्याला आपल्या नगरास जाऊं द्या. राजा ह्मणाला-जांवई झाल्यावर त्याचें तेज राहाणार नाहीं. मग उत्तम मुहूर्त पाहून राजानें कन्यादान केलें व तो स्त्रीलोभानें राजाकडे राहिला. तोच पार्थाचें सैन्य जाळीत होता.

अर्जुनानें त्याचें स्तवन केलें तरी तो शांत झाला नाहीं. त्याला पार्थ ह्मणाला-हा कृतघ्न दुर्जन आहे घरजांवयाच्या स्वभावामुळें याची बुद्धि पालटली. नंतर अर्जुनानें नारायण अस्त्राची योजना करितांच शांत होऊन, पार्थाजवळ येऊन

आपला वृत्तांत सांगूं लागला आणि ह्मणाला–श्रीहरि जवळ असतां अश्वमेध कां मांडला ? तुह्मांस पूर्वकर्माचा भ्रम झालासा वाटतो, तरी आतां मी श्यामकर्णासह नीलध्वजास शरण येण्यास सांगतों.

नंतर अग्नि राजाजवळ गेला. त्याला राजा ह्मणाला–तुह्मी सैन्य दग्ध केलेंत, श्यामकर्ण आह्मीं आणिला, आतां हस्तनापुरास कसे जातां ? अग्नि ह्मणाला–राजा ! तूं व्यर्थ कां भुललास ? त्या पार्थापुढें तुझें कांहीं चालावयाचें नाहीं. यानेंच मला खांडववन दिलें. तरी श्यामकर्ण देऊन शरण जा. मग राजा राणीला 'श्यामकर्ण देऊं काय?' ह्मणून विचारावयास गेला. ती ह्मणाली–ज्याला जांवयानें मर्दन केलें त्याला भितां काय ? सैन्य नेऊन त्याला जिंका जा. तें ऐकून राजा युद्धास गेला. शेवटीं पार्थानें त्याचा पराजय केला. त्याला सारथ्यानें नगरांत नेला. राजा सावध झाल्यावर स्त्रीलोभानें मी अनर्थ केला असें ह्मणत पार्थाला शरण जाण्याचा निश्चय केला. राणी ह्मणाली–जर श्यामकर्ण द्याल तर मी प्राणत्याग करीन. राजानें ह्मटलें–रहा अथवा दूर जा, पण मी पार्थाची मैत्री करणार ! नंतर राजा श्यामकर्णासह पार्थास शरण गेला. तेथून अश्व पुढें चालला.

इकडे ज्वाळाराणी संतापानें भावाकडे जाऊन ह्मणाली–अर्जुनानें राज्य लुटून राजासही धरून नेलें; तरी आतां तूं साह्य करून मला राज्य दे. बंधु ह्मणाला–कांहीं काळानें राज्य प्राप्ति करून देईन, आतां तूं तेथेंच रहा. राणी बोलली–

आतांच जाऊन त्याला मारून मला राज्य दे असें ऐकून त्यास क्रोध येऊन ह्मणाला-आपलें घर बुडविलेंस आणि माझें बुडवावयास आलीस ? चालती हो येथून ! मग ती रडत गंगेपलीकडे जाण्यास नौकेंत बसली. तिच्या डाव्या पायास पाणी लागलें. तेव्हां ती ह्मणाली-हें अपवित्र पाणी पायास लागलें ! तें तिनें वस्त्रानें पुसलें. हें तिचें वचन ऐकतांच गंगा प्रगट होऊन, पापिष्ठे ! काय बोललीस. ह्मणून विचारूं लागली. ती ह्मणाली-हे अपुत्रिणी ! तुला सात पुत्र झाले. ते तूं पाण्यांत बुडविलेस ? नंतर ज्यानें मदनास जिंकिलें तो भीष्म होता. त्याला पार्थानें शिखंडीकडून मारविलें ! असें ऐकतांच गंगा खवळून पार्थास मारण्यास सिद्ध होऊन शाप दिला कीं, अर्जुना ! सहा महिन्यांत तुझा शिरच्छेद होईल. असें ऐकून ज्वाळा सुप्रसन्न झाली. मग ती अग्नींत दग्ध होऊन बाण होऊन बभ्रुवाहनाच्या भात्यांत पार्थवधार्थ राहिली. पुढें श्यामकर्ण शिळेस चिकटेल. त्याची अर्जुन मुक्तता करील.

# अध्याय १६ वा.

## श्यामकर्णस्तंभन व मुक्तता.

जैमिनी जन्मेजयास सांगतात-पुढें श्यामकर्ण पूर्व दिशेकडे निघाला, तों सह्याद्री पर्वत लागला. त्यावर वृक्षलतादि पशुपक्षी आनंदानें क्रीडा करित होते. तेथें एका सरोवरावर शिळा होती. तिला घर्षण करण्यास श्यामकर्ण गेला तों तेथेंच

चिकटून राहिला. मागून सेवक आले. त्यांनीं पाहतांच अर्जुनास सांगितलें. त्यानें पुष्कळ उपाय केले पण अश्व शिळेपासून सुटला नाहीं. मग सेवकास सांगितलें,तेथें कोणी तपस्वी असल्यास त्यास विचारूं! यास्तव शोध करून या. सेवकांनीं शोध करितां त्यांस सौभर ऋषीचा आश्रम आढळला. त्यांनीं पार्थास सांगतांच यौवनाश्व, वृषकेतु, सात्यकी, प्रद्युम्न, व अर्जुन आश्रमास गेले. त्यांनीं नमन करून ह्मटलें—महाराज! हस्तनापुरींचे धर्मराज, त्याचा बंधु मी अर्जुन, आह्मीं गोत्रवध केला ह्मणून पापनाशार्थ अश्वमेध आरंभिला आहे. त्याकरितां पृथ्वीपर्यटनास अश्व सोडून या वनीं येतांच शिळेशीं अश्वाचें स्तंभन झालें. तरी त्यास उपाय सांगावा. सौभर ह्मणाला—जेथें प्रत्यक्ष श्रीहरी आहे तेथें अश्वमेध कशाला? तो स्मरणमात्रानें प्राण्यांस निष्पाप करितो. त्याच्या विन्मुख यज्ञ करितां तरी दुखांत पडाल. तुह्मीं मायेनें भ्रमांत पडलां आहां.

नंतर अर्जुन ह्मणाला—आतां अश्वस्तंभनाचें कारण सांगावें. मग सौभर सांगूं लागला—एक उद्दालक नांवाचा ऋषि होता, त्याची स्त्री चंडीका. ती भ्रताराचें वचन मानीत नसे. आपल्या मनाप्रमाणें घरसंसार करी. तिला पतीनें सांगितलें, तूं अग्नीची सेवा कर ह्मणजे तुला उत्तम पुत्र होईल. ती ह्मणाली—मला पुत्राचें कारण नाहीं. एके दिवशीं तिचे जवळ कमंडलु मागितला तो तिनें फोडून टाकिला. एकदां सुखशयनीं ये ह्मटलें तेव्हां ती आंगण्यांत जाऊन उभी राहिली. त्यामुळें तो नेहमीं दुःखी असे. एके दिवशीं कौंडिण्य ऋषि

तीर्थयात्रेच्या निमित्तानें त्याच्या आश्रमास आला. त्यानें तुह्मांस पुत्र कन्या किती आहेत ह्मणून विचारिलें. त्यानें सांगितलें, मला कन्या पुत्र नाहींत. माझी कांता दुष्टभाषिणी आहे. तें मला दुःख सांगवत नाहीं. ती माझें वचन ऐकत नाहीं परंतु आतां पितृतिथि आली आहे ती शेवटास जाते कीं नाहीं, याबद्दल चिंता पडली आहे; यास्तव कांहीं विचार सांगा.

कौंडिण्य ह्मणाला-आजपासून तिला तूं कमंडलु देऊं नको, अग्निसेवा करूं नको, असें उलट सांगा ह्मणजे ती वश होईल. असें सांगून कौंडिण्य निघून गेला. मग तो स्त्रीस ह्मणाला-उद्यां श्राद्धदिन आहे तो मी करणार नाहीं. ती ह्मणाली-पितृतिथि मी सिद्धीस नेईन. त्यावर उद्दालकानें सांगितलें मी अंध पंगु कुष्टी ब्राह्मण जेवणास आणीन, तिनें ह्मटलें, मी वेदसंपन्न ब्राह्मण आणीन. असें पतीचें भाषण ऐकून ती पतीचे मनोगत पुरवूं लागली, आणि यथाविधी श्राद्ध केलें. नंतर तिला गंगोदकांत पिंड टाकण्यास सांगितलें असतां ते तिनें शौचकूपांत टाकिले तेव्हां त्यानें कोपून तिला शाप दिला कीं चंडिके तूं शिळा होऊन या वनांत पडशील आणि पार्थाच्या हातानें उद्धरशील. असें ऋषिवाक्य ऐकून अर्जुन ऋषिस नमन करून त्या शिळेस स्पर्श करितांच ती पूर्वरूप पावून पतिस्थानीं गेली व श्यामकर्णाची मुक्तता झाली. पुढें श्यामकर्ण चंपावतीस जाईल. तेथें दारुण युद्ध होईल.

---

# अध्याय १७ वा.

## सुधन्व्यास तप्त तेलाचे कढईत टाकलें.

पुढें अश्व चंपावती नगरींत जातांच तेथील हंसध्वज राजानें धरिला. त्याच्या दूतांनीं अश्वरक्षक पार्थ मागून येत आहे असें कळवितांच त्याला आनंद होऊन ह्मणाला–आजचा दिवस धन्य होय, जेथें पार्थ तेथें कृष्ण असें भगवद्गीतेंत वचन आहे. यास्तव मला कृष्णाचें दर्शन होईल. नंतर तो एकवीस हजार हत्ती, सात हजार महारथ, एक लक्ष अश्व, नवलक्ष पायदळ, एवढ्या सैन्याचा एक नायक, असे सत्तर सैन्यनायक; इतक्या सैन्यासह राजा नगराबाहेर आला. राजानें प्रजाजनांस सांगितलें कीं, दुंदुभीचा शब्द ऐकतांच नगरांत जो कोणी राहील त्यास तप्त कढईत टाकीन. नगरांतील स्त्रियाही उंच घरें, माड्या यांवर चढून विनोद करीत सैन्य पाहूं लागल्या. एकट्या सुधन्व्याशिवाय सर्व लोक बाहेर आले. सुधन्व्यानें सिद्ध होऊन आईचे चरण वंदून आज्ञा मागितली. तेव्हां आईनें सांगितलें बाळा ! विजय मिळवून मला वीरमाता असें नांव दे. सुधन्वा ह्मणाला–तूं चिंता करूं नको. मी कीर्तीचा दीप लावून श्रीकृष्णचरणीं ओंवाळीन. मग आईनें लिंबलोण करून आशिर्वाद दिला.

नंतर कुवला नांवाची बहीण सुधन्व्यास ह्मणाली–बंधुराया ! रणांत तूं पार्थासमोर विन्मुख होऊं नको, त्याला पाठ देशील तर माझ्या माथीं अपकीर्ति येईल; आणि

सासरीं दीर, जावा, नणंदा माझा उपहास करतील. यास्तव मी उंच नाकानें सासरीं वागेन असें कर. सुधन्व्यानें सांगितलें, तुला वीरभगिनी. म्हणतील असें करून दाखवितों. तेथून प्रभावती स्त्रियेकडे आला. तिनें पंचारती ओंवाळून म्हटलें–नाथा ! तुम्हीं युद्धास जातां परंतु अंतःकरणांत विचार केला नाहीं. निपुत्रिकास गति मिळत नाहीं, यास्तव मला यावेळीं भोगदान देऊन सैन्य निर्दाळणास जा. सुधन्व्यानें तिला पुष्कळ प्रकारें समजाविलें. परंतु तिच्या आग्रहास्तव भोगदान देऊन श्रीकृष्णदर्शनास निघाला.

इकडे हंसध्वज सेनापतीस विचारूं लागला, सुधन्वा अझून कां आला नाहीं ? त्यानें माझ्या आज्ञेचा भंग कां केला ? तो श्रीकृष्णाचा अव्हेर करून विषयसुखांत गुंग झाला आहे, तरी त्यास धरून आणून माझे पुरोहित शंख व लिखित ज्याप्रमाणें शास्त्रार्थ सांगतील त्याप्रमाणें तप्त कढईंत टाका. अशी आज्ञा होतांच सुधन्व्यास धरून आणून उपाध्याच्या मतानें त्यास कढईंत टाकले,तेव्हां त्यानें श्रीकृष्णाचा धांवा केला; त्याबरोबर तेल शीतळ होऊन सुधन्वा प्रफुल्लित दिसूं लागला. असें पाहतांच उपाध्ये म्हणाले–हा कपटी मंत्रौषधी जाणतो. इतकें बोलतांच तेल वर उसळलें. त्याची परीक्षा पाहण्याकरितां एक नारळ कढईंत टाकला. त्याचीं दोन छकलें होऊन दोनी उपाध्यांच्या कपाळावर बसलीं. असे जे हरिभक्तांची निंदा करितात ते क्लेश पावतात. नंतर हरिनामानें भक्त तरला असा सैन्यांत शब्द फुटतांच वीरांनीं जयजयकार केला. पुढें सुधन्वा बाहेर निघून युद्ध करील.

# अध्याय १८ वा.

## वृषकेतु, मदन, अनुशाल्व व सुधन्वा युद्ध.

तप्त कढईत सुधन्वा जशाचा तसाच पाहून लिखित ब्राह्मण दूतांस विचारूं लागला–याला जेव्हां कढईत टाकिलें तेव्हां यानें कोणाचें चिंतन केलें ? किंवा तोंडांत औषधमूळ घातलें ? दूत ह्मणाले–लिखितमुनी ! हा चक्रपाणीचें स्मरण करीत होता. तो त्याचा भक्तमहिमा ऐकून शंखाला भक्तास छळल्याबद्दल पश्चात्ताप होऊन देहान्त प्रायश्चित्तार्थ कढईत उडी टाकून सुधन्व्यास आलिंगन दिलें आणि ह्मणाला–भक्तराया ! कृपा करून मला तार, मी तुझा महिमा न जाणून दंड करविला. तरी अपराधाची क्षमा करून रथावर बसून युद्धयज्ञानें कृष्णार्जुनास संतोषित करावें. असें बोलून दोघे बाहेर निघाले. सुधन्व्यानें बापास नमन केलें. त्यानें आलिंगन देऊन कृष्णार्जुनास संतोषविण्यास सांगितलें. नंतर सुधन्वा रथांत बसला. राजानें श्यामकर्ण आणवून पद्मव्यूह रचून पार्थाची वाट पाहूं लागले.

इकडे अर्जुन प्रद्युम्नास ह्मणाला–आतां हंसध्वजास जिंकून श्यामकर्ण आणावयास मी युद्धास जातों, तुह्मीं येथें सावध असा. असें ऐकून प्रद्युम्न हांसून ह्मणाला–धर्मादिकासमक्ष कृष्णानें सांगितलें तें आठवतें ना ? मग विपरीत कसें करूं ? तरी मीच हंसध्वजास जिंकून अश्व आणितों. त्यावर वृषकेतूनें ह्मटलें मीच जातों. असें सांगून रथांत बसून

रणांत आला. त्याला पाहतांच सुधन्वा विचारूं लागला-तूं कोणाचा पुत्र व तुझें नांव काय? वृषकेतु ह्मणाला-मी कर्णाचा पुत्र, माझें नांव वृषकेतु! माझे पूर्वज पांडव होत. मग सुधन्व्यानें आपला पिता व नांव सांगितलें. पुढें उभयतांचें तुंबळ युद्ध होऊन वृषकेतु मूर्च्छित पडला. तोंच मदन धांवत आला, त्याच्या बरोबर युद्ध होऊन शेवटीं दोघे मूर्च्छित पडले, मग सुधन्वा सावध होतांच कृतवर्मा धांवत आला. सुधन्व्यानें त्याला पळावयास लाविलें. असें पाहून अनुशाल्वानें संधान धरून सुधन्व्यास मूर्च्छित केलें. त्यानें सावध होऊन अनुशाल्वास पाडिलें. अशा प्रकारें सुधन्व्यास जय प्राप्त झाला पुढें अर्जुन सुधन्व्याचें युद्ध होईल.

# अध्याय १९ वा.

## सुधन्व्याचा वध.

पांडवसैन्य दुःखी पाहून सात्यकी पुढें झाला. त्याचें व सुधन्व्याचें निकराचें युद्ध होऊन त्यांत सात्यकी मूर्च्छित पडला. त्याबरोबर पांडवसैन्यांत हाहाःकार झाला. तेव्हां पार्थ पुढें होऊन ह्मणाला---आतां माझ्या दृष्टीपुढून तूं कोठें पळशील? मी भीष्म, द्रोण, कृप, गुरुपुत्रादिक रणांत जिंकले! काळासारख्या दैत्यांस पळविलें; परंतु तुझा पराक्रम पाहून आश्चर्य वाटलें! सुधन्वा ह्मणाला-तूं वीर जिंकिलेस तेव्हां सारथी कृष्ण होता; त्याचें आश्चर्य तें काय? आतां तूं कृष्णाला व त्यानें तुला कसें सोडलें? याचें

आश्चर्य वाटतें. तरी आतां मी आपल्या बळानें श्रीकृष्णास तुझ्या साह्यास आणितों, कीं, जेणेंकरून पुरुषोत्तम संतोष पावेल. तुझा अश्व धरून हंसध्वज यज्ञ करील. तुला कृष्ण साह्य आला तरी त्यासही जिंकीन. असें परस्परांचें भाषण झाल्यावर ते युद्धास प्रवर्तले. एकमेकांवर अनेक शस्त्रास्त्रांचा मारा चालू केला; शेवटीं अर्जुन व्याकुळ होऊन त्यानें श्रीकृष्णाचा धांवा मांडला. तोंच श्रीकृष्ण येऊन सारथी झाला; असें पाहतांच सुधन्वा ह्मणाला—पार्था ! तुझा सारथी हरि आला. आतां मला जिंकावयास पण कर. पार्थानें ह्मटलें—जर तीन बाणांनीं तुझें शीर न उडवीन तर रौरव भोगीन. सुधन्व्यानें पण केला कीं,तुझे तीनही बाण न छेदीन तर आकल्पपर्यंत रौरव भोगीन. असे दोघांचे पण ऐकून तें कौतुक पाहण्याकरितां आकाशांत विमानांची दाटी झाली.

नंतर सुधन्व्यानें सात बाणांनीं कृष्णास विंधून तीन बाणांनीं पार्थास भेदला. दुसरे तीन बाण सोडून अश्वांसह रथ पश्चिमेस एक योजन उडविला. तेव्हां कृष्ण ह्मणाला—पार्था ! तूं पण व्यर्थ केलास. मला पूर्वीं विचारलेंही नाहींस. हें कार्य कसें सिद्धीस जाईल नकळे ! नंतर श्रीकृष्णानें सात दिवस गोवर्धन धरून गोकुळींचे जन रक्षिले; त्या पुण्यानें सुधन्व्यास बाण लागो असें ह्मटलें. तें ऐकून सुधन्वा ह्मणाला—या तुझ्या कृष्णपुण्यबाणाचें खंडण न करीन तर माझें पुण्यधन फुकट जाईल. असें सांगून अर्धचंद्र बाणानें अर्जुनाचा शर भूमीवर पाडला; त्यावेळीं देव घाबरा झाला.

मग कृष्णानें परशुराम अवतारांत ब्राह्मणांस यागांत भूमी-दान दिलें; त्याचें पुण्य पार्थाच्या बाणास दिलें. तेव्हां सुधन्व्यानें ह्मटलें-याचेंही खंडण न करीन तर वसिष्ठ-अरुंधतीचा वधदोष घडेल. शेवटीं त्याही बाणाचें खंडण केलें. अशा प्रकारें एकमेकांच्या बाणाचें खंडण करित असतां सुधन्व्यास "धन्य वीर" ह्मणूं लागले. मग पार्थाचे तीन बाणां-पैकीं दोन बाण सुधन्व्यानें छेदले; तेव्हां श्रीकृष्ण ह्मणूं लागले-आतां पार्थप्रतिज्ञा खरी न झाली तर मला भक्त-कैवारी कोण ह्मणेल ? नंतर तृतीय बाणास शिर उडवि-ण्याची कृष्णानें आज्ञा देतांच, पार्थाच्या शरानें सुधन्व्याचें शिर आकाशांत उडविलें. असें पाहून देवांनीं पुष्पवृष्टि केली. तें शिर श्रीकृष्णचरणावर येऊन पडलें. पुढें सुरथ व अर्जुनाचें युद्ध होईल.

# अध्याय २० वा.

## सुरथ अर्जुनयुद्ध व सुरथवध.

सुधन्व्याचें शिर कृष्णचरणीं पडतांच कृष्ण तें उचलून पाहूं लागला, तों मुखांतून ज्योति निघून कृष्णमुखांत शिरली. त्याच्या धडानें सेनेंत संहार केला. त्यालाही पार्थानें छेदलें. तें शिरकमल कृष्णानें हंसध्वजाचे रथावर टाकतांच हातांत घेऊन पुत्राचे पराक्रम आठवून तो शोक करूं लागला, तो अवर्णनीय होय. राजा पुत्रशोकानें धरणीवर गडबडां लोळूं लागला, तें सुरथ पुत्रानें पाहून ह्मटलें-ज्यानें अर्जुनास जिं-

कून श्रीकृष्णास संतोषविलें आणि कीर्तिचा ध्वज उभारून मुक्तिसदनांत प्रवेश केला, अशाचा शोक कां करतोस ? राजा ह्मणाला—शोक करण्याचें कारण, हें शिर कृष्णचरणीं लीन झालें आणि पुनः वियोग पावलें. मेल्याचा शोक करीत नाहीं व जीवंताचें सुख धरित नाहीं. परंतु हरिवियोगाचें दुःख मला झोंबलें, असें बोलून पुत्रशिर कृष्णरथावर टाकलें तें कृष्णानें आकाशांत झुगारलें; तोंच शिवगणांनीं रुंडमाळेंत नेऊन ठेविलें.

नंतर बंधुदुःखानें संतप्त झालेला सुरथ वीर सैन्यासह रणांत येऊन कृष्णास ह्मणाला—पुण्यसांठा खर्चून सुधन्व्यास वैकुंठास पाठविलास. आतां पुण्यराशि संपली, मग पार्थाचें रक्षण कसें करशील ? आणि मला कसा मारशील ? तें सांग. मी बंधूचा सूड घेतल्याशिवाय मागें जाणार नाहीं. असें ऐकून कृष्ण अर्जुनास ह्मणाला—याचे बरोबर रणांत उभें राहूं नये; हा सर्व वीरांचा घात करून तुलाही मारून अनर्थ करील. पार्थानें ह्मटलें—तूं हजार अनर्थांची होळी करणारा, तेथें सुरथाचा अनर्थ तो काय ? कृष्ण अर्जुनास बोलला—सुरथ दुसरी सृष्टि करील, त्याची ब्रह्मदेवासही चिंता आहे. पदरीं पुण्य होतें तें सुधन्व्यास दिलें. आतां केवळ पाप उरलें आहे, त्यामुळें मला भय वाटतें; तरी प्रद्युम्नादिक यासीं युद्ध करतील. असें बोलून प्रद्युम्नास सांगून ते दोघे रणभूमि सोडून तीन योजनें गेले.

सुरथ रणांत आला, तों कृष्ण—अर्जुन नाहींत. मग ह्म-णाला—देव पार्थास घेऊन पळाला, या बाळांबरोबर युद्ध

करून काय पुरुपार्थ ! तरी निश्चय केला कीं, यापुढील दळभारास यमनगर दाखवून मग पार्थाचा समाचार घेऊं. नंतर रणांत येऊन कृष्ण अर्जुन कोठें आहेत ? म्हणून विचारलें. प्रद्युम्नानें सांगितलें—आधीं आमच्याजवळ युद्ध कर; मग श्रीहरीस बोलाव. असें बोलून मदनानें बाण सोडले. शेवटीं सुरथानें सर्वांस कृष्णपार्थाजवळ पळविलें; ते दृष्टीस पडतांच मनास संतोष झाला. त्यांच्यावर असंख्य बाणांचा वर्षाव केला. अर्जुनही शर सोडूं लागून त्याच्या एकशें-आठ रथांचा चुराडा केला. सुरथाचे दोन्ही हात पार्थानें तोडले; तरी पार्थावर धांवत येई. मग चरण छेदले. शेवटीं देवदत्त बाणानें शिर उडविलें ते पार्थाच्या कपाळावर आपटलें, व तेथून उडून कृष्णचरणीं पडलें. कबंधाचीं शतखंडें केलीं. पुढें हंसध्वज व अर्जुनाचें युद्ध होईल.

# अध्याय २१ वा.

## हंसध्वज-कृष्णअर्जुनमैत्री व स्त्रीराज्यांत अश्वगमन.

जैमिनी जनमेजयास सांगतात—सुरथाचें शिर कृष्णानें हातीं धरितांच त्याच्या मुखांतून दिव्य ज्योति निघून कृष्ण-मुखीं शिरली. मग पार्थास ह्मणाला—सुरथ जितेंद्रिय व पुण्यात्मा होता. ज्यानें प्रतिज्ञावचन सत्य केलें असा वीर त्रिभुवनांत मिळणार नाहीं. पार्थ ह्मणाला—वज्रासारखें त्याचें शिर माझ्या कपाळावर आपटतांच मी रथाखालीं पडलों. तरी तें माझ्या हातांत दे, त्याच्या योगें माझा देह पावन होईल.

मग अर्जुनानें तें शिर हृदयाजवळ धरलें. नंतर देवानें गरुडास बोलावून तें शिर प्रयागांत नेऊन टाकण्यास सांगितलें. तेव्हां गरुडानें विचारलें–तुमच्या पदतीर्थाहून प्रयाग काय अधिक आहे ? देव ह्मणाला–प्रयागांत सर्व पावन होतात ह्मणून भांडारगृहीं ठेवण्यास पाठवितों. मग तें गरुड घेऊन चालला असतां, आकाशांत शिवपार्वतीनें पाहिलें. तोंच शिवानें शृंगीस आज्ञा केली कीं. गरुड प्रयागांत माझ्या भक्ताचें शिर टाकण्यास नेत आहे तें घेऊन ये, असें ऐकून शृंगी धांवत गेला.

तें पार्वतीनें पाहून शिवास ह्मणाली—गणास कोठें पाठविला आणि गरुडानें काय नेलें ? शिव ह्मणाला—पार्थानें सुरथ वधिला, त्याचें शिर कृष्ण आज्ञेनें गरुड प्रयागांत टाकण्यास नेत आहे तें रुंडमाळेंत ओंवण्याकरितां शृंगीस आणावयास पाठविलें आहे. त्याचा भाऊ सुधन्वा त्याचेंही शिर काल आणिलें आहे. इकडे शृंगी गरुडाजवळ शिर मागूं लागला तो तें देईना ह्मणून बलात्कारानें त्याच्या आंगावर धांवत गेला, तोंच गरुडानें आपल्या पक्षाघातानें त्याला आकाशांत उडविलें; तेव्हां तो शंकराजवळ येऊन पडला. त्यास पाहतांच पार्वतीनें विनोद मांडला. मग शिवानें नंदीस पाठविला. तो पवनगतीनें गरुडाच्या मागें जाऊन त्याला नाकाच्या श्वासानें आकाशांत भ्रमण्यास लाविला. तो सत्यलोक वैकुंठ कैलासादिक फिरला. शेवटीं दैवयोगानें प्रयागांत शिर टाकून पळाला. तें प्रयागांत पडावें तोंच नंदीनें

उचलून शिवाजवळ नेलें. त्यानें रुंडमाळेंत ठेविलें. गरुडानें कृष्णास वंदन करून झालेलें वृत्त कथन केलें.

सुरथ पडतांच हंसध्वज क्रोधाग्नीनें भडकून युद्धास सिद्ध झाला. त्यास कृष्णानें पाहतांच असें लाघव केलें कीं, रथाखालीं उडी टाकून भुजा पसरून त्यास भेटावयास गेला. असें पाहतांच राजानें उडी टाकून आलिंगन दिलें तेव्हां त्याचा शोक नाहींसा झाला. मग देवानें अर्जुनास भेटण्यास सांगितलें. नंतर पार्थास बोलावून दोघांचें क्षेमालिंगन करविलें. राजा ह्मणाला-देवा! तुझ्यासारखा स्वामी व पार्थासारखा बंधु जोडला, त्यामुळें मी धन्य झालों. तेथें कृष्ण पांच दिवस राहिला. राजानें सर्वांचा गौरव करून वस्त्रालंकार व भोजनें दिलीं. मग देवानें हस्तनापुरास धर्माजवळ जाऊन सर्व हकीगत सांगितली. पुढें श्यामकर्ण जातांच एक सरोवर लागलें, तेथील पाणी पितांच त्याला घोडीचें रूप प्राप्त झालें. पुढें दुसऱ्या तळ्यांतील पाणी घोडी पितांच वाघाचें रूप झालें. असें पाहतांच सर्व सैनिकांस व अर्जुनास चिंता उत्पन्न झाली.

जन्मेजयानें जैमिनीस प्रश्न केला कीं, त्या सरोवरांत पाणी प्याल्यामुळें अश्वाची घोडी व घोडीचा वाघ व पुनः श्यामकर्ण कसा झाला तें कथन करावें. मुनी ह्मणाला-त्या सरोवराचे तीरावर शंकर प्रसन्न होण्याकरितां पार्वती तप करीत असतां, एक दुष्ट दैत्य येऊन तिला ह्मणाला-तूं तप करून देह कां कष्टवितेस? मी कोटि मदनाहून सुंदर आहें,

मला वरल्यानें तुंला सर्व सुख व ब्रह्मांडांतील मनुष्य रत्न सहज प्राप्त होईल. असें एकतांच पार्वतीनें त्याला शाप देऊन भस्म केलें, आणि या उमावनांतील सरोवरांतील पाण्यास जो स्पर्श करील तो स्त्री होइल असा शाप दिला. आतां अश्विनीचा वाघ होण्याचें कारण असें कीं, कृतयुगांत एक मुनी नारायणाचें स्मरण करीत तीर्थें फिरत त्या सरोवरावर आला. तो स्नान करावयास तळ्यांत गेला; तोंच एका सुसरीनें त्याचा पाय धरला. मग तो आपल्या बळानें सोडविला. तेथील जल व जलदेवतेस ह्मणाला—'येथें जो पाणी पिईल तो वाघ होईल.' ह्मणून श्यामकर्ण व्याघ्ररूपी झाला. पुढें पुनः श्यामकर्ण असा झाला कीं, त्यावेळीं अर्जुन चिंतेंत पडून त्यानें विष्णु स्तवन आरंभितांच विष्णु प्रसन्न होऊन पूर्ववत् श्यामकर्ण केला.

नंतर अश्व स्त्रीराज्यांत आला. तेथें जे पुरुष जात ते त्यांस भुलून भोग भोगून महिन्याअंतीं मरत असत. जर गर्भ राहिलाच तर पुरुषगर्भाचा नाश होई व कन्येचा मात्र वांचत असे. तेथें अश्व जातांच स्त्रीसैन्य येऊन, एकीनें अश्व धरून नेऊन राणीस दाखविला. तिनें सुवर्णपत्रिका वाचून पाहून अश्व बांधून ठेविला आणि ह्मटलें—आतां पार्थ अश्व कसा नेतो तो पाहूं ! तें पुढें कथन केलें आहे.



# अध्याय २२ वा.

## प्रेमळाराणीचें हस्तनापुरीं गमन व भीषण राक्षसाचा वध.

जैमिनी सांगतात-स्त्रीमंडळीनें अश्व धरितांच पार्थ चिंतातुर होऊन पुढें काय विचार करावा अशा संकटांत पडला. इतक्यांत प्रेमळाराणीसह एक लक्ष स्त्रिया अश्वारूढ होऊन आल्या. त्यांनीं पार्थास पाहतांच ह्मटलें-तुह्मींचना मोठे योद्धे होऊन भीष्मद्रोणादिकांस जिंकिलें ? तरी मी तुझा श्यामकर्ण धरला आहे तो आपल्या पराक्रमानें सोडीव. मी तुझा सर्व वीरांसह गर्व भंग करीन. आधीं तुला नेत्रबाणानें विंधीन, त्यांतून तुझा प्राण वांचला तर बाण सोडीन. नंतर सर्व स्त्रियांनीं नेत्रकटाक्षांनीं वीरांस मोहित केलें. कित्येक जणींनीं आलिंगन, मुखचुंबन, कुचकुंभ हातीं दिले. त्यामुळें वीरांस वाटलें कीं आह्मांस कामराजानें वैभव दाखवून संसारांत धन्य केलें. अशा कामिनींस सोडून रणांत कोण मरेल ? हें स्वर्गसुखच प्राप्त झालें असें वीर बोलूं लागले. विश्वामित्रादिक ऋषि स्त्रीनादानें मोहिलें, तेथें मानवांचा पाड काय ? ब्रह्मा, विष्णु, महेश यांसही मदनानें भुलविलें! कनक व कांता यांपासून जो प्राणी सुटला तो द्विभुजाविष्णु जाणावा.

त्या कामजाळ्यांत सर्व सैन्य सांपडलें. फक्त अर्जुन व वृषकेतु मात्र सावध होते, पार्थास राणी ह्मणाली-तुला जिंकून निजदास करील, यास्तव आधीं रूपलावण्यमुख का

भोगीत नाहींस ? पार्थ ह्मणाला—तुझ्या संगानें मरण व अधः-पतन घडेल यास्तव मी तुझ्या आधीन होणार नाहीं. असें ऐकून प्रेमळा राणी हांसून बोलली—आह्मांस लोक अबला ह्मणतात पण ते ह्मणणारे मूर्ख होत. आह्मीं दृष्टिमात्रानें ब्रह्मादिकांस जिंकलें मग आह्मीं अबला कीं सबला ? अध-रामृताची वाटी बळेंच ओंठास लावून कोटी वीर मोहून सो-डले तेथें तुझा पाड काय ! असें तिचें वचन ऐकतांच अर्जुन शब्दबाणानें जर्जर झाला. मग त्यानें क्रोधानें मोहनास्त्र योजिलें. तें पाहून राणी हांसून ह्मणाली मीच मोहनास्त्राचें मूळ. तर तें तुझें अस्त्र मला काय करील ? असें ऐकून त्यांस वधण्याचा विचार केला. तोंच आकाशवाणी झाली कीं, पार्था ! स्त्रीवधानें कुळास कलंक लागेल, यास्तव यांशीं सख्य करून युक्तीनें कार्य साधून हस्तनापुरास पाठ-वावें. अशी आकाशवाणी ऐकतांच पार्थास संतोष होऊन तो प्रेमळेस ह्मणाला—तुझ्या मनांत काय आहे ? तिनें सांगि-तलें—माझें रूपयौवन भोगण्याकरितां तूं मला वर. पार्थ बोलला—मी व्रतस्थ आहें, यागकर्म समाप्त झाल्यावर तूं सांग-शील तें करीन, याकरितां माझ्या नगरांत चल. मी तुला मनोभावानें वरिलें आहे, तरी सहा महिने धैर्य धर. इतर स्त्रियांसही तेथें भ्रतार मिळतील. तें वचन तिला मान्य होऊन श्यामकर्ण सोडून स्त्रीमंडळासह हस्तनापुरास गेली.

इकडे श्यामकर्ण पुढें चालला तो वृक्षसृष्टि देशांत आला. तेथें वृक्षांपासूनच मनुष्यें, हत्ती, रथ, घोडे यांची उत्पत्ति

होऊन प्रातःकाळीं बाळपण, दुपारीं तरुणपण व सायंकाळीं मरण प्राप्त होत असे. त्यांचे कान हींच आंथुरणें, एक नेत्र एक चरण, लांब नाक व घोड्यासारखीं तोंडें असे लोक त्या देशांत होते. असे पुष्कळ देश ओलांडून अश्व भीषण राक्षसाच्या देशांत आला.तेथें तीन कोटी राक्षस भयंकर स्वरूपाचे वास करीत होते. त्या भीषणाचा मेदोह नांवाचा उपाध्या होता; त्यानें अश्व पाहतांच भीषणास ह्मणाला—तुझा शत्रु अर्जुन सैन्यासह श्यामकर्ण घेऊन आला आहे. याचा भाऊ भीम यानें तुझा बाप बक याचा वध केला. तरी याला धरून नरमेध यज्ञ करून आह्मां ऋषीगणांस गज, अश्व, नर यांच्या मांसाचें भोजन घालून तृप्त करावें. पूर्वी रावणानें नरमेध केला तेव्हां आह्मीं सर्व राक्षस तृप्त झालों. तेव्हांपासून आह्मांस उपवास घडला आहे. भीषण ह्मणाला–तुह्मीं सांगाल तसें करीन व अर्जुनास धरीन. तुमच्या तृप्तीकारितां यज्ञास काय सामग्री पाहिजे ? गुरु ह्मणाला–मला अश्व गज यांचे नेत्र व हजार नरांचा आहार पाहिजे. इतर जे ते अल्पभोजनी आहेत. नंतर यज्ञमंडप घातले. भीषण तीन कोटी राक्षसांसह पार्थावर निघाला. राक्षसिणी पर्वतांवर चढून सैन्य पाहून भयाभीत झाल्या. एक बोंब मारून ह्मणाली— अरे पळारे पळा, तो पाहा लंका जाळणारा वानर ! त्याला अशोकवनांत सीतेजवळ मी पाहिला होता. तेव्हां पर्वतासारखीं ज्यांचीं पोटें, एक कोस लांब मान, चार कोस लांब तोंडें अशा राक्षसिणी ह्मणूं लागल्या–अगे भितां कशाला ?

त्या वानरांस दाढे खालीं रगडूं. एक ह्मणाली—माझे विशाळ स्तन चार कोस पाठीवर टाकलेले आहेत, त्यांच्या घर्षणानें वृक्ष मोडून पर्वत कोसळतात, त्या स्तनांनीं पांडव व मारुतीस क्षणांत मारीन. दुसरी ह्मणाली—माझे आठ कोस लांब स्तन आहेत, त्यांनीं सर्वांचें पिष्ट करीन. तिसरी राक्षसीण बोलली—मी सर्व सैन्य योनींत सांठवीन.

अशा त्या राक्षसिणी बोलून त्यांनीं स्तनानीं सैन्यास जर्जर केलें. मग भीषण पार्थास ह्मणाला—आतां तुला सैन्यासह मारून भीमासही मारतों. मी जवळ नव्हतों; ह्मणून माझ्या बापाला भीमानें मारलें. असें बोलून पार्थसैन्याचें कंदन करूं लागला. तेव्हां अर्जुनानें बाण सोडले तरी आटपत नाहीं असें जाणून मारुतीनें पुच्छानें राक्षसिणींस बांधून भूमीवर आपटून समुद्रांत फेंकून दिलें. अर्जुनानें दोन कोटी राक्षस मारले. नंतर भीषण कपटवेषानें मुनी-होऊन शिष्यमेळ्यासह गंगेच्या तिरावर अध्ययन करित बसला. तेथें पार्थ सैन्यासह जलप्राशनार्थ गेला, त्याला कपटमुनी ह्मणाला—आह्मां ब्राह्मणांस राक्षस विघ्नें करितात तरी त्यांचे निवारणार्थ आमच्या मठांत राहावें. मजजवळ कोट्यानकोटी विद्या आहेत त्या तुला सांगेन. तेथें पार्थानें कृष्णस्मरण करितांच त्याचें कपट कळलें, त्याबरोबर खड्ग काढून भीषणाचें व पुरोहितांचें शिर उडाविलें आणि राक्षसांचा संहार केला. नंतर त्याचें नगर लुटून अनेक वस्तु घेऊन पुढें गमन केलें. नंतर बभ्रुवाहनाचें मणिपूर नगर लागलें. तें

वैकुंठ किंवा इंद्रभुवनासारखें सुंदर दिसत होतें. तेथील लोक भक्तिवान् व धार्मिक होते. तेथें अश्व जातांच अर्जुनानें हंसध्वजाला हें कोणचें नगर ह्मणून प्रश्न केला. तेव्हां हंसध्वज वभ्रुवाहन आख्यान सांगूं लागला.

# अध्याय २३ वा.

## बभ्रुवाहन व प्रद्युम्नाचें युद्ध.

अर्जुनास हंसध्वज ह्मणाला येथें बभ्रुवाहन नांवाचा राजा भगवद्भक्तिपरायण व नित्य ब्राह्मणपूजा करणारा असा राहतो. त्याचा सुमति नांवाचा प्रधान विवेकी, सत्यवादी व जितेंद्रिय आहे. यांनीं जर अश्व धरिला तर महासंकट ओढवेल. असें ऐकतांच अर्जुन स्तब्ध झाला. तोंच पार्थाच्या रथावर गिधाड येऊन बसलें. तें पाहतांच सर्व वीरांस दुश्चिन्ह भासलें. इकडे बभ्रुवाहनाला सेवकांनीं महाद्वारांत श्यामकर्ण आल्याचें कळविलें त्यानें हुकुम देतांच वीरांनीं अश्व धरून नेला. तेव्हां अस्तमान होतांच राजा सभेंत बसला; तेथें श्यामकर्ण आणितांच सर्वांनीं पाहून आनंद पावले. त्याच्या मस्तकावरील पत्रिका वाचून राजा प्रधानास ह्मणाला—हा धर्माचा श्यामकर्ण! याचा रक्षक पार्थ आहे.आतां काय उपाय करावा? हें संकट प्राप्त झालें आहें. वीरांनीं विचारलें—महाराज! हें संकट कसें तें आह्मांस सांगावें.

राजा सांगूं लागला—जो कुरुकुळदीपक, ज्याचा सारथी कृष्ण, तो पार्थ माझा बाप, त्याचा हा श्यामकर्ण आहे. लहा-

नपणीं माझी आई बापाचे घरीं असतां; नाचतांना ताल चुकली ह्मणून बापानें शाप दिला कीं, तूं जलचर होऊन सरोवरांत पडशील. तेव्हां तिनें उःशाप मागतांच ह्मणाला— अर्जुन तीर्थयात्रा करित या सरोवरांत स्नान करण्यास येईल तेव्हां त्याचे चरण धर ह्मणजे दिव्यदेह पावून त्याला वरशील; मग ती जलचर होऊन पडली. पुढें अर्जुन स्नानास येतांच चरणस्पर्शानें दिव्य देह पावली. तिनें पार्थास पूर्ववृत्तकथन केलें. मग त्याला मंदिरांत आणून विवाह केल्या. नंतर गर्भ राहून तेथें माझा देह जन्मला. असा तो पार्थ माझा पिता होतो. तरी आतां त्याशीं झुंजावें किंवा शरण जावें तें मला सांगा. सुमती ह्मणाला—श्यामकर्णासह जाऊन पितृवंदन करून अश्वरक्षणास जावें.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं राजानें सैन्यासह श्यामकर्ण घेऊन जाऊन अर्जुनाच्या चरणावर मस्तक ठेविला. सर्वांच्या क्षेमालिंगन भेटी झाल्या. नंतर बभ्रुवाहन ह्मणाला- स्वामी! माझें वचन मान्य करावें. माझी चित्रांगीपासून तुमचे तीर्थयात्रेच्या प्रसंगीं उत्पत्ति झाली. मी तुमचा पुत्र होय माझें नांव बभ्रुवाहन. मी श्यामकर्ण धरिला हा अपराध क्षमा करावा. असें बोलून पुनः चरण धरिले. नंतर प्रद्युम्न व हंसध्वजादिक राजांनीं पुत्रास प्रेमालिंगन द्यावें असें अर्जुनास सांगितलें. असें ऐकून अर्जुनास संताप चढून, पुढें जें होणार त्याप्रमाणें बुद्धि आठवून, त्यानें पुत्रास लाथ मारून ह्मटलें—अरे, तूं भित्रा व दुर्मती, नर्तकी चित्रांगदेचा

नंदन पार्थवीर्याचा नव्हेस. आधीं अश्व धरून मग भीतीनें कां सोडलास ? माझा सुभद्रेपासून झालेला महाबळी पुत्र अभिमन्यू धन्य होय. त्यानें भीष्मद्रोणादिकांस जर्जर करून चक्रव्यूह भेदून धर्मनंदनाचें रक्षण केलें ! तूं बळ न दाखवितां जंबुक झालास ! नर्तकी गंधर्वकन्या तिजपासून जन्मलास ! तरी नटवर होऊन राज्य टाकून तंतुवाद्य हातांत घेऊन कमरेला मृदंग बांधून राजसभेंत नर्तकी नाचीव जा. तूं कुळांत अधम जन्मून क्षत्रियधर्म जाणला नाहींस !

असें बापाचें वचन ऐकतांच बभ्रुवाहनास क्रोध चढून ह्मणाला–पार्था ! तुझे सर्व अपराध मी सहन केले, परंतु मला वेश्यानंदन बोलून माझ्या आईची निंदा केलीस; यास्तव तुझ्या गर्वाचें हरण करितों. तूं महारथ्यास जिंकलेंस तेथें तुझा कृष्ण सारथी होता, आतां तुझा क्षत्रियपणा पाहतों. नंतर असंख्य सैन्याची तयारी करून बभ्रुवाहन रणांत येऊन पार्थास बोलावूं लागला. तेव्हां अनुशाल्व सिंहासारखी गर्जना करून धांवला. उभयतां बलाढ्य वीरांनीं एकमेकांवर अनेक शस्त्रास्त्रांचा मारा केला. शेवटीं अनुशाल्वास मूर्छित पाडला. मग वृषकेतु उठला; त्याला मागें सारून प्रद्युम्न पुढें झाला. त्या दोघांचें तुंबळ युद्ध सुरू झालें, रक्तांच्या नद्यांतून नरमस्तकें वाहूं लागलीं. दोघांही अनिवार वीरांनीं परस्परांच्या सैन्याचा संहार केला, तरी ते दोघे मागें हटले नाहींत. मग बभ्रुवाहन कोपून दारुण युद्ध करूं लागला.

# अध्याय २४ वा.

## बभ्रुवाहन व प्रद्युम्न युद्ध.

त्या युद्धांतील रक्ताच्या नदींतील प्रेतें श्वापदें काढून भक्षित होतीं. भूत भैरव वेताळादिकांचीं मांस भक्षणार्थ भांडणें चाललीं होतीं. इतकें मदनानें सैन्य मारतांच बभ्रुवाहनास क्रोध चढून मदनाच्या सैन्यांतील रथ, ध्वज, सारथी, अश्व, पायदळ यांचा क्षय केला. तेव्हां मदनसैन्यास प्रळयकाळ वाटला. मग मदनानें दुसरा रथ घेतला. तोही बभ्रुवाहनानें छेदून टाकला. असे मदनाचे वीस रथ मोडले. असे दोघेही बळी एकमेकांस न आटोपून सिंहासारखी गर्जना करीत युद्धकौशल्य दाखवीत होते. पार्थपुत्रापुढें कोणीही येईनासा झाला. इतक्यांत अनुशाल्व सावध होऊन धांवला. त्याच्या मागून नीलध्वज, यौवनाश्व, प्रद्युम्न, हंसध्वज, वृषकेतु इत्यादिकांनीं पार्थपुत्रास वेढा घातला. त्यांच्यावर पांच पांच बाण सोडून सर्वांस मूर्च्छित केलें. कित्येक वीर नग्न पळाले, त्यांस लांडग्यांनीं भक्षण केलें. जे वीर रणांत पडले त्यांस स्वर्गकामिनींनीं भोगून दोन्ही देहांचा अनुभव घेऊन संग्राम धन्य ह्मणूं लागल्या. अशा प्रकारें पार्थसुतानें सर्व वीरांस मारून वैकुंठास पाठविलें. मदनादिकांस मूर्च्छित करून ठेविलें. अशा त्या नरकेसरीनें पार्थसैन्याचा संहार करून आपण स्वनगराच्या द्वारांत गर्जना करीत उभा राहिला. पुढें जैमिनी लवकुशाख्यान सांगेल.

# अध्याय २९ वा.

## श्रीरामचरित्र.

जैमिनी ह्मणाला—जन्मेजया ! त्रेतायुगांत जसें लव-कुश व श्रीरामाचें युद्ध झालें, तसें पार्थ व बभ्रुवाहनाचें झालें. असें ऐकून जन्मेजयानें विचारिलें, भक्तकामकल्पद्रुम जो श्रीराम त्यानें पुत्राबरोबर युद्ध कां केलें ? आणि रामपुत्रांनीं जाणून किंवा न जाणून पितृचरण वंदिले ? मुनी ह्मणाला श्रीरामानें आपले पुत्र जाणून, आपणासह बंधू, वानर व वीर यांचा गर्वहरण होण्याकरितां व पुत्रांना पराक्रम कळण्यासाठीं पुत्रहस्तें लीला दाखविली. पुत्रांनीं आह्मी केवळ सीतेचेच पुत्र समजून बापास न जाणून संग्रामांत बापाची पूजा केली. संसार हाच रावणरूपी रोग, त्यानें जग व्यापिल्यामुळें आत्मारामानें दृष्टीनें पाहून सद्भाव दशरथ व सद्भक्ति कौसल्येच्या पोटीं जन्म घेतला. धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे चौघेजण बंधु रविकुळांत जन्मले, त्यामुळें दशवदनाशिवाय सर्व त्रिभुवनास आनंद झाला. नामस्मरण व मंत्र मात्रेच्या उच्चारानें भवरोग पळून गेले. प्रथम अविद्या ताटिका वधून, विवेक विश्वामित्रयज्ञ रक्षून चरणानें अहिल्येचा उद्धार करून श्रीराम सीतास्वयंवरास गेला, व धनुष्य उचलून चापास बाण लाविला. परशुरामाचा अहंकार छेदण्याकरितां धनुष्याचा भंग केला. तें धनुष्य पापानें त्रासलें होतें त्यामुळें मन पश्चात्तापानें तापलें तें पाप कोणतें ह्मणशील तर ऐक.

शिवानें ब्रह्मदेवाचा शिरच्छेद करून मनभाव जाळला आणि परशुरामानें मातृवध करून क्षत्रियांचा संहार केला. असे दोघे पापी, त्यांच्या संगतीनें आग्रास पाप जडलें असें धनुष्य ह्मणत होतें. तरी आतां रामाच्या हाताचा स्पर्श होतांच मुक्ति पावेन ह्मणून त्यानें देहाचें पुरश्चरण केलें. असें तें चाप रामानें मोडून निष्काम जानकीस वरिली. भार्गव अहंकार हाच दैत्य भंगून बाणानें त्याची स्वर्गगति रोधिली, आणि अयोध्येस येऊन सुजनांस क्रीडा [illegible] लागला. पितृआज्ञा वंदून धैर्य लक्ष्मणास घेऊन निष्कामवृत्ति सीता पुढें करून अरण्यास निघाला. [illegible] वानरदळ मिळवून अहंतासिंधूंत सेतु बांधून लिंगदेह लंका घेऊन अहंच रावणास मारला. इंद्रजिताचा वध करून सीता सोडविली. देवांस बंधमुक्त करून त्रिभुवनांत कीर्ति केली. लंकेंत बिभीषणास स्थापून सीतेस शुद्धि देऊन, सर्व सैन्यासह नंदिग्रामीं भरतास भेटला. शत्रुघ्नास क्षेम देऊन सर्वांसह अयोध्येंत येण्यास निघाला. वसिष्ठादिकांस भेटल्यावर कौसल्या, सुमित्रा, कैकयी यांस क्षेमालिंगन दिलें. सर्वांच्या भेटी होऊन आनंदी आनंद झाला. नंतर वसिष्ठानें राज्यावर बसविलें. बिभीषणादिकांस गौरवून नगरांत पाठविलें. श्रीराम राज्यावर बसतांच आधिव्याधी, दरिद्र जाऊन घरोघर समृद्धि झाली. रामानें सर्वांस दानानें तृप्त केलें. असें श्रीराम राज्य करित असतां पुढें काय वर्तलें तें ऐका.

# अध्याय २६ वा.

## श्रीरामचरित्र.

श्रीरामानें नऊ हजार वर्षें राज्य केल्यावर " पोटीं पुत्र असावा " अशा चिंतेंत दोघेंही पडलीं असतां, एकेकाळीं श्रवणनक्षत्रावर सीतेस गर्भ राहिला. तो दिवसें दिवस वाढत असतां पांच महिने झाले. एके दिवशीं रामाला स्वप्न पडलें कीं, सीता गंगातीरावर रडत आहे. मग तें स्वप्न गुरूजीस सांगून ह्मटलें—सीतागर्भास विघ्न आलें. तरी हवन करावें, नंतर गुरूजीनें वैशाखशुद्ध पंचमीचा मुहूर्त काढला. रामानें लक्ष्मणाला जनक, विश्वामित्रादिक ऋषि, राजे यांस सीतागर्भाधानास आणावयास पाठविलें. वसिष्ठानें यज्ञसामग्री सिद्ध केली, तोंच लक्ष्मण सर्वांस घेऊन आला. रामानें सर्वांस क्षमालिंगन दिलें. ऋषिआज्ञेनें श्रीरामानें पुण्याहवाचन करून सीतेसह होम केला. ब्राह्मणांस दिव्यान्नें व दक्षणा दिल्या. सर्वांस वस्त्रालंकार देऊन संतोषित केलें. रथ, अश्व, गजांचीं दानें दिलीं. जनक वैराग्य पावून रामास राज्य देऊन वनास गेला. सर्व आपापल्या स्थानीं गेले.

एके दिवशीं रात्रीं सुखशयनावर रामानें "तुला काय आवडतें" ह्मणून सीतेला विचारलें. सीता ह्मणाली—सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत परंतु गंगातीरावर ऋषिस्त्रियांत जाऊन रहावें असें वाटतें. असें ऐकून श्रीरामास आश्चर्य वाटून

मनांत ह्मणाले—चौदा वर्षे वनवास भोगिला तरी अजून इच्छा पुरली नाहीं. मग तुला उद्यां गंगातीरास पाठवितों असें सांगितलें.

नंतर रामानें गुप्त हेरांस विचारलें कीं, तुह्मी नगर फिरून आलेत, तरी लोक मला किंवा माझ्या स्त्रियेस काय ह्मणतात ? दूतांनीं सांगितलें—श्रीरामा ! आह्मीं रात्रीं फिरत असतां एका रजकाची स्त्री चार दिवस बापाकडे गेली होती, तिला तिच्या बापानें नवऱ्याकडे पोंचविण्यास आणिली. तेव्हां तो रजक ह्मणाला—' रामाची स्त्री सहा महिने राक्षसाकडे होती, तिचा रामानें अंगीकार केला, तसा मी श्रीराम नव्हे ! तो पडला राजा, त्याला सर्व कांहीं चालतें, पण आह्मीं दुर्बळ लौकिकास भितों. असें दूतवचन ऐकून राम चिंतेत पडून ह्मणाला—सितेनें अग्नींत दिव्य घेऊन निष्पाप झाली, तरी लोकापवाद आहेच. यास्तव तिचा त्याग करून लोकापवाद रक्षावा.

प्रातःकाळीं सूर्योदय होतांच, सेवकादिक बंधुजन रामाच्या दर्शनास आले. त्यांनीं रामास चिंतातुर पाहून परस्पर बोलूं लागले कीं, राम सकोप कां झाला ? आमचेकडून कांहीं सेवेंत अंतर पडलें कीं काय ? असें बोलून रामपाउलें वंदन करून हात जोडून, आमचेवर क्रोधदृष्टि करून बोलत कां नाहींस ? असा बंधूंनीं प्रश्न केला. मग श्रीराम सांगूं लागले—

---

# अध्याय २७ वा.

## श्रीरामचरित्र-सीतात्याग.

जैमिनी ह्मणतात-जन्मेजया ! रामकथा श्रवण कर. रामानें बंधुवचन ऐकून दूतवार्ता सांगून सीतेचा त्याग करितों असें ह्मटलें. भरत ह्मणाला-तुह्मीं हें काय मनांत आणलेंत ? तुह्मांस लोक कृपालु श्रीराम ह्मणतात. कसायापासून गाय सोडवावी आणि तिला दुष्टस्पर्श झाला ह्मणून वनांत सोडावी कीं काय ? सीता अग्निमुखीं शुद्ध झाली हें पितृवचन विसरलेत काय ? हिच्यासारखी सृष्टींत पतिव्रता नाहीं. असें ब्रह्मादिकांचें वचन कानांनीं ऐकलंत ना ? मग असा अजाणपणा कां करितां ? राम ह्मणाला-तूं ह्मणतोस तें खरें. पण जननिंदेचें दूषण राजास लागतें. भगीरथ, पुरुरवा, ययाति, इक्ष्वाकु, हरिश्चंद्र यांची कीर्ति जन वर्णन करीत आहेत; स्त्री, पुत्र, बंधु ज्याला प्रिय त्याला अपयश येतें. कीर्तिस्तव राज्य, धन व प्राण सोडितात; ह्मणून कीर्ति रक्षण करून सीतेचा त्याग करितों.

असें ऐकतांच लक्ष्मण क्रोधानें हात चोळीत ह्मणाला-लोकापवादानें सीता त्यागणें हें मूर्खत्व होय. बायकोजवळ आईनें कलह केल्यास सुज्ञांनीं टाकावी काय ? म्लेंच्छांनीं वेदनिंदा केली ह्मणून ते ब्राह्मण टाकतात काय ? जो सीतेची निंदा करील त्याचा शिरच्छेद करीन. शत्रुघ्न बोलला-

श्रीरामा, तुह्मीं, प्राण त्यजीन ह्मणतां; तरी तो कोठें जाईल ? सीता निजसत्वानें वांचवील. तरी आपण सीतात्यागाची गोष्ट बोलूं नका. तेव्हां रामानें सांगितलें तुमच्यासारख्या बंधूस सोडून प्राणत्याग करीन, तेथें सीतेचा पाड काय ? असें ऐकतांच भरत शत्रुघ्न दुःखी होऊन घर त्यागून गेले. नंतर लक्ष्मणास ह्मणाला—सौमित्रा ! खड्ग घेऊन माझें शीर छेद; नाहींतर सीतेला गंगातीरीं नेऊन सोड. तें ऐकून लक्ष्मण दुःखित होत्साता, सारथ्याकडून रथ आणवून सीतेच्या मंदिरांत गेला. त्याला पाहतांच सीतेला वाटलें कीं, रामांनीं मला गंगातीरावर पोंचविण्यास भावोजीस पाठविलें. मग लक्ष्मणास ह्मणाली—वस्त्रें भूषणें सुगंधादिक ऋषिपत्न्यांस पूजण्याकरितां घेतें. तें ऐकून लक्ष्मणास हुंदका आला. सीतेनें पूजासामग्री घेऊन रामपादुका रथावर ठेविल्या आणि कौसल्या, सुमित्रा, कैकई यांस वंदन करून त्यांचा निरोप घेऊन हर्षानें रथांत बसली. लक्ष्मणास अनिवार दुःख होऊन मोठ्या कष्टानें रथावर बसला. पुढें लक्ष्मण गंगातिरावर सीतेस सोडील; ती कथा श्रवण करावी.

# अध्याय २८ वा.

## श्रीरामचरित्र—सीतावनवास व वाल्मिकदर्शन.

श्रीरामानें सीतेचा त्याग करितांच अयोध्या नगर दुःखी झालें. सीता लक्ष्मणासह रथारूढ होतांच तिला अपशकून

होऊन उजवा नेत्र स्फुरण पावूं लागला; तेव्हां सीता ह्मणाली-मला अशुभ चिन्हें होतात; तरी तो श्रीरंग सुखी असो. ज्यानें खर दूषणादिक वधिले, समुद्रावर मजकरितां सेतु बांधिला, लंका जाळून रावणास मारून मला सोडवून आणिलें, तो माझा स्वामी सुखी असो. असें सीता बोलत असतां गंगातीर लागलें. तेथील जांभळी, बकुळ, चांफे, खजुरी, चंदन, अशोक, रंभा, केतकी आदिकरून वृक्षलता पाहून तिला समाधान वाटलें. नंतर लक्ष्मणानें नावाडी बोलावून होडीत बसून तीं पलिकडे गेलीं. नंतर तेथें उभयतांनीं स्नान करून शुद्ध वस्त्रें लेऊन रामपादुकांची पूजा करून नित्यकर्म सारून फळें भक्षण केलीं व रथांत बसून वनांत चालली. त्या वनांत अनेक प्रकारची वनदाट झाडी व सिंह व्याघ्रादिक अनेक श्वापदांचे कळप पाहून सीतेस भय उत्पन्न झालें. तेव्हां सीता लक्ष्मणास ह्मणाली-अजून ऋषिआश्रम दृष्टीस कां पडत नाहीं? जिकडे तिकडे भयंकर अरण्य दिसत आहे. माझें चित्त भ्रमित कां झालें? मी राम सोडून आलें ह्मणून हें दुःख प्राप्त झालें कीं काय?

हें सीतेचें वचन ऐकतांच लक्ष्मणानें विव्हल होऊन ऋषिआश्रम दूर आहेत असें सांगून दुःखानें ह्मणाला-माते! तुझी लोकांनीं निंदा केली ह्मणून तुला रामानीं वनांत सोडिलें. मी अधर्मी ह्मणून या कामीं माझी योजना केली. असे दुःखशब्द ऐकतांच सीता रथाखालीं मूर्च्छित पडली.

तिला पाहतांच लक्ष्मण बावरा होऊन ' रघुवीरा ! धांव धांव ' असें बोलून ह्मणाला--माझ्या शब्दाबरोबर हिनें प्राण सोडला ! मी सौमित्र नव्हे, कुमित्र ठरलों. माझ्या गांठी पाप ह्मणून सीतेस मारण्याचें माझें कर्म उभें राहिलें. नंतर तिजवर छाया धरून वारा घालून नेत्रांवरून हात फिरवूं लागला आणि ह्मणाला--मी पापी, माझा कर-स्पर्श या पतिव्रतेस बाधूं नये, मी निष्कपटानें जर रामसेवा केली असेल तर सीता सावध होईल. असें बोलतांच तिनें नेत्र उघडले व सावध होऊन लक्ष्मणास बोलली--आतां मी काय करूं ? माझा स्वामीस कंटाळा कां आला ? पंच-वटींत माझ्याकरितां पर्णकुटिका करून वनफळें आणून देत होतां, श्रीराम पुढें गेले ह्मणजे मागें माझें रक्षण करित होतां ! तसें रक्षण आतां कोण करील ? श्रीराम ज्ञानी, त्यांस वसिष्ठाचा बोध, त्यांनीं माझा कोणत्या अपराधास्तव त्याग केला ? तरी मी कायावाचामनानें रामास शरण आहें. श्रीरामाचें मुख हे नेत्र कोठें पाहतील ? त्यांचें अमृत वचन मला ऐकावयास कसें मिळणार ? श्रीरामांनीं विश्वा-मित्राबरोबर मिथिलेस जाऊन धनुष्य भंगून मला पर्णिलें. वानरांशीं सख्य करून समुद्रावर सेतु बांधिला आणि राक्ष-सांस मारून मला सोडवून आणलें. असे ते दयाळु मजक-रितां वृक्ष पाषाण आलिंगीत होते. ते स्वामी मजवर निष्ठुर झाले तरी तो त्यांचा अपराध नव्हे, हें माझें दैव ! याबद्दल

बोल कोणास ठेवावा. रघुनाथ मृगवधार्थ गेले तेव्हां मी तुह्मांस शब्दबाण मारले. तेंच पातक आज उभें राहिलें ! किंवा वधुवरांत बिघड पाडला ह्मणून रामाचा वियोग घडला? अशाप्रकारें रामपादुका पोटाजवळ धरून विलाप करित होती; त्यावेळीं लक्ष्मण स्फुंदत होता.

पुनः ती लक्ष्मणास ह्मणाली–सासूबाईस माझी प्रार्थना सांगून तुमचे चरणाचें चिंतन करून दुर्धर वन क्रमीन असें सांगा. भावोजी, तुह्मीं सर्वांभूतीं दयाळ असतां, अशा कामीं तुमची योजना केली; हा रामानीं मोठा अन्याय केला, बंधुघातकी बिभीषण, सुग्रीव यांची योजना कां केली नाहीं ? तुमचें कल्याण असो. तुह्मीं आतां जा. नाहीं-तर उशीर लागला ह्मणून तुमच्यावर कोपतील ! असें ऐकतांच लक्ष्मण रुदन करित वंदन व प्रदक्षिणा करून त्वरेनें निघाला. लक्ष्मण दिसेनासा होतांच एक मुहूर्तपर्यंत सीता मूर्च्छित पडली. लक्ष्मण गंगातीर ओलांडून पलिकडे गेला. पुनः अनेक प्रकारें विलाप करित सीता विव्हल पडली. तिला पाहतांच वनांतील पशुपक्ष्यादिक तिच्याजवळ धांवून जल-सिंचन व छाया करूं लागले. ती मनाशीं ह्मणाली, आतां जर पंचप्राण सोडीन तर आत्महत्या घडेल, तरी काय उपाय करूं ? अशी बोलत इकडे तिकडे अडखळून पडे. मग धरणीस ह्मणाली—माते! मला उदरांत ठाव दे. पतीनें त्याग केल्यास मातृगृहीं राहावें. तेव्हां धरणीनें विचार केला कीं, निरप-राधानें जांवई टाकणार नाहीं, कांहीं तरी अपराध घडला

असेल, तरी अशा कन्येस वास देऊं नये. ज्याला सर्वेश्वरानें ांडलें त्याचा अंगीकार कोण करील ? असा विचार करून नरणीनें पोटीं घेतली नाहीं.

इतक्यांत त्या वनांत वाल्मिकमुनी यज्ञाकारितां कुशसमिधा नेण्यास शिष्यांसह आला होता त्याच्या दृष्टिस सीता पडली. तिला रामकांता असें जाणून वाल्मिक आश्रमांत नेईल.

# अध्याय २९ वा.

## रामचरित्र—लवकुशजन्म, अश्वबंधन.

नंतर वाल्मिक सीतेस ह्मणाला- हे शुभानने ! या वनांत तूं एकटी कोणाची कोण तें मला सांग. सीता नमन करून ह्मणाली—ताता ! मी रामाची स्त्री सीता, माझा त्याग कोणत्या कारणास्तव केला तें मी जाणत नाहीं. मुनी ह्मणाला—मी जनकाचा मित्र, माझें नांव वाल्मिक, तूं माझी कन्या, माझ्या आश्रमांत चल. तेथें पर्णशाळा करून देईन तींत रहा. तुला दोन पुत्र होतील. असें वचन ऐकून आनंदित होत्साती त्याच्या मागून गेली. त्याच्या सुंदर आश्रमांत गाई, वाघ, मांजर, उंदीर, मुंगूस, सर्प, सिंह, हत्ती व पक्ष्यादिक निर्वैर भावानें क्रीडत असत. तेथील तपस्वी, ऋषिस्त्रिया, कुमार इत्यादिकांस पाहून सीता आनंदित झाली. ऋषिकुमारांनीं पर्णशाळा करून दिली, तींत सीता राहून ऋषिस्त्रिया वनफळें आणून देत, तीं खाऊन कालक्रमणा करूं लागली.

पुढें नऊ महिने पूर्ण होऊन दहाव्या महिन्यांत प्रसूत झाली, तिला दोन मुलगे झाले. त्यावेळीं वाल्मिक गंगास्नानास गेले होते. ते येत असतां मार्गांतच सीता प्रसूत झाल्याची बातमी कळली. त्यानें एका मुठींत दर्भ व दुसरींत लव आणिला होता. त्यांनीं बाळांवर वेदोक्त मंत्रानें जलसिंचन केलें. कुशदर्भानें ज्यावर पाणी शिंपलें त्याचें नांव कुश व लवानें शिंपलें त्याचें लव अशीं नांवें ठेविलीं. मग त्यांचे जातकर्मादि संस्कार केले.

लव कुश बारा वर्षांचे होतांच वाल्मिकानें मुंजी आरंभिल्या. वसिष्ठ वाल्मिकास बोलावून कामधेनु आणविली. कामधेनु प्रसन्न होतांच, चतुर्विध अन्न प्रसवून अठ्यांयशीं सहस्र ऋषींची अन्नानें तृप्ति केली. प्रत्येक दिवशीं लक्ष भोजन घातलें. त्या अन्नाच्या प्रसादाची देवही इच्छा करूं लागले. याप्रमाणें भोजन देऊन व्रतबंधन समाप्त केलें. तें पाहून सीता समाधान पावून मुनीस ह्मणाली—ताता! माझा जनक पिता लटका! तूं माझा सत्य पिता होऊन माझा लळा पाळिला आहेस मुनी ह्मणाला—बाळे! तूं सर्व जगाची जननी असून आह्मीं तुझीच बाळें आहोंत. ब्रह्मादिक बाहुली हा तुझाच खेळ असून मला उगाच मोठेपणा देतेस. असें बोलतांच सीतेनें वाल्मिकाचे चरण धरले. नंतर वाल्मीकानें लवकुशास वेदाध्ययन करवून रामचरित्र शिकविलें. त्यांस रणांत अपयश येऊं नये अशीं शस्त्रास्त्रें व अक्षय बाण भाते

दिले. असे धनुर्धर बनवून सर्व विद्येंत प्रवीण केलें. ते आश्रमांत क्रीडा करीत व आईस कंदमुळें आणून देऊन तिची इच्छा पुरवूं लागले.

इकडे अयोध्येंत अशी कथा झाली कीं, श्रीरामास सर्व विषय आवडेनासे होऊन ब्रह्महत्येमुळें दोषहरणार्थ यज्ञ करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्यानें वशिष्ठादि मुनिजनांस बोलावून आपली अश्वमेध करण्याची इच्छा सांगून त्याचा विधी विचारूं लागला. तेव्हां ऋषींनीं सांगितलें—श्रीरामा! यज्ञास अश्व पांढरा, पुच्छ पिंवळें असून सर्वत्र गमन करणारा असा श्यामकर्ण असावा. मुख्य ब्राह्मण वीस हजार व भोजनास लक्षावधि असावे. प्रत्येक ब्राह्मणास दक्षिणा गज, रथ, अश्व, एकेक; एक हजार गाई व हजार अर्बुद द्रव्य द्यावें. चैत्री पौर्णिमेस अश्व सोडून एक वर्षपर्यंत रक्षण करावा. असिपत्र व्रत नेम धरून सर्व भोग वर्ज्य करावे. अश्व मलमूत्र करील तेथें हजार गाई दान द्याव्या. हवन करून ब्राह्मणांस संतोषित करावें. अश्वाचें पूजन करून कपाळावर सुवर्णपत्रिका बांधून "तीवर जो बलाढ्य राजा असेल त्यानें अश्व धरावा." असें लिहून जो धरील त्याचा बलगर्व हरण करून अश्व सोडवावा. यज्ञकर्मांत स्त्री साह्य असावी. असें एकतांच रामाचे डोळे पाण्यानें भरून आले. तो ऋषींस ह्मणाला—मी सीतेची सुवर्णप्रतिमा बनवून अश्वमेध करीन. तुह्मीं गुरु समर्थ असतां सर्व सिद्धि होईल.

नंतर वशिष्ठानें अश्वशाळेंत जाऊन, श्यामकर्ण शोधून आणून सुमुहूर्तानें ब्राह्मणपूजा केली. सर्वांस दानें देऊन संतुष्ट केलें. सीतेची प्रतिमा करून रामास दीक्षा दिली. सुवर्णपत्रिका अश्वाचे कपाळीं बांधिली. तीवर लिहिलें कीं, "दशरथकौसल्यापुत्र श्रीरामानें अश्वमेध आरंभून हा अश्व सोडला आहे, तरी बलवान् असेल त्यानें अश्व धरावा. त्याचें निवारण शत्रुघ्न करील." असें पत्र लिहून अश्वमस्तकीं बांधलें व तीन अक्षौहिणी सैन्य देऊन शत्रुघ्नास रक्षणार्थ पाठविला. तो अश्व फिरत फिरत वाल्मिकाचे आश्रमाजवळ आला.

त्यावेळीं वरुणाकडे वाल्मिक मुनी हवनाकारितां गेला होता. आश्रमाचें लव रक्षण करित होता, त्याच्या दृष्टीस अश्व पडतांच मुनिपुत्रांस बोलावून त्या अश्वास जाऊन धरिलें व पत्रिका वाचून विचार करूं लागला कीं, कौसल्येचा पुत्र राम ! आणि तीच काय वीरजननी ! आमची आई जनकनंदिनी ही वीरजननी नव्हे काय ? ती आम्हां पुत्रांस प्रसवून वांझ झाली ? असें बोलून तो श्यामकर्ण कर्दळीस बांधला. असें पाहतांच ऋषिकुमार भयभीत होऊन पळून गेले. तो बहुशूर लव सैन्याची वाट पाहात उभा राहिला. पुढें रक्षक येतांच लव त्यांशीं महा रण माजवील.

# अध्याय ३० वा.

## लवकुशआख्यान.

लवानें अश्व धरितांच शत्रुघ्नाचे वीर चोहोंकडून धांवत आले व त्यांनीं कर्दळीस बांधलेला अश्व पाहतांच जवळ ऋषिकुमार होते त्यांस विचारूं लागले. ते भिऊन ह्मणाले-आह्मीं ब्राह्मणाचे मुलगे, नेहमीं वेदपठण करून तुह्मांस आशिर्वाद देतों, अश्व आह्मीं बांधिला नाहीं. तो आंब्याच्या सावलींत बसलेला लव त्यानें अश्व बांधिला आहे. असें ऐकून वीर ह्मणूं लागले, अश्व मुलानें बांधिला आहे येथें न्याय अन्याय काय पहावा ? अश्व सोडून पुढें चला. असें ऐकतांच लव त्यांस ह्मणाला-अरे अश्व कां सोडतां ? मज सांगला न जिंकतां उगाच गर्व कां धरितां ? तुह्मांस लाज वाटत नाहीं ? हें त्याचें ह्मणणें वीरांस विनोदयुक्त वाटून अश्व सोडण्यास धांवले. तोंच लवानें बाण सोडून त्याचें हात तोडिले. नंतर वीरांनीं लवावर बाण, पाषाण व शक्ति यांचा मारा चालविला. त्याबरोबर लवानें असंख्य बाण सोडून सर्व सैन्यास जर्जर करून सोडलें. असें पाहतांच शत्रुघ्न क्रोधानें गर्जना करित धांवला. लवानें वज्रठाण मांडून युद्ध आरंभिलें. एका बाणानें शत्रुघ्नाचें हृदय भेदून चार बाणांनीं अश्व मारले. असे अनेक बाण सोडून सर्वांस घायाळ केलें. मग शत्रुघ्न सावध होऊन तीन बाण लवावर टाकले ते न मानून

पुनः रथ, अश्व, धनुष्य यांचा चुराडा केला. असें त्या दोघांचें तुंबळ युद्ध होऊन शेवटी शत्रुघ्नानें लवणासुरास मारलेला रामदत्त बाण लवावर टाकिला, तो बाण पाहतांच लवानें कुशाचें स्मरण केलें आणि ह्मणाला, यावेळीं कुश असतां तर त्यानें या शराचें निवारण केलें असतें; असें बोलून अर्धा बाण खंडून टाकिला व अर्धा हृदयावर बसून लवबाळ मूर्च्छित पडला. त्याला रथावर घालून शत्रुघ्न अश्व सोडून पुढें चालला. आतां कुश बाळ बंधूस सोडविण्यास येईल.

# अध्याय ३१ वा.

## लवकुश आख्यान.

शत्रुघ्नानें लवास धरून नेतांच ऋषिपुत्रांनीं येऊन सीतेस सांगितलें. ते ह्मणाले-माते ! कोण्या राजाचा श्यामकर्ण वनांत आला होता, तो लवानें धरून कर्दळीस बांधून ठेविला. त्याचे रक्षक येतांच त्यांचेबरोबर झुंजून त्यांस जर्जर केलें. मागून मुख्य वीर येऊन त्यानें लवावर बाण सोडून मूर्छित केलें. मग त्याला उदक पाजून रथावर घालून नेलें. असें ऐकतांच सीतेस अनिवार दुःख झालें. ती ह्मणाली-जर रामचरित्र सत्य असेल तर माझा कुश लवास सोडवून आणील. असें बोलून सीता शोक करूं लागली. ती ह्मणाली यावेळीं वाल्मिक ताതही जवळ नाहींत आणि कुशही नाहीं. आतां दुःख कोणास सांगूं ? असा विलाप करित असतां कंदमुळें घेऊन कुश आला. येतांना त्यास अपशकून झाले.

तो सीतेजवळ येतांच ह्मणाला—आई ! आज लव मला सामोरा आला नाहीं, तो कोठें गेला ? असें ऐकून सीता विलाप करीत सांगूं लागली—बाळा ! तुझ्या बंधूला परचक्रानें धरून नेला. कोण्या राजाचा अश्व वनांत आला होता त्याला लवानें बांधून ठेविला, त्याच्या मागून सैन्य आलें त्याशीं युद्ध केलें, मग वीरानें त्यास पाडून बांधून नेलें. तरी आतां तुजशिवाय त्याला कोण सोडवितो आहे ? यास्तव लौकर धांवत जाऊन सोडवून आण. असें सांगून आक्रोश करूं लागली.

कुश ह्मणाला—माते ! शोक करूं नको. मी तुझ्या उदरीं काय कीडा जन्मलों आहें ? शत्रुसाह्यार्थ जरी इंद्रादिक देव आले तरी त्यांस एका क्षणांत जिंकीन. मला कवच, किरीट, धनुष्य, भाता आणून दे. आई, तुझ्या चरणप्रतापानें बंधूरत्न सोडवून आणितों. असें ऐकून सीतेस संतोष झाला. मग पर्णकुटीकेंत जाऊन कवच मुगुटादिक शस्त्रास्त्रें आणून दिलीं. तीं घेऊन आईचे चरण वंदून वाल्मिकाचे चरण आठवून ह्मणाला—मी तुझ्या पोटीं केवळ सिंह जन्मलों आहें, आपल्या शरनखांनीं शत्रुगजकुंभस्थळाचें विदारण करून माझा बंधु लव हेंच मुक्ताफळ काढून आणितों, हें जर न करीन तर तुझ्या पोटीं कृमी जन्मलों ! असें ऐकून सीतेनें 'विजयी हो' असा आशिर्वाद दिला आणि रामचरण स्मरून युद्ध कर असें सांगितलें.

नंतर ज्याप्रमाणें कार्तिकस्वामी तारकासुरावर किंवा राम

रावणावर गेला; तसा कुश धांवत जाऊन चोरहो ! उभे रहा, माझें बंधुरत्न चोरून कोठें जातां ? त्याच्याकरितां मी कुशवीर आलों आहें; मागें फिरा. असें ऐकून वीर मागें फिरून पाहूं लागले; तों रामाकृती बाळ पाहून ह्मणूं लागले. हा काळासारखा भासतो, हा सैन्याचा संहार करील. मग शत्रुघ्नाला वीर आल्याचे कळविलें. तेव्हां तो चिंतातुर झाला. त्यास प्रधान ह्मणाला–तुह्मीं बलाढ्य वीर आणि बाळांस कां भितां ? मला आज्ञा द्या मी धरून आणितों, नखानें साध्य होणाऱ्या कामास कुऱ्हाड कशाला पाहिजे ? शत्रुघ्नोंन सांगितलें–तूं बाळास न मारितां, रामास दाखवि ण्यास धरून आण. इतक्यांत प्रचंड वायूनें जसा वृक्ष पाडावा तसा ध्वज खालीं पडला. भात्यांतून बाण आपोआप निघूं लागले. इतक्यांत पुढें कुश दृष्टीस पडतांच शत्रुघ्नानें प्रधानास त्याचेवर पाठविला. तो कुशास ह्मणाला–कुमारा ! तूं कोमल आहेस, आह्मी केवळ यमासारखे, काळासही शिक्षा लावूं ! कुश बोलला–तुह्मीं मोठे दिसतां, पण गवताचे पुतळे आहां. त्यांस जाळणारा मी दावाग्नि आहें. असें ऐकून दहा बाण कुशावर सोडले. ते पाहून कुश खदखदां हांसून एक तीक्ष्ण बाण सोडून रथ, अश्व, सारथी, धनुष्य व कवच यांचें छेदन केलें आणि शेवटीं शीर उडविलें. तोंच त्याचा भाऊ नागवीर धांवला, त्यानें शक्ति टाकिली; तिचें कुशानें निवारण करून काळदंडवत् बाणानें हत्तीचे चारी पाय तोडले. मग तो चरणचालीनें गदा घेऊन धांवत येतांच, उजवा हात

तोडला. त्यानें डाव्या हातानें चक्र भिरकाविलें, तें कुशानें पाहून तोही हात छेदला, नंतर तो तसाच धांवत आला, तोंच कुशानें चरण तोडले आणि अर्धचंद्र बाणानें शीर उडविलें, तें शिवानें रुंडमाळेकरितां नेलें, अशाप्रकारें शत्रुघ्नाची चतुरंग सेना कुशानें यमसदनास पाठविली, पुढें शत्रुघ्न व कुश यांचें युद्ध होईल,

# अध्याय ३२ वा.

## लवकुश आख्यान.

जैमिनी सांगतात—राजा ! पुढें कथा ऐक. सेनापतीस मारतांच शत्रुघ्न अग्नीसारखा खवळून कुशावर बाण सोडले. ते पाहतांच कुशानें चार बाण सोडून अश्वासहित रथाचें चूर्ण केलें, एका कठोर बाणानें हृदय भेदून, दुसऱ्यानें हस्त भेदन केलें, त्यामुळें शत्रुघ्न गाढ मूर्च्छा येऊन बेशुद्ध पडला. राहिलेलें सैन्य अयोध्येस पळालें मग लव सावध होऊन बंधूस भेटला नंतर कुशानें सांगतांच लवानें श्यामकर्ण धरून तेथून मागें परतले. त्यावेळीं ते दोघे बाळवेषानें शंकर विष्णुसारखे शोभले. ते शत्रुची वाट पाहात उभे राहिले.

इकडे जे वीर अयोध्येंत आले ते यज्ञमंडपांत रामापुढें येऊन कांपूं लागले. ते घायाळ सांगूं लागले कीं, शत्रुघ्न सर्व पृथ्वी फिरून एका ऋषिआश्रमांत येतांच, तेथील एका बारा वर्षांच्या ब्राह्मणपुत्रानें श्यामकर्ण धरून वस्त्रानें कर्दळीस बांधला आणि युद्ध करूं लागला. त्यानें पुष्कळ

सैन्याचा संहार केला. शेवटीं शत्रुघ्नानें निर्वाण शरानें त्यास मूर्च्छित पाहून रथांत घालून उरल्या सैन्यासह मागें परतला. तोंच दुसरा बालक येऊन निर्वाण युद्ध करून सेनापतीचा व नागवीराचा प्राण घेतला आणि शत्रुघ्नास पाहून सैन्याचा संहार करून आपल्या भावास सोडवून श्यामकर्ण घेऊन गेला. असें ऐकतांच रामास आश्चर्य वाटून ह्मणाला–अरे तुह्मी काय बोलतां ? तुह्मांस भ्रम झाला कीं काय ? शत्रुघ्नाला पाडलें, असें बाळक कोणाचें होतें ? अरे सूर्य तेजहीन होईल किंवा अग्नीस थंडी बाधेल तरच शत्रुघ्न रणांत पडेल. वीर ह्मणाले—आह्मांस पिशाचभ्रम कसा होईल ? एकवेळ श्रीराम चिंतिल्यानें भ्रमाला ठाव कसा मिळेल ? श्रीरामा ! खरोखर बाळबाणानें शत्रुघ्नानें रणांत शयन केलें. असें ऐकतांच रामानें धरणीवर आंग टाकलें आणि विलाप करूं लागला. मग लक्ष्मणाला जवळ बोलावून ह्मणाला–लक्ष्मणा ! मी तर दीक्षा घेतली आहे, तरी चतुरंग सैन्य घेऊन जाऊन दारुण युद्ध करून बंधूसह श्यामकर्ण सोडवून आणावा.

श्रीरामाची आज्ञा होतांच लक्ष्मण अपार सैन्यासह युद्धास निघाला. काळजितास सेनापती करून हत्ती, अश्व, रथ, पायदळ यांसह रणभूमीस आला; रामाचें सैन्य पाहतांच लवास कुश बोलला तें पुढें श्रवण करावें.

---

# अध्याय ३३ वां.

## लवकुशआख्यान.

कुश लवास ह्मणाला–बंधुराया! शत्रुदळ असख्य आलें आहे; आतां कसें करावें तें सांग. तूं परदळाचें रव करणारा ह्मणून तुझें लव असें नांव ठेविलें आहे. तरी आतां कसें युद्ध करूं तें सांग. लव ह्मणाला–रामचरण स्मरून या कोल्ह्यांसारख्या वीरांची रणकुंडांत आहुती द्यावी, किंवा पिकलेल्या फळांप्रमाणें शिरें भूलिंगास अर्पण करावीं. हा कोल्ह्यांचा समुदाय सिंहापुढें काय बळ दाखवितो! माझें धनुष्य छेदलें ह्मणून मला धरून नेलें, नाहींतर त्यांचा मी अंतक होतों. तर आतां कुशा! बाण योजून सावध रहा. मी सूर्याची प्रार्थना करून धनुष्य मागतों.

असें बोलून लवानें एकाग्र मन करून सूर्याचें स्तवन मांडलें. तेव्हां सूर्यानें प्रसन्न होऊन धनुष्य व वर दिला. नंतर ते दोघे एकत्र होऊन लक्ष्मणाचें सैन्य येतांच मेघधारेसारखे बाणांचा वर्षाव करूं लागले. त्यायोगें दोन कोस सैन्य मागें हटलें. काळजित व सौमित्राचे मार्ग बाणांनीं रोधून टाकले. असें पाहतांच लक्ष्मणास क्रोध येऊन त्यानें शतगजभ्रमीचा वेढा घालून बाण सोडूं लागला.

तेथें जन्मेजयानें प्रश्न केला कीं, शतभ्रमीचें लक्षण मला सांगावें. मग जैमिनी सांगतात–शंभरांस शंभरांनीं गुणावें, इतकी संख्या हत्ती, प्रत्येक हत्तीस दहादहा रथ, प्रत्येक

रथास शंभर घांडे, प्रत्येक घोड्यास शंभर पदाती. इतके मिळून एक अभी होते, अशा शंभर अमी करून लवावर वेष्टन घालून पाश, पट्टीश, बाण, मुद्गल, गदा, शक्ति, चक्रे इत्यादि शस्त्रास्त्रांचा मारा चालू करून भद्रव्यूहांत धरला. तेव्हां लवानें असंख्य बाण सोडून शस्त्रांचें निवारण करून चाळीस गजअमीच्या वेष्टनांतून बाहेर पडून गर्जना करूं लागला. गजदेहांचीं खंडें पडून सैन्य दशदिशांत गेलें. लव मागें पाहूं लागला तों कुश कोठें दिसेना. तेथें असें अपूर्व झालें कीं, लवणासुराचा मामा रुधिराक्ष नांवाच्या राक्षसानें रामास शरण जाऊन प्राण वांचविला होता, तो लक्ष्मणा-बरोबर आला होता. त्यानें लवाचें धनुष्य हरण केलें. त्याला लव ह्मणाला—अरे राक्षसा चोरा! आपल्या शिराचें रक्षण कर. असें बोलून चक्र घेऊन आकाशांत उडाला. त्यास पाहतांच सर्वांस भीति पडली कीं, आतां कोणाच्या मस्तकावर येऊन आदळेल कीं काय? कित्येकांनीं मस्तकावर ढाला धरल्या, कोणी रथाखालीं लपले व कित्येकजण पळून गेले. पूर्वी दशरथाचा सुज्ञ नांवाचा प्रधान प्रवीण होता. त्यास दहा पुत्र होते, त्यांचीं नांवें—जितश्रम, धार्मिक, शत्रुसूदन, सुकेतु, चंद्र, शल, वमन, काल, मल्ल, सिंहाभिधान या दहा जणांनीं दहा दहा बाण लवावर सोडून हातांतील चक्र छेदलें. मग लवानें भूमीवर येऊन परिघ घेतला आणि त्याच्या योगें दहाही जणांचा फडशा केला. मग लवानें उड्डाण करून गदेनें रुधिराक्षास मूर्च्छित केलें. लागलाच

तो सावध होऊन लवाला एक मुहूर्त बेशुद्ध केला, नंतर लवानें कुंतायुधानें त्याचें शीर छेदून आपलें धनुष्य घेतलें. लक्ष्मणानें पुनः भ्रमी रचून वेढा दिला. त्यांतूनही सैन्यसंहार करून मुक्त झाला. त्यावेळीं प्रळयकाळ भासून वीर दशदिशांस पळाले. पुढें कुशलक्ष्मणाचें युद्ध होईल.

# अध्याय ३४ वा.

## लवकुशआख्यान–लक्ष्मणाचा पराजय.

लक्ष्मणास पाहतांच कुश पुढें झाला. त्यावर लक्ष्मणानें पांच बाण सोडले. त्याचें संधान पाहून कुश ह्मणाला–आतां स्थीर हो, रण सोडून पळूं नको, तुझी इच्छा मी आतांच पुरवितों. असें बोलून एका बाणानें रथासहीत लक्ष्मणास दोन घटकापर्यंत कुंभाराच्या चाकाप्रमाणें भ्रमण्यास लाविलें. मग लक्ष्मण दुसऱ्या रथांत बसून तीन बाण कुशावर सोडले. एकानें मुगुट व दोन बाणांनीं कवच छेदलें. तेव्हां कुश ह्मणाला—तूं शत्रुभार सोडून माझा कवचभार उतरलास हा तूं उपकारच केलास, तरी त्याचें उसनें फेडितों. तुला सैन्याचा भार आहे तो दूर करितों सावध हो. नंतर कुश अथर्वण वेदांतील अग्निस्त्र जपतांच, ज्वाला उत्पन्न होऊन लक्ष्मणाचें सर्व सैन्य जळूं लागलें. तोंच वरुणास्त्रानें अग्नि शांत करतांच, कुशानें वायुअस्त्र सोडलें; त्यानें सर्व सैन्य भ्रमणचक्रांत फिरूं लागलें

असा कुशाचा पराक्रम पाहून काळजित लक्ष्मणास

ह्मणाला—आतां मी बाणानें याचा संहार करितों; असें बोलून रथ लोटून कुशास बोलला—बालका! तुझें नांव कुश, तरी तो रणयज्ञास योजितों सावध हो. जें अति सूक्ष्म त्यास व तृणास लव ह्मणतात, ह्मणून नांव लव ठेविलें आहे तें व कुश हें तृणच होय. त्याचें निर्बळ ब्राह्मण छेदन करितात. आणि मी तर बलाढ्य काळजित आहें. मी तुमचें भस्म करीन. असें ऐकून कुश कोपून ह्मणाला—अरे, काळजित हें तुझें नांव व्यर्थ होय. जसें शेळीच्या कंठांतील स्तन किंवा बधीर कान अथवा वृषभास नांव वजीर ठेविलें आणि दिव-सभर पाणी वाहतो तसें तुझें नांव काळजित सेनापती असून माझा बंधु तुझें सैन्य वधितो. असें बोलून कुशानें बाण सोडिला. मग काळजितानें दोन बाण हृदयावर व बाहूवर टाकले. कुशानें दोन बाणांनीं दोन भुजा छेदून अर्धचंद्र बाणानें शीर उडविलें. सेनापती पडला, असें लक्ष्मणानें पाहतांच तो खवळून सहा बाण कुशाच्या हृदयावर सोडून खड्ग, पाश, गदा, मुद्गल इत्यादि शस्त्रें टाकिलीं. त्यांचा सीता-पुत्रानें चूर करून वाल्मिकदत्त पंचबाणांची योजना करि-तांच सर्व सैन्य मोह पावून देव विमानें पळवूं लागले. ते शर लक्ष्मणाचे हृदयांत भेदून मूर्च्छित पडला. सर्व वीरांस कुशाचा धाक बसून त्यांची दाणादाण झाली.

इकडे लव गजभ्रमांत कोंडलेला पाहतांच कुशानें पंच्या-ण्णव गजांच्या हारी मारून, दोघे एकमेकांस भेटले आणि शत्रुसैन्याची वाट पाहात बसले. पुढें भरताबरोबर युद्ध होईल.

# अध्याय ३५ वा.

## लवकुशआख्यान.

जैमिनी सांगतात—परिक्षितसुता ! पुढील कथा सांगतों एक. श्रीराम गंगातीरावर यज्ञमंडपांत ऋषिजनांसह बसला असतां भरतास ह्मणाला—ऋषींच्या दोघां बालकांनीं अपार सैन्य मारलें, त्यांस जिंकावयास लक्ष्मणास पाठविलें आहे. तरी तो क्रोधी लक्ष्मण बालकांस मारील. यास्तव चिंता उत्पन्न झाली आहे. वर्ष भरण्यास दोन दिवसांचा अवकाश आहे, ते ऋषींचे कुमर कोण आहेत तेंहि कळत नाहीं. मी तूं, लक्ष्मण, सुग्रीव, अंगद, बिभीषण मारुती इत्यादिकांस तृणासमान मानून ज्यांनीं अश्व धरीला ते योद्धे कोण असाव? तरी भरता ! तूं आतां दूत पाठवून निकटील समाचार आणावा. असें ऐकतांच भरतानें दूत बोलाविले. त्यांस श्रीराम ह्मणाला—तुह्मी लक्ष्मणास सांगा कीं, मोहनास्त्रानें बाळें धरून आणावीं. जरी तुजवर बाण टाकतील तरी राग न धरितां तूं व काळजितानें त्यांस जीवंत धरून आणावें. आह्मांस संतान नाहीं ह्मणून चित्त उद्विग्न आहे, यास्तव त्यांस वांचविलें असतां त्या पुण्यानें ईश्वर आह्मांस पुत्र देईल. त्यांस तुमचीं आईबापें कोण, वनांत कां राहतां, वगैरे विचारून सामोपचारानें घेऊन यावें. असें रघुनाथ सांगत आहे तोंच घायाळ रक्तबंबाळ होऊन कुंथत आले.

ते रामास ह्मणाले—जी कधीं व्यथा ऐकिली नाहीं ती

दृष्टीनें [illegible]. एकट्या कुशवीरानें काळजीतास मारून लक्ष्मणास मूर्च्छित केलें. दुसरा लव यानेंही अपार सैन्य संहारून आह्मांस घायाळ केलें. लक्ष्मणानें त्यांवर कृपा करून सांगितलें होतें कीं, बाळा! तूं आपल्या बंधूस घेऊन जा. तुह्मांस मारिल्यानें तुमच्या जननीस कष्ट होतील. असें ऐकून कुश लक्ष्मणास ह्मणाला–तूं बंधुदुःखानें दुःखित झाला आहेस; यास्तव तुला सोडिलें आहे, तरी रामाच्या पाठीशीं जाऊन आपला प्राण वांचीव, तुला रामचंद्रानें पूर्वी वनांत पुष्कळ कष्ट दिले आहेत! असें ऐकून लक्ष्मणानें संतप्त होऊन असंख्य बाण सोडिले, त्याचें निवारण करून शेवटीं लक्ष्मणास भूमिगत केलें.

असें ऐकतांच श्रीराम मूर्च्छित पडला व भरत घावरा झाला, त्यानें रामास सावध करून ह्मटलें, बंधो! तुह्मीं दुःखांत कां पडलेत? तुह्मीं सीतेचा त्याग करून यज्ञकार्य आरंभिलेंत. तें लक्ष्मणाला प्रतिकूल झालें, ह्मणून त्यानें देहत्याग केला. अपराधाशिवाय सीतेचा त्याग केलात, तें पाप झालें, तें दूर करण्यास लक्ष्मण सैन्यासह गेला. सीतात्यागामुळेंच आमचा जयभंग झाला, यास्तव मला आज्ञा द्या. मी तुमच्या चरणीं प्राण ठेऊन जेथें दोघे बंधु पडले तेथें मीही जातों. राम ह्मणाला–भरता! जा, पण ते कोणाचे कोण तें विचारून त्यांस जिंकून दोघां बंधूंसह लौकर ये. सर्व वानरांसह हनुमंत व जांबुवंत यांस साह्यास ने. अंगद तुझा प्रधान. बाळांस ओळखील. त्यांस [illegible]

धुनाथा ! लोकनिंदेमुळें सीतेचा त्याग केलात; तो दुर्मित्र
ाळरूपानें पीडित आहे असें वाटतें.

नंतर भरत रामआज्ञेनें चतुरंगदळासह रणभूमीवर
ाला. कुशानें जीं प्रेतें पाडिलीं होतीं तीं भरत हनुमंतास
ाखवून ह्मणाला– ही पहा रक्ताची नदी, हींत प्रेतें वाहून
ालीं आहेत. जर बंधूंचीं प्रेतें वाहून गेलीं असलीं तर आप-
ास कशीं मिळतील ? तरी आतां रक्तनदी ओलांडून रण-
मंडल शोधूं चला. तूं जसा समुद्र ओलांडून सीताशुद्धी करून
रामास तोषविलेंस तसें मला संतोषित कर. मारुती ह्मणाला–
त्यावेळीं सीता सन्मुख होती. आतां विन्मुख झाल्यामुळें नदीचें
लंघन कसें करूं ? नंतर मारुतीनें रामस्मरण करून उड्डाण केलें
आणि रण शोधूं लागला, तों दोघे बंधु दृष्टीस पडले. त्यांस
मारुतीनें उचलून भरताच्या हातीं देतांच आलिंगन देऊन
रथांत ठेविलें. नंतर हनुमंतास ह्मणाला–सैन्यनाशक दोघे
बाळ कोठें आहेत ते जवळ जाऊन पहावें. मारुतीनें ह्मटलें
इंद्रजीतशरानें लक्ष्मणास अशी मूर्च्छना आली नव्हती, पण
कुशबळानें विव्हळ होऊन, दळभारही धरणीवर पडला आहे,
असें कुशाचा पराक्रम वर्णन करूं लागले. पुढें लवकुश व
भरत यांचें युद्ध होईल.

# अध्याय ३६ वा.

## लवकुश आख्यान.

रामसैन्य पहातांच कुशानें धनुष्य टणकारिलें. तें ऐकतांच

सर्व वीरांचें हृदय भेदून गेलें. इतक्यांत सोसाट्याचा वार सुटून सर्व दिशा धुळीनें धुंद झाल्या. आपपर ओळखेनासें झालें, त्यामुळें सैन्याची दाणादाण उडाली. लवानें सैन्यांत शिरून कोट्यावधी वीर पाडिले. अश्व गजशिरांच्या राशी पाडिल्या. त्यांस पाहतांच भरत ह्मणाला—हे मरुद्गण, गणेश पवन किंवा वैश्वानर सैन्य जाळावयास पातले! असें बोलून अपार शर सोडले. तेव्हां मारुती ह्मणाला—हे बाळ रामा सारखे दिसतात. हे आमचें दळ सर्व मारतील; तरी निश्चल होऊन कुशाबरोबर युद्ध करावें. तें ऐकून कुश लवास ह्मणाला—तूं श्यामकर्ण सांभाळ, मी शत्रुसैन्याचा संहार करितों. मग कुश भरतास ह्मणाला—मी तुमचा वैरी कुश! तुझे बंधु मीच रणांत पाडिले! भरत बोलला—मी तुला जीवंत धरून नेईन. तूं आतां बालचेष्टा सोडून श्यामकर्ण आणून दे. बंधूसह मला भरतानें सोडलें असें आईला जाऊन सांग.

असें ऐकून कुशानें असंख्य बाण सोडले. सात बाण भरतावर, सात वानरांवर सोडून सात बाणांनीं मारुतीस खिळलें. सहा बाण अंगदावर, पांचशें नळावर, सत्तर नीळा-वर हजार जांबुवंतावर, असे दोघांनीं बाण सोडून सैन्यास जर्जर केलें, लवानें सहा शरांनीं भरताचें धनुष्य छेदून रथाचे तिळासारखे कुटके करून मूर्च्छित पाडिलें, असें पाहून मारुती चार कोस लांब असा पर्वत उचलून कुशावर टाकणार तोंच त्याचें पिष्ट केलें आणि मारुतीसही बेभान

ला. अशी दळाची स्थिति होतांच घायाळांनीं रामाजवळ जाऊन युद्धवार्ता सांगितली. ती ऐकून श्रीराम बंधुदुःखानें रुदन करीत यज्ञदीक्षा त्यागून युद्धास निघाला.

श्रीराम रणांत येऊन बालकांस ह्मणाला—तुह्मी कोणाचे कोण ? तुह्मांस धनुर्वेद कोणत्या गुरूनें पढविला ? तुमचें आईबाप व वसतिस्थान कोणतें तें सांगा. तेव्हां बालक ह्मणाले—अरे युद्धांगणांत येऊन आमच्या वंशकथेचें तुला कारण काय ! तूं क्षत्रियधर्म सांडून बालकांस कां भितोस ? आपला श्यामकर्ण नव्हे ह्मण किंवा युद्धास सिद्ध हो. त्यावर राम ह्मणाला—तुह्मी वंशस्थिति सांगितल्याशिवाय मी युद्ध करणार नाहीं. तेव्हां कुश ह्मणाला—आह्मी सीतेचे पुत्र, आमचा गुरु वाल्मिक, त्यानेंच धनुर्वेद शिकविला. आतां तरी युद्धास सावध हो. सीतेचे पुत्र असें ऐकतांच रामानें स्वपुत्र जाणून आपला धिक्कार करून घेतला. मग सुग्रीवास ह्मणाला—हे कोणाचे पुत्र तें कळलें काय ? सुग्रीवानें ह्मटलें—हे आपल्या वीर्याचे असावे असें वाटतें. नंतर सुग्रीवानें वृक्ष उपटून भिरकाविला त्याचे लवानें तुकडे करून सुग्रीवास मूर्छित केलें. तोंच नीळ पर्वत घेऊन धांवला. नीळ एक बाण सोडतांच त्याच्या रक्तापासून कोट्यावधी नीळ वानर झाले, ते पाहतांच कुश भय पावला. मग जळकास्त्र सोडून नीळाचें शोषण केलें अशा प्रकारें रामाशिवाय सर्व सैन्यास खिळून टाकिलें. पुत्रापासून पराजय असावा, असा शास्त्रनियम आहे, यास्तव रामानें हार घेऊन असंख्य बाण

सोडले त्यांचें दोघांनीं निवारण केलें. त्यावेळीं आपल्या सारखे बळी पुत्र पाहून रामास संतोष वाटला.

नंतर कुशानें वाल्मिकदत्त बाण सोडून रामास मूर्छित केलें. लवानें त्याच्या रथावर चढून त्याचीं भूषणें घेतलीं. तशींच लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न यांचींही भूषणें घेतलीं आणि कुशास ह्मणाला-आतां मी दोघां वानरांस धरितों, तूं रामाच्या रथावर व मी लक्ष्मणाच्या रथावर बसून मंदिरांत जाऊं चल. असें ऐकतांच मारुती ऋषभ वानरांस ह्मणाला-आतां आपली बरी गत नाहीं तुह्मी डोळे झांका जर आपणांस यांनीं सीतेजवळ नेलें तर जीव ठेऊं नये असें वाटेल. असें बोलून त्यांनीं मूर्छेचें मीष केलें. त्यांस लवानें रथावर घातलें आणि रथारूढ होऊन आईच्या दर्शनास गेले. मातेस वंदन करितांच, सीतेनें आलिंगन देऊन चुंबन घेतलें. मग लवानें सर्व वृत्त कथन करून वानर दाखविलें तेव्हां सीता ह्मणाली-बाबानो ! त्यांस सोडून द्या. ते मला पाहतांच प्राण सोडतील. असें ऐकतांच त्यांस सोडून दिलें.

वाल्मिक घरीं येतांच; दोघांनीं वंदन करून सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकतांच रामभेटीचा लाभ झाला असें बोलून आनंद पावला. मग मुनीनें रणांत जाऊन कमंडलूंतील पाणी शिंपून सर्वांस सावध केलें. रामादिकांनीं मुनीस वंदन केलें. मग सर्व सैन्यासह वाल्मिकानें रामास आश्रमांत आणून पूजा केल्यावर लवकुशाचें जन्मवृत्त कथन केलें. आणि दोनी मुलांस रामाच्या चरणावर घातले.

पितापुत्रांची भेटी झाल्यावर मुनिआज्ञेनें सीतेनें रामचरण वंदन केलें. तेव्हां राम हांसतमुखानें ह्मणाले-तुला मी जनापवादानें टाकिली; नंतर तेंच पाप आह्मांस घडून देहांत प्रायश्चित्त मिळालें. नंतर रामाचे दोन मांड्यांवर दोन कुमार देऊन डावीकडे सीतेस बसविली आणि षोडशोपचारें पूजन करून रामस्तवन केलें व सांगितलें. आतां सर्वांनीं यज्ञसमाप्ती करितां अयोध्येस चलावें. नंतर श्रीराम भ्रातृपुत्रसैन्यांसह रथांत बसून गंगातीरीं येऊन अश्वमेध पूर्ण करितां झाला व आनंदानें राज्य करूं लागला.

जैमिनी ह्मणाले—जन्मेजया ! असें कुशरामाचें युद्ध झालें तसेंच पार्थबभ्रुवाहनाचें दारुण युद्ध जुंपलें. ती कथा पुढें सांगितली आहे.

# अध्याय ३७ वा.

## वृषकेतु बभ्रुवाहनयुद्ध व वृषकेतुवध.

सर्व सैन्य पडतांच हंसध्वजानें उठून बभ्रुवाहनाचा रथ छेदिला, असे हजार रथांचें गणित झालें. तेव्हां पार्थपुत्र कोपून हंसध्वजास छिन्नभिन्न केला. मग कृष्णचरण स्मरून हंसध्वजानें पांच अक्षौहिणी सैन्य मारलें. बभ्रुवाहनानें अर्धचंद्र बाणानें रथ अश्व सारथ्यास मारून हंसध्वजास निर्जीव करून पाडला. तोंच सुवेगानें बभ्रुवाहनाचा छत्र ध्वज छेदला. असें परस्पर तुंबळ युद्ध होऊन शेवटीं सुवेग गतप्राण होऊन पडला सैन्यांत फक्त अर्जुन व वृषकेतु मात्र

उरले. घायाळास बभ्रुवाहनानें नगरांत पाठविलें त्यांस बभ्रुवाहनाची आई उलूपी व चित्रांगदा यांनीं वैद्यांकडून सावध केलें. इकडे पार्थ वृषकेतूस ह्मणाला-अरे कर्णपुत्रा! आमची सर्व चीज वस्तु लुटून हंसध्वज पुत्रासह व कृष्णपुत्र मणिपुरास नेले. अनुशाल्वाचा समाचार नाहीं. सुवेग मजसमोर निमाला. कोटीच्याकोटी दळभार नाहींसा झाला. तरी तूं धर्मास व कृष्णास जाऊन सांग. असें पार्थ बोलतांच ध्वजावर गिधाड येऊन बसलें. रथावर कपोत बसला. अशीं मरणसूचक दुश्चिन्हें पाहून पार्थानें वृषकेतूस हस्तनापुरास जाण्याचा आग्रह केला आणि ह्मणाला-जर तू मजसहवर्तमान प्रसंगीं मरण पावल्यास कुंती, धर्म, भीमसेन प्राण ठेवणार नाहीं; त्यांनीं प्राण सोडल्यावर नकुळादिक जीव ठेवणार नाहीं; यास्तव लौकर जा. मजसाठीं कुंती प्राण ठेवणार नाहीं. मी पूर्वीं कृष्णबळानें खांडववन जाळलें. परंतु माझ्या पुत्रानें यज्ञउत्साहवन निजबळानें भस्म केलें, शेवटीं अपकीर्तीचें मरण येऊन धर्माचे चरण अंतरले व यज्ञही राहिला.

असें पार्थवचन ऐकून वृषकेतू ह्मणाला-मी येथून जाणार नाहीं. क्षणभंगुर देहाची ममता धरून अपयश कां घेऊं? यास्तव मी रणांतच मरेन. तुह्माला रणांत सोडून मी देहलोभानें पळेन तर पतिव्रता स्त्री माझें तोंड पाहणार नाहीं. ह्मणून मी रण न सोडितां तुमच्या पुत्रास युद्धांत तोषवीन. असें बोलून पार्थास वंदन करून निघाला, तो बभ्रुवाहनास

ह्मणाला—तूं सर्व वीरांस मारलेंस त्याचा सूड घेतों. असें सांगून तीन बाण सोडतांच बभ्रुवाहनानें मांसरक्त शोषक बाण टाकून वृषकेतूस घाबरा केला. असें ते दोघे अनेक शस्त्रास्त्रांचा मारा एकमेकांवर करित असतां बभ्रुवाहनानें तीक्ष्ण बाण सोडून वृषकेतूला तीन मुहूर्तपर्यंत आकाशांत भ्रमण्यास लावून पार्थाजवळ पाडला. लगेच पांच बाणांनीं पार्थपुत्राचा रथ आकाशांत उडविला. तो सूर्यानें दग्ध केला.

असें त्या दोघांचें पांच दिवसपर्यंत निर्वाण युद्ध झालें. मग वृषकेतूस बभ्रुवाहन ह्मणाला—तुझा पराक्रम मी पाहिला. आतां जनार्दन आठवून सावध रहा. असें सांगून अर्धचंद्र बाणानें वृषकेतूचें शीर रविमंडळापर्यंत उडविलें. तेथून बभ्रुवाहनाचें उरावर पडलें; त्यानें तो खालीं पडला नंतर तें शीर पार्थचरणास लागलें. अंतकाळीं हरिचरण न पाहतां शीघ्र मरण आलें ह्मणून त्याचा भक्त जो अर्जुन त्याच्या चरणास लागलें. रणांत अर्जुन एकटाच उरला. तोही पुत्र दुःखानें व्याकुळ झाला. पुढें बापपुत्राचें दारुण युद्ध होईल.

# अध्याय ३९ वा.

## बभ्रुवाहन व अर्जुन युद्ध.

वृषकेतूचें शीर मुखानें राम केशवादिक नामोच्चार करित होतें. तें अर्जुनानें हातांत घेऊन विलाप करूं लागला. इकडे कबंध उठून त्यानें बभ्रुवाहनाचा दळभार पळविला. देह पडतांच पशुसमुदाय जवळ, आला, त्यांस हातांतील शस्त्र

जवळ येऊं देईना. पार्थ ह्मणाला-रे पुत्रराया ? तूं मला कां सोडलेंस ! आतां मला साह्य कोण करील ! तुला हरिसन्मुख मरण आलें नाहीं तरी आह्मांवर नारायण रुसला असें वाटतें. आतां धर्म, कुंती, भीम, नकुळादि यांस तोंड कसें दाखवूं व त्यांस काय सांगूं ? कुंती, द्रौपदी प्राण सोडतील ! तूं श्यामकर्ण आणून रणांत यौवनाश्व जिंकलास व अनुशाल्वास कृष्णादेखत धरून आणलास ! पुत्रा ! तुझ्या मरणानें आतां दोघांसही पतन होईल ! अशा प्रकारें गुण आठवून विलाप करीत कृष्णाचें स्मरण केलें आणि पुत्रास पोटाशीं धरून रथावरून खालीं पडला.

असें पाहतांच बभ्रुवाहनानें धांवत येऊन पार्थास सावध केलें आणि ह्मणाला-मी वेश्यापुत्र जवळ आहें. मी बळवनानें सभाग्य थोर असल्यामुळें वीर जीवांचा मारा घेतला. आतां तुझें शीर उरलें आहे; तरी नपुंसकासारखा विलाप न करितां युद्धास सिद्ध हो. असें ऐकतांच पार्थ सावध झाला व समोर बभ्रुवाहनास पाहून क्रोधानें खवळून रथांत बसून धनुष्यास बाण लाविला आणि पुत्रास ह्मणाला-तूं सर्व वीरांस मारलेंस. आतां मजपुढून कोठें जाशील ? वृषकेतूस मारून समोर येऊन तीव्र भाषण करतोस, तरी आपल्या शिराचें रक्षण कर. असें बोलून असंख्य बाण सोडून दळाचा संहार करून बभ्रुवाहनास छिन्नभिन्न केलें बाणांनीं आकाश व्यापून मणिपुराचा विध्वंस केला. वनें छेदून सरोवरांचीं जलें आटलीं, नेसलेलीं वस्त्रें जळूं लागलीं. असें पाहतांच नगरजनांची पळापळ झाली.

असें पाहून बभ्रुवाहन कोपून चार बाणांनीं पार्थाचे चार घोडे खिळले. सारथी, छत्र, छेदून दोनशें बाणांनीं मारुतीस खिळला व रथ आकाशांत उडविला. तोंच पार्थानें घोडे सारथी मारून मुगूट खालीं पाडला. जो जो रथ बभ्रुवाहन घेई तो तो पार्थ तोडीत असे. जसे बाणासुराचे नगरांत शंकर व हरी युद्धास प्रवर्तले होते तशी स्थिति येथें झाली. ते दोघे दोन दिवस दारुण युद्ध करित होते, श्वास टाकण्यासही वेळ मिळेना. मग बभ्रुवाहन ह्मणाला पार्था ! गुरुद्रोण शंकरादिकांपासून संपादन कलेलें विद्याधन काढून माझ्याशीं रण करावयास ये. माझी आई पतिव्रता असून तिला निष्ठुर वाणी बोललास, तेच पाप तुला रणांत आड आलें पूर्वीं स्मरण करतांच तुला नारायण पावत असे. आतां तूं पापानें लिप्त झाल्यामुळेंच तो येत नाहीं. आतां हरिस्मरण व सर्व विद्यांची आठवण केल्याशिवाय मी तुज-बरोबर युद्ध करित नाहीं. कर्णपुत्राबरोबर युद्ध करावें तर तो स्वर्गमंदिरांत गेला. तर आतां तूंहीं त्याच ठिकाणीं जा.

असें दुर्वचन एकतांच अर्जुन क्रोधाविष्ट होऊन अनेक शर बभ्रुवाहनावर सोडले पण ते त्यानें व्यर्थ दवडिले. नंतर बभ्रुवाहनानें प्रखर असा अर्धचंद्र बाण सोडला. त्याचें निवारण करण्यास पार्थाचें मन भ्रमित होऊन कृष्णस्मरण करूं लागला. तोंच तो बाण कंठनाळी वरून शीर आकाशांत उडालें. पार्थकबंध दळाचा संहार करून वृषकेतूजवळ येऊन पडलें. शीरही वृषकेतूच्या शिराजवळ पडलें असें कार्तिक

शुद्ध एकादशीस उत्तरा नक्षत्रीं सोमवारीं संध्याकाळीं अर्जुनास मरण आलें. त्यावेळीं स्वर्गमृत्युपाताळांत हाहाःकार झाला. बभ्रुवाहन आनंद पावून जयजयकार करित नगरांत आला. स्त्रिया धांवत येऊन पुत्र विजयी झाला व पार्थ रणांत पडला. असें चित्रांगदेस सांगू लागल्या. तोंच ती पतिमरणामुळें मूर्च्छना येऊन खालीं पडली, ती बातमी दासींनीं बभ्रुवाहनास कळविली. तेव्हां बभ्रुवाहन रथांत बसून त्या ठिकाणीं आला. त्या भ्रतारशोकानें विव्हळ झालेल्या मातांस उठवून सजीव करून प्रसन्नवदनानें त्यांस ह्मणाला-मी बाहुबळानें दळ जिंकून सर्वांस मारलें. अशा आनंदाच्या वेळीं शोक कां करितां ? श्यामकर्ण रक्षण करणारे प्रद्युम्नादिक, वृषकेतु यांसी दारुण युद्ध होऊन, सर्व वीरांचा नाथ अर्जुन त्याचा अंत पुरवून शीर छेदिलें. अशा माझ्या विजयकाळीं तुह्मी दुःखांत कां पडलांत ? चला उठा, गळ्यांत मंगळसूत्र बांधा. कानांत तानवडें घाला. अशा प्रकारें मातांचा गौरव करूं लागला.

असें पुत्राचें वचन ऐकतांच माता क्रोधायमान होऊन ह्मणाली-रे दुरात्म्या पितृघातक्या ! जो धर्माचा बंधु ज्याचा सारथी सर्वेश्वर असा जो माझा प्राणेश्वर त्यास मारलास, तूं मला तोंड दाखवूं नको. आतां पुत्रवार्ता ऐकून कुंती माता प्राण देईल, धर्मादिक बंधु आत्मघात करतील, सुभद्रा द्रौपदी वैधव्यनदीचें पाणी घेतील ! अरे पाप्या, तुझें शीर रणांत धरणीवर कसें पडलें नाहीं ? मातेच्या व्रताकरितां ज्यानें

स्वर्गमार्गीं शिडी बांधिली, ज्याचा प्राणसखा श्रीकृष्ण, ज्यानें भीष्म, द्रोण, कर्ण यांचा वध केला, असा पार्थ तूं कसा मारिलास? पाप्या. पोटीं येऊन वैर साधलेंस ! आणि आम्हांस वैधव्यदशा दिलीस. असें बोलून गडबडां लोळत शोकसागरांत बुडून गेली.

नंतर उलूपी ह्मणाली—मला एका गोष्टीची आठवण झाली. त्यांनीं मला आत्ममरणाची खूण अशी सांगितली होती कीं, क्रीडावनांतील डाळिंबाचे पांच वृक्ष अग्निशिवाय जळतील तेव्हां मला मरण येईल. तरी मी पाहून येतें. असें सांगून क्रीडावनांत गेली तों पांच वृक्ष जळून पडले होते. असें पाहतांच त्यांच्या शोकास पार राहिला नाहीं. त्या पुत्रास ह्मणाल्या—रे दुर्बुद्धि ! आतां आमचाहि वध करून पार्थचरणीं पाठीव. असें पाहतांच बभ्रुवाहन मातांच्या चरणीं लागला. त्यांनीं झिडकारून ह्मटलें—पितृघातक्या ! आह्मांस स्पर्श करूं नको. आह्मांस वैधव्य देऊन पायांस कशाला लागतोस ! मग त्या प्रेताजवळ जाऊन विलाप करित ह्मणाल्या—रे पुत्रा ! आतां उशीर कां करतोस ? जसा भार्गवानें एका मातेचा वध केला, तसा तूं आम्हां दोघींचा कर. अग्निकाष्ठें जमवून आह्मांस अग्निप्रवेश करूं दे. आतां दीर येतील त्यांस तोंड कसें दाखवावें ! हस्तनापुरास जाऊन सर्वांची सेवा करावी अशी जी माझी आशा ती नष्ट केलीस ! असें ऐकून बभ्रुवाहन ह्मणाला—मी पार्थ पिता जाणून त्यास शरण गेलों होतों, पण मला लाथ मारून कठीण शब्द

बोलला ह्मणून मी संग्राम केला. तरी मी पितृघातकी अस. पाहून तीर्थेंही जळून जातील. मला यज्ञ-तप-दान सर्व अंतरलें. जरी अग्नींत जाळून घेतलें तरी तो मला स्पर्श करणार नाहीं. चक्रपाणीचा मित्र मारिला ह्मणून तोही कोपेल. यास्तव पुढें माझी गति काय होईल ?

अशा प्रकारें बभ्रुवाहन पश्चात्ताप पावून, जें होणार तें होईल असा निश्चय करून अग्निकाष्ठें आणून अग्निप्रवेश आरंभिला. चित्रांगदा ह्मणाली–पुत्रा ! कांहीं उपाय करून जर पार्थाला जीवन येईल तर पहावें. मग अग्निप्रवेश करावा. असें ऐकून उलूपी बोलली–पाताळभुवनांत बापाच्या घरीं संजीवकमणि आहे, त्याचें वासुकी रक्षण करित आहे, तो आणल्यास कार्य-सिद्धि होईल. जर पुंडरिक पाताळांत जाईल तर तो मणि घेऊन येईल. असें ऐकतांच बभ्रुवाहन पुंडरिकास ह्मणाला–तूं उलूपी मातेचा सेवक आहेस, यास्तव शेष वासुकीस माझें नमन सांगून निरोप सांग कीं, पार्थ-वृषकेतूला युद्धांत मरण आलें, ह्मणून तुझ्या जांवयास सजीव करण्याकरितां मणि दे. पुंडरिक ह्मणाला–मी यांस दंश करून पाताळांत जातों. पण या दोघांच्या शरीराचें रक्षण करावें. नंतर त्यानें पाताळांत जाऊन वासुकीस नमन करून सर्व वर्तमान सांगितलें. बभ्रुवाहनानें पित्यास मारलें ह्मणून त्यास जीवंत करण्यास मणि मागितला आहे. वासुकीनें मणि ने ह्मणून सांगितलें, तोंच कर्कोटकानें मध्यें विघ्न करून ह्मटलें–मानव लोभी आहेत, एकदां मणि नेल्यावर ते परत देणार नाहींत. तें न मानून

वासुकीनें मणि दिला. तो आणून प्रथम वृषकेतूस व मग पार्थास सजीव केला. बभ्रुवाहनानें वंदन केलें. चित्रांगदा उलूपीनें पतिचरण ओंवाळले. प्रद्युम्नादि सैन्यासही जीवंत केलें. पार्थ पांच दिवस नगरांत जाऊन राहिला. नंतर बभ्रुवाहनासह पार्थ श्यामकर्ण घेऊन पुढें निघाला. त्यावेळीं पार्थ मनांत ह्मणाला—जर अभिमन्यू पुत्र असता तर दोघां पुत्रांनींच अश्वरक्षण केलें असतें. पुढें जन्मेजय प्रश्न करील ती कथा श्रवण करावी.

# अध्याय ३९ वा.

## संजीवक मण्यास्तव पुंडरिकाचें पाताळ गमन.

नंतर जन्मेजयानें जैमिनीस प्रश्न केला कीं, सर्प क्रोधी असून मणी दिला कसा व अर्जुन कसा वांचला? तें सांगा. जैमिनी सांगतात—बभ्रुवाहनानें देह भस्म करावा असा नेम करतांच उलूपीनें संजीवकमण्याचें वृत्त सांगतांच, बभ्रुवाहन ह्मणाला—जेथें पार्थासारखा पिता मारिला तेथें सर्पाची ती कथा काय! सर्व सर्पकुळांस मारून संजीवकमणि आणून रणांगणांतील वीर उठवीन. माता ह्मणाली ही तुझी वल्गना व्यर्थ होय. ज्यानें हा भूगोल धरून चराचर रक्षिलें त्याच्यापुढें तूं बाळ कसा वांचशील? तेथें बळाचें कारण नाहीं. युक्तीनें कार्य साध्य केलें पाहिजे. बलवानासी स्पर्धा, स्त्रियेचा विश्वास व अनुचित कर्म केल्यानें मरणाला मूळ होतें, ह्मणून मी पुंडरिकास पाठवितें. तो माझ्या पित्यास समजावून हें कार्य

करील. असें सांगून पुंडरिकास बोलावून ह्मटलें—तूं पाताळांत बापाकडे जाऊन माझें हें कंठसूत्र व तानवडें पुढें ठेवून सर्व वृत्त कथन करावें आणि पतीस जीवंत करण्याकरितां मणि घेऊन यावा. सभेंत कोणी दुष्ट खळ नसेल तेव्हां बोध करावा. मग पार्थ व वृषकेतूच्या शिरास दंश करून त्यांचें रक्षण करण्यास सांगून पुंडरिक पाताळांत गेला.

तेथील अनुपम शोभा पाहून पुंडरिक शेष सभेंत गेला आणि त्याच्या पुढें कर्णभूषणें व कंठसूत्र ठेवून, वंदन करून ह्मणाला—मला उलूपीनें आपल्या हितार्थ पाठविला आहे. ती कन्येचीं भूषणें ओळखून शेष मनांत दचकला, आणि जांवयास काय झालें ह्मणून विचारांत पडला. ज्याचा सखा श्रीकृष्ण, जो सर्वांत वरिष्ठ, त्याचा निःपात कोणी केला? पुंडरिक ह्मणाला—नागेशा! पांडवांनीं गोत्रवधार्थ अश्वमेध आरंभून श्यामकर्ण सोडिला. रक्षक अर्जुनास पाठविला, तो पृथ्वी फिरत मणिपुरांत येतांच, त्याचा पुत्र बभ्रुवाहन त्यास शरण आला. असें पाहतांच पार्थानें त्यास लाथ मारून धिःकार केला. मग त्यानें निर्वाण युद्ध करून पार्थास मारलें. पार्थ गंगाशापानें मोहिला होता ह्मणून पुत्राहातीं मरण आलें. तरी त्याला जीवंत करण्याकरितां संजीवक मण्यास मला पाठविलें आहे. तरी मणी देऊन कन्येचें वैधव्य दूर करून जांवयास उठवावा व मला यश द्यावें.

असें ऐकून शेष ह्मणाला—जो विष्णुभक्त पार्थ माझा जांवई त्याला जीवंत करण्याकरितां मणि न द्यावा मग

त्याचा काय उपयोग ? पुंडरिका ! माणि घेऊन जा आणि पार्थास उठीव. असें शेषाचें वचन ऐकून धृतराष्ट्र फणी ह्मणाला–राजा ! हा माणि आमचें जीवन आहे. याच्यायोगें गरुडाची आह्मांस भीति वाटत नाहीं. त्याला मातंगऋषीचा शाप आहे, ह्मणून त्याचें पाताळांत येणें होत नाहीं. आर्वोच मनुष्यजात कपटी, त्यांच्या हातीं माणि गेल्यावर ते देवासही गणणार नाहींत, मग पाताळांत येऊन अमृतही नेतील आणि आमचाही घात करतील. शेष ह्मणाला–मी जर माणि न दिला तर पार्थाचा सखा चक्रपाणी त्यांस वांचविल्याशिवाय ठेवील काय ? ज्यायोगें राजाची कीर्ति होईल तेंच प्रधानानें करावें. मग तें राजा सुबुद्धीनें करो अगर न करो. मूर्खाची संगत धरूं नये. कृष्णानें पार्थाला जीवंत केलें कीं त्याला यश येईल व आपणास अपशय घ्यावें लागेल. मणी त्या कृष्णाचीच जीवनकला आहे. ती ब्रह्मादिकांस कळत नाहीं, मग तुह्मां मूढांस काय कळणार.

एकदां ब्रह्मदेवानें कृष्णाची परीक्षा पाहावी ह्मणून नव लक्ष गाई वत्सें गोपाळ चोरून ठेविले. मग श्रीकृष्ण तशीं रूपें नटून जनावनांत राहिला. ब्रह्मदेव सत्यलोकीं गोपाळांस ह्मणाला–तुह्मीं येथें सुखानें आनंद भोगा, गोपाळांनीं सांगितलें–जेथें कृष्ण नाहीं, असा तुझा हा सत्यलोक स्मशानवत् होय. तूं चांडाळ आहेस ' कृष्णदर्शनास विघ्न आणून ही अधर्मरीति केलीस. मग ब्रह्मदेव वनांत जाऊन

पाहतो तों गाई गोपाळ क्रीडा करित आहेत. पुनः सत्यलो कास आला. तेथेंही गाईगोप पाहिले नंतर तो ओशाळा होऊन गाईगोप आणून दिले. असा श्रीकृष्ण लाघवी आहे. तो पार्थास जीवंत करील आणि मणि न दिल्यामुळें आमचीं तोंडें काळीं होतील. धृतराष्ट्रा ! जेथें कृष्ण आहे तेथें मणि परत न देतील असें होणारच नाहीं. तें ऐकून धृतराष्ट्र ह्मणाला–एकाला वांचवून सर्वांस मारतोस असा काळ कसा आणिला ! गरुडानें सर्प मारावे अशी तुझी इच्छा असल्यास मणि देऊन कन्येचें वैधव्य हरण कर. मग तो विचारांत पडला. पुढें बभ्रुवाहन येऊन मणि हरण करील.

# अध्याय ४० वा.

## श्रीकृष्ण, कुंती व भीमसेन यांचें रणांत गमन.

मग पुंडरिक शेषास ह्मणाला तुझ्या सभेंत हा धर्मकार्याचा नाशक खळात्मा दिसतो. तूं सर्व सर्पांचा राजा व हे सर्व तुझे दास आहेत. तरी मणी देऊन पार्थास सजीव करून कन्येचें वैधव्य हरण करावें. शेष ह्मणाला–हें या दुष्टास अमान्य वाटतें. जे दुष्ट प्राणी जन्मतात ते परोपकाराच्या आड येतात. याला पुष्कळ बोध केला पण तो ऐकत नाहीं, तरी तूं मृत्युलोकीं जाऊन हें वृत्त बभ्रुवाहनास कळवून, आतां तुला पाहिजे तें कर, असें सांग. नंतर पुंडरिक रिक्तामा आलेला पाहतांच सर्वांची आशा नष्ट झाली. पुंडरिकानें पाताळांतील सर्व वर्तमान कथन केलें. तें ऐकतांच

बभ्रुवाहन कोपून सैन्य घेऊन पाताळांत जाण्यास निघाला. तो ह्मणाला—आतां सर्व सर्पाचा संहार करून अमृत व मणि आणून पित्यासह सर्व सैन्य उठवितों. शेषाकरितां जरी शंकर कैवारी आला तरी त्याला शरधारीं व्याकुळ करीन, असें बोलून पाताळविवरांत शिरला.

इकडे शेषास बभ्रुवाहन सैन्य घेऊन आला असें कळतांच, त्यानें धृतराष्ट्र प्रधानासच युद्धास पाठविण्याची योजना केली. नंतर प्रधान सर्पसैन्य जमवून युद्धास तयार झाला. उभय सैन्यें एकत्र मिळतांच खड्ग, मुद्गल, पाश, बाण, कुंज, शक्ति इत्यादि आयुधें एकमेकांवर मारूं लागले. तें कौतुक पाहण्यास देव विमानांत बसून आले. सर्पांनीं दंश करून महावीर रणांत मारिले. धृतराष्ट्र विषाग्नि ओकून बभ्रुवाहनाचें सैन्य जाळूं लागला. तेव्हां बभ्रुवाहनानें कोपून हरिस्मरण करून सर्पसैन्यास घायाळ केलें व प्रधानास विरथ केला. मग गरुडास्त्र सोडून मयूरास्त्र व पिपीलिकास्त्राची योजना केली. त्यांनीं सर्पसैन्य व्यापून टाकलें आणि उदरें फाडून, अंगावरील मांसाला मुंग्या बिलगल्या. धृतराष्ट्र निचेष्टित पडला. सारांश, मयूर, मुंग्या व नकुळ यांनीं सर्पांचीं खंडखंडें केलीं. घायाळ शेषास सांगावयास गेले. तेव्हां शेष हासून ह्मणाला—आतां पळून कां रे आलेत? धृतराष्ट्र पराक्रम सांगत होता तो कोठें गेला, पुंडरिकास रिकामा पाठविलात त्याचा परिणाम हा! त्या धृतराष्ट्रानें पहिल्यानेंच मणि देवविला असतां तर नाश

कां पावतां ? हरिभक्तांस शरण जाऊन आपलें शरीर अर्पण करावें.

नंतर तक्षकादिकांनीं सांगितलें—आतां त्यांस मणी देऊ शरण जावें आणि प्राण वांचवावा. मग शेषानें सर्वां हुकुम केला कीं, तुह्मीं हरिभक्तांचा अपमान केलात यास्त बभ्रुवाहनास शरण जाऊं या. तें ऐकतांच सर्व वस्त्रा लंकारासह मणि अर्पून शरण गेले. बभ्रुवाहनानें शेषा मणिपुरास नेलें. तोही श्रीकृष्णाची भेट होईल या इच्छे आनंदानें गेला.

इकडे धृतराष्ट्र सावध होऊन आपल्या दुर्बुद्धि व दुर्मा पुत्रास ह्मणाला—आतां अर्जुन जीवंत होईल. मला त्यानें दुःख दिलें, त्याला पराक्रम दाखवावा. बभ्रुवाहन विजयी झाल्यामुळें अश्वमेध पूर्ण होऊन त्याची कीर्ति होईल, याचें मला दुःख वाटतें. असें ऐकतांच दुर्बुद्धि ह्मणाला—मी जवळ असतां तुह्मीं असा शोक कां करितां ? मी धर्ममंदिरहारक सत्कर्माचा नाशक, भूतदयेचा घातक व स्वहितधनाचा चोर आहें. मी नाशकार्यांत प्रवीण असतां शोक कां करितां ? तुह्मीं आतां राजाबरोबर जा, मी बंधूस घेऊन पार्थशीर हरावयास जातों. गरुड ज्या ठिकाणीं नाहीं तेथें शीर घेऊन बसतों. मग पार्थ जीवंत कसा होतो तो पाहीन. नंतर बंधूसह पार्थशीर उचलून दालभ्यवनांत जाऊन बसला.

तिकडे पार्थस्त्रिया शिर पाहतात तों नाहीं, असें पाहून शोक करूं लागल्या. इतक्यांत बभ्रुवाहन शेषासह मणि घेऊन

आला. तो आक्रांत झालेला पाहून मूर्च्छित झाला. शेषानें कन्येचें समाधान केलें. ज्या दिवशीं पार्थाचें शिर छेदिलें त्या दिवशीं कुंतीस स्वप्न पडलेलें धर्म, भीम, कृष्ण यांस सांगितलें होतें. तें असें कीं—पार्थ तेलाच्या विहिरींत पडून उंटावर बसून दक्षिणेस गेला. सर्व आंग जास्वंदीचीं फुलें व गोमय यांनीं आच्छादिलें होतें.

असें ऐकतांच कृष्णानें गरुडास बोलाविलें. मग देव कुंति, रुक्मिणी, सत्यभामादिक कामिनी, भीमसेन आदिकरून गरुडावर बसून रणांत आलीं. तेथील नृपशिरें पडलेलीं सर्वांनीं पाहिलीं. पार्थाच्या प्रेताजवळ गर्दी झाली होती, तेथें येऊन कृष्ण ह्मणाला—पार्था ? ऊठ, माझा अपराध क्षमा कर. देवकी, यशोदा, कुंती, भीम व मी चक्रपाणी आलों आहों; आह्मांकडे कां पाहत नाहींस? त्यावर भीम ह्मणाला—तूं कृपा करून याला उठीव. शोक कां करतोस ? शोक मनुष्यांनीं करावा. तूं कैवल्यधामा असा कां गुंतलास ? असें बोलून भीम खवळून ह्मणाला—श्यामकर्ण धरून माझा बंधु व कर्णपुत्र कोणी मारिला ? त्याच्या रक्तांचा घोट मी घेईन.

इतक्यांत दोघी मातांसह बभ्रुवाहन सावध होऊन कृष्णास पाहतांच, कुंती, भीम व कृष्ण यांस ह्मणाला—मी पिता भ्राता मारून कुळाचा घात केला, असा मी नष्ट पातकी आहें, यास्तव गदेनें माझा घात कर. पण मी पातळांत सर्प जिंकून शेषासह संजिवकमणि जीवनाकरितां आणिला आहे, परंतु पार्थशिर नाहींसें झालें यास्तव श्री-

कृष्णा ! सुदर्शनानें माझें शिर छेदून मला पावन कर. पिता, बंधु आप्त ज्या काळीं रक्षण करीत नाहींत, तेथें त्यावेळीं चक्रपाणि भक्ताचें रक्षण करितो. पण मी पितृवधी व जननीस वैधव्य देणारा अशा मला अजून कां ठेविलेंस ? असें बोलून तिथे कुंतीच्या चरणावर लोळूं लागलीं; पण तिनें कांहीं उत्तर केलें नाहीं. पुढें कृष्ण समाधान करील व अर्जुन जीवंत होईल.

# अध्याय ४१ वा.

## वृषकेतुपार्थसंजीवन व बभ्रुवाहन नगरप्रवेश.

उलूपीनें कुंतीस नमन करतांच कुंती बोलली, तुझें वंदन मला पावलें. तूं विषदृष्टि स्त्री आहेस. भुजंगाचें घरीं जो वास करितो त्यानें मृत्यूसच बोलाविलें. मग सर्पीण ज्याची स्त्री त्यास रोकडें मरण येणारच. पितृहत्यारी बाळास पाळून अर्जुनासारखें निधान गिळून समाधान पावलीस. आणि आतां कशाला बोलतेस ? असें बोलतांच सर्वास रडें कोस ळलें. मग शेष कृष्णास ह्मणाला–पांडव शोकसागरांत बुडाले आहेत, त्यांस तुझ्याशिवाय तारणारा कोण आहे ? यास्तव कृपेची नौका करून या मण्याला मान देऊन पार्थास सजीव कर. शिर कोणी नेलें त्याचा शोध करून दुर्जन मारून सज्जनास तारावें.

नंतर कृष्णानें शंकराचें स्मरण करून ह्मटलें–जर माझें ब्रह्मचर्य व्रत असेल तर शिर नेणारा मरून तें शिर माझ्या

हातीं येईल. तोंच अकस्मात् शिरें येऊन दुर्बुद्धि व दुर्भाव यांस मरण आलें. शिरें पाहतांच सर्वांस आनंद झाला. मग कृष्णानें प्रथम वृषकेतूस व मागून अर्जुनास संजीवकमण्यानें उठविलें. त्यावेळीं सर्वांचीं क्षेमालिंगनें होऊन जयजयकार झाला. देवांनीं पुष्पवृष्टि केली. श्रीकृष्णानें रणांत पडलेल्या सर्व सैन्यासही सजीव केलें. हंसध्वजादिक नृपांस आनंद झाला अर्जुनास पाहतांच बभ्रुवाहन लज्जित झाला. सर्वांनीं अर्जुनाची व बभ्रुवाहन बाळाची वाखाणणी केली.

मग बभ्रुवाहन कृष्णचरण वंदून ह्मणाला—आतां मी पितृवधाचे पातकहरणार्थ हिमाद्री शिखरावर जातों. तेथें ही काया सांडून पातकाचें हरण करितों. तेव्हां भीम ह्मणाला—जर तुझ्या देहीं पातक असतें तर रमानायक दृष्टीस पडतां काय? श्रीकृष्णचरण सन्मुख असतां पातक कशाचें? तूं क्षत्रियधर्माप्रमाणें कीर्तिध्वज लाविलास! तरी आतां कृष्णचरण न सोडतां पार्थाबरोबर जाऊन अश्वाचें रक्षण कर. नंतर बभ्रुवाहन पित्यास वंदन करून सर्वांस भेटल्यावर पार्थ ह्मणाला—पुत्रा! तूं प्रथम पुत्रधर्म व मागून क्षात्रधर्म संपादिलास, त्यामुळें कृष्णादिकांनीं तुझें स्तवन केलें. तरी पुत्रा! तुला नाना वचनें बोललों, लाथेनें मारिलें त्याबद्दलची क्षमा कर. पुत्र ह्मणाला- बापा! मी कोटी अपराध केले असतील त्यांची माफी असावी. त्यानंतर कुंती, उलूपी, यशोदा आदि वीर स्त्रियांच्या भेटी झाल्या.

बभ्रुवाहनानें कृष्णाची प्रार्थना केली कीं, आतां नगर-

प्रवेश करावा. मग सर्व राजे आदिकरून मंडळी मणिपुर नगरांत गेली. तेथील अवर्णनीय शोभा पाहतांच सर्वांस फार आनंद झाला. बभ्रुवाहनानें पार्थादिक नृप वृषकेतु प्रद्युम्न, कुंती, देवकी, यशोदा आदिकरून सर्वत्रांस वस्त्रालंकार देऊन गौरविलें. कृष्ण भीमास ह्मणाला—तूं कुटुंब घेऊन नगरास जा; मी पार्थाबरोबर अश्वरक्षणास जातों. भीमानें बरें आहे असें सांगून सर्वांसह हस्तनापुरांत गेला. शेषास पाताळांत पाठविलें. देवानें श्यामकर्ण सोडून आपण सारथी झाला बभ्रुवाहनास सेनापती करून पुढें चालले असतां ताम्र-ध्वजानें अश्व धरिला. तेथें दारुण युद्ध होईल.

# अध्याय ४२ वा.

## पांडव व ताम्रध्वजसमागम.

भीमसेन हस्तनापुरास गेल्यावर पुढें श्यामकर्ण सोडिला त्याच्या मागून कृष्णार्जुन सैन्यासह निघाले. तों पुढें मयूर-ध्वजाचा पुत्र ताम्रध्वज याची गांठ पडली. मयूरध्वज अश्वमेध करित होता, त्यानें अश्व सोडून त्याचा रक्षक ताम्रध्वज होता. त्या दोन्हीं अश्वांची गांठ पडून एकमेकांस हुंगून चरणांनीं ताडण करीत युद्ध करूं लागलें. तें ताम्रध्वजानें पाहून अश्व धरिला व पत्रिका वाचून श्यामकर्ण आपल्या प्रधानाजवळ दिला, आणि राजास कळवून युद्ध करण्याचा निश्चय केला. मागाहून प्रद्युम्न, अनिरुद्ध, हंसध्वज, अनुशाल्व यौवनाश्व, बभ्रुवाहन, वृषकेतादिक वीर आले. ताम्रध्वजानें

श्वेतव्यूह रचून प्रधानास ह्मणाला-माझ्या पित्यानें सहा अश्वमेध करून सातव्यास आरंभ केला व अश्व सोडिला, तो आठवाही अनायासें प्राप्त झाला. मागें याग कृष्णावेगळे झाले, आठव्यास कृष्ण मिळाला; त्यामुळें मागील सर्वांची सांगता झाली. असें बोलून युद्धास सिद्ध झाला.

तेव्हां बकुल प्रधान ह्मणाला-पार्थाचें सैन्य थोडें आहे. त्यांतील बभ्रुवाहन आमचा मांडलिक प्रतिवर्षी हजार रथ भरून मुक्ताफळांचा करभार आह्मांस देतो. हें अल्प सैन्य लौकरच नाश पावेल. राजा ह्मणाला-पार्थसैन्यांत बभ्रुवाहन व वृषकेतु हे रणपंडित व कृष्णार्जुन अवतारी नरनारायण आहेत, असें कालच मला नारद सांगत होते. तो पहा, कृष्ण शंख व अर्जुन देवदत्त वाजवून सैन्यास सावध करीत आहे. असें बोलून ताम्रध्वजानें पुढें कपिध्वज पाहिला. त्यास कृष्णा देखत ह्मणाला-मजबरोबर युद्ध करण्यास सर्वांनीं सावध व्हा. तें ऐकून कृष्ण पार्थास ह्मणाला-तो पहा, मयूरध्वजाच्या पुत्रानें श्यामकर्ण धरिला आहे. तरी प्रद्युम्न-बभ्रुवाहनास युद्धास पाठवावें आपण युद्ध करूं नये असें मला वाटतें. मयूरध्वज सत्यवचनी, क्रोधरहित, धर्मपरायण व महाशूर आहे. प्रद्युम्न, वृषकेतु, अनिरुद्ध यांसी युद्ध करतील व मीही जातों. तुला श्रम झाले आहेत; तूं स्वस्थ रहा. कृष्णानें गृध्रव्यूह रचिला. तोंच तीस अक्षौहिणी सैन्याधिपति ताम्रध्वज कृष्णास बोलला-पार्था अश्व मी धरिला आहे, माझा अश्व मुक्त आहे; त्याला धरण्याची तुझी शक्ति

नाहीं, तुझ्याबरोबर युद्ध करण्यास मला भीति वाटत नाहीं, पण तूं रणभूमी सोडूं नको. असें बोलून ताम्रध्वजानें युद्ध मांडलें तें पुढें सांगितलें आहे.

# अध्याय ४३ वा.

## पार्थसैन्याशीं युद्ध व ताम्रध्वजाचा विजय.

नंतर ताम्रध्वजानें सत्तर बाण पार्थावर, तीन बाण वृषकेतूवर टाकून पांच पांच बाणांनीं वीरास, दोन दोन बाणांनीं अश्वांस, चार चार बाणांनीं हत्तींस, एकेक बाणानें पायदळास खिळून सात्यकीवर नऊ बाण, कृतवर्म्यावर आठ बाण, बभ्रुवाहानवर सात बाण, प्रद्युम्न व अनिरुद्ध यांवर अयुत बाण टाकले. असें पाहून अनिरुद्ध ह्मणाला-तुझा पराक्रम पाहिला, आतां धैर्य धर. ताम्रध्वज-तूं मदनाचा पुत्र, तुझा सासरा बाणासुर, तूं युद्ध करून दाखीव. तुझें कृष्णा समोर पतन करितों. तेव्हां अनिरुद्ध बोलला-आतां तुझें भाषण राहूंदे. माझे बाण येत आहेत ते सहन कर. असें बोलून अनिवार बाण सोडूं लागला. त्याच्या बाणांचें निवारण करून ताम्रध्वजानें नव्वद बाण अनिरुद्धाचें हृदयीं मारले. ते सहन करून तीन कोटी वीरांचा संहार केला. असें तीन अक्षौहिणी सैन्य मारून ताम्रध्वजास विरथ केलें.

नंतर ताम्रध्वजानें शर सोडून अनिरुद्धास विरथ केला. अनिरुद्धानें त्याचा रथ जाळला. तेव्हां ताम्रध्वजानें शक्ति सोडून कामपुत्रास मूर्छित केलें. तोंच प्रद्युम्नानें पांच बाण

सोडून ताम्रध्वजास विंधलें. लगेच ताम्रध्वजानें त्यासही मूर्च्छीत केलें. नंतर वृषकेतानें सारथी व रथ यांचा चुराडा उडविला. तो दुसऱ्या रथांत बसला. असे तीनशें रथ वृषकेतानें छेदले. मग ताम्रध्वजानें काळानळासारख्या शरानें त्यासही मूर्च्छीत केलें, आणि सैन्यास पळवून लाविलें. अनुशाल्व, यौवनाश्व, सात्यकी, कृतवर्मा यांसही खालीं पाडून कृष्णार्जुनास पाहूं लागला. शेवटीं बभ्रुवाहनानें रथ, अश्व, सारथी यांचें छेदन केलें. तेव्हां ताम्रध्वज ह्मणाला—तूं प्रतिवर्षी मुक्ताफळें आणून देतोस त्याचें फळ मुक्तिसदन माझ्या हातानें पावशील. असें बोलतांच बभ्रुवाहनानें हजार बाण सोडून ताम्रध्वजास विंधून एका शरानें चाप मुगूट पाडला व मूर्च्छित केला. पुनः सावध होऊन वरुणदत्त बाण सोडून बभ्रुवाहनास बेभान केलें. सर्व वीरांनीं पलायन करून प्राण वांचविले, असें दारुण युद्ध झालें. वीर पार्थास ह्मणूं लागले—आतां अंत काय पाहतोस ? गोत्रवधाचें प्रायश्चित तुला ताम्रध्वजानें दिलें. असें एकतांच पार्थानें भिऊं नका असें सांगून सैन्य स्थिर केलें. पुढें ताम्रध्वज व कपिध्वजाचें युद्ध होईल.

# अध्याय ४४ वा.

## ताम्रध्वज व कृष्णार्जुन संग्राम.

पुढें ताम्रध्वज व अर्जुनाचा दारुण संग्राम चालला. पार्थानें नऊ बाणांनीं हृदय फोडून धरणीवर पाडिला. त्यानें दुसऱ्या रथांत बसून पार्थावर पर्जन्यासारखा शरांचा वर्षाव

केला. अर्जुनानें देवदत्त शंख वाजवून शिलीमुख बाणानें रथ छेदून सारथी मारिला. मग ताम्रध्वजानें असंख्य बाण सोडून अर्जुनास त्रास दिला. पार्थानें एक हजार रथांचें चूर्ण केलें. असें दोघां शस्त्रार्थी वीरांचें दारुण युद्ध होऊन पार्थानें ताम्रध्वजाचें पांच अक्षौहिणी सैन्य मारलें. ताम्रध्वजानें दहा हजार सैन्य अर्जुनाचें मारलें. ताम्रध्वजाचे रथ दहा हजार मोडले. असें त्याचें सात दिवस अहोरात्र युद्ध चाललें होतें. मग ताम्रध्वजानें पार्थाचा रथ घेऊन पक्ष्यासारखें उड्डाण केलें, आणि खालीं टाकणार तोंच कृष्णान पाहून वरचेवर झेलला.

तें पाहून ताम्रध्वज कृष्णास ह्मणाला-अरे ! तूं हें मध्यंच लाघव केलेंस काय ? आतां माझ्या बळापुढें कोठें पळशील ? काळयवनाचे भीतीनें पळालास तेव्हां मुचकुंदानें तुझें रक्षण केलें. माझ्या भीतीनें कोठें दडशील ? असें बोलतांच कृष्णानें त्याच्या मस्तकावर गदा मारिली. तो कळवळा सोसून अमित बाण कृष्णावर सोडिले. मग कृष्णाअर्जुनाचा संवाद होऊन दोघे नरनारायण झगडूं लागले तरी तो आटोपेना ! त्यानें दोघांचे बाण छेदून कृष्णास ह्मटलें-तूं पार्थाचें सारथ्य सोडून महारथी होऊन माझ्यापाशीं झुंजतोस? तरी तूं सारथ्यच करावें. मग कृष्णानें अश्वदोरे धरून रथ फिरवून स्वहस्तानें सारथ्यास ताडण केलें. ताम्रध्वजानें दहा बाण कृष्णावर व साठ बाण पार्थावर सोडले. अर्जुनाचें छत्र पाडून शंभर बाण कृष्णावर मारले ! तेव्हां कृष्ण

पार्थास ह्मणाला—वीरा ! काय पाहतोस ? मग अर्जुनानें रथ चूर्ण केला. तों ताम्रध्वज पार्थावर उडून आला, त्याला कृष्णानें लाथेनें उडविलें. तोंच हत्तीवर बसला. तो हत्ती पार्थानें मारिला. पुनः रथांत बसतांच पार्थानें रथ चूर्ण केला. बभ्रुवाहनादिक सावध होऊन उठत होते त्यांस उठूं दिलें नाहीं. शेवटीं कृष्णानें हातांत चक्र घेतांच, त्यानें गज सोडून दिला आणि कृष्णासमोर धांवत आला. मग श्रीहरीनें शंभर अक्षौहिणी सैन्य चक्रानें मारिलें. पुढें ताम्रध्वज व कृष्णाचें दारुण युद्ध होईल.

# अध्याय ४५ वा.

## श्रीकृष्णअर्जुनाचा रत्नपुरांत प्रवेश.

श्रीहरीनें सैन्याचा संहार करितांच, ताम्रध्वज ह्मणाला—जसा सद्गुरुकृपेनें कुलक्षणास बोध होऊन आनंदस्वरूप प्रगट होतें; तेथें मायार्णव सैन्याचा तूं नाश केलास, आतां तुझें सुदर्शनासह रूप पाहिलें. पूर्वीं पुण्यें केलीं होतीं तीं मागल्या युद्धांत समर्पण केलीं. आतां फक्त तनु उरली आहे ती या युद्धांत समर्पावी ! तूं अर्जुनाचा ऋणी ह्मणून पुण्य देऊन वांचवितोस! आतां तें भांडवल सरल्यावर काय करशील ? देवा तुला पार्थासह धरीन, असें बोलून उजव्या हातानें चक्रहस्त धरून वर उडणार, तोंच कृष्णानें डावी लाथ मारून दूर उडविला. पुनः धैर्य धरून अर्जुनास बोलाविलें. कृष्णाज्ञेनें अर्जुनानें शंभर बाण ताम्रध्वजाचे हृदयावर मारले

लेंच त्यानें उड्डाण करून दोघांस दोन हातांत धरून वर उडाला. कृष्णानें लाथ मारतांच तिघेही खालीं पडून मूर्च्छा पावले. पुनः सावध झाला तों अश्वांनीं नगरद्वार गांठलें. ताम्रध्वज उरल्या सैन्यासह मागें परतला.

इकडे मयूरध्वज यज्ञमंडपांत यागकंकण बांधून असिपत्र व्रतानें नामस्तोत्र जपत होता; त्यानें दोन्ही अश्व पाहून पुत्रास ह्मटलें-अरे ? अजून वर्ष भरलें नाहीं तों मध्येंच अश्व कां आणिलेस व हा दुसरा अश्व कोणत्या राजाचा आहे ? पुत्र ह्मणाला-धर्मराजाच्या अश्वमेधाचा हा श्यामकर्ण असून त्याचे रक्षक कृष्णअर्जुन आहेत. त्यांच्या बरोबर युद्ध करून त्यांस मूर्च्छित पाडून अश्व घेऊन आलों. पण ते सावध झाल्यावर काय करतील याचा नेम नाहीं. राजा ह्मणाला-हे पापिष्ठा ! तूं या काय माकडचेष्टा केल्यास ! त्या नरनारायणांस सोडून विन्मुख आलास ? जर त्यांस आणितास तर यज्ञ यथासांग होऊन जन्मसार्थक झालें असतें आग लागो तुझ्या मूर्खपणाला ! मला तोंड दाखवूं नको, तूं भक्तपुत्र ह्मणून मान दिला, नाहींतर एका बाणांस त्रिभुवन पुरलें नसतें. कुपुत्रा चांडाळा ! ऊठ, तें स्थळ दाखीव. मी त्यांची प्रार्थना करून घेऊन येतो.

मागें कृष्णार्जुन सावध होऊन पाहातात तों अश्व ताम्रध्वजानें नेला. श्रीकृष्ण ह्मणाला-अश्व रत्नपुरांत गेला तो मिळण्यास कठिण आहे, तरी मयूरध्वजाचें सत्त्व पाहाण्यास जाऊं चला. मग कृष्णार्जुन रत्नपुरांत आले. त्या नगरीचें

वर्णन शेषाच्यानेंही झालें नाहीं. अशी ती नगरी पाहून ते दोघे आनंद पावले. आणि कृष्ण वृद्ध ब्राह्मण होऊन अर्जुनास शिष्य करून हात धरून चालले. नगरांत जातांच सर्वांनीं त्यांस नमन केलें. ते हिंडतां हिंडतां दोन प्रहर रात्र झाली; तों तेथें असें कौतुक झालें कीं, एक विलासी पुरुष स्त्रीजवळ रतिविलास करते वेळीं ह्मणाला—मी तुझीं सर्वांगें पाहिलीं,पण जी तृप्ति कृष्णसंगानें होते ती येथें नाहीं. स्त्री ह्मणाली—मी कृष्णस्वरूपीच सुंदरा असून माझ्या दर्शनानें काममोक्ष होतो. माझ्या सर्व गात्रांठायीं कृष्णस्थान आहे. पति ह्मणाला, मैथुन कसें करावें ? स्त्री बोलली—कामलंपटा ! माझे ओंठ सोड;जे वैकुंठपीठाचें उच्चारण करितात त्यांस क्षतें कां करितां? तसेंच कृष्णमुखी माझे कुच त्यांचें मर्दन कां करितां ? जो भल्यास पीडा देतो त्याचें पतन होतें. पुरुष ह्मणाला—हेंही स्थान मदनाकरितां आहे, तें मर्दन केल्याशिवाय रति सोडित नाहींत. अशीं त्यांचीं वचनें गुरुशिष्यांनीं श्रवण करून, प्रातःकाळ होतांच यज्ञमंडपांत आले. पुढें राजाचें व ब्राह्मणरूपी कृष्णाचें संभाषण होईल.

# अध्याय ४८ वा.

## श्रीकृष्ण व मयुरध्वजाचें संभाषण.

मयूरध्वज राजा यज्ञस्थानीं बसला होता व दोन्ही अश्व आंगणांत उभे होते. ब्राह्मण आशिर्वाद देऊन ह्मणाला—राजा तुझा यज्ञ श्रवणीं ऐकून या बालशिष्यासह धांवत

येतांच फार कष्ट पावलों. राजा ह्मणाला-तुह्मांस पाहून मी पावन झालों. पण तुह्मीं येतांच आशिर्वाद दिलात त्यायोगें मन भय पावलें. नमस्कारा अगोदर ब्राह्मण जर आशीर्वाद देईल तर कुलक्षय करावयास शाप नको. असें बोलून नमस्कार घातला. वृद्ध ब्राह्मणानें कांपत कांपत दोन हात धरून राजास उठविलें. राजानें विचारलें-तुह्मीं कोठून आलेत व काय इच्छा आहे ती सांगावी. ब्राह्मण ह्मणाला-राजा! नमस्काराच्या अगोदर आशिर्वाद द्यावा लागतो, जर आपली विज्ञापना असेल तर अगोदर आशिर्वाद द्यावा. यावेगळें नमस्काराशिवाय आशिर्वाद देऊं नये. असें ऐकून राजानें संतोषून मनोगत विचारलें.तेव्हां कृष्णानें शिष्यास खुणाविलें कीं, पहा कसा दाता आहे तो!

मग ब्राह्मण ह्मणाला-मी ज्या निमित्तानें येथें आलों त्याचें कारण सांगतों ऐक. मी हस्तनापुरींचा वृद्ध ब्राह्मण, सांप्रत वस्ती द्वारका, तेथून धर्मयागाचे समाप्तीस जात होतों, पण त्यास विलंब असल्यामुळें येथें तुमच्या कृष्णवर्म्याची कन्या आहे ती पुत्रास मागून यागद्रव्य संपादन करून सून मिळवावी आणि कार्यसिद्धि साधून जावें, अशा हेतूनें मुलास घेऊन येत असतां मार्गांत सिंहानें त्यास धरिलें तेव्हां मी दुःख करूं लागलों. मग तो ह्मणाला, अरे आह्मीं मनुष्यभक्षक घातक प्राणी! पुत्राशिवाय सद्गति नाहीं असें शास्त्र सांगतात; तो निजधामास गेल्यावर परत कसा येईल? तरी आतां घरीं जाऊन पुत्रोत्पत्ति कर. मी

त्यास ह्मणालों—आतां आह्मीं वृद्ध झालों, गर्भ कसा धरेल? मला भक्षण कर आणि वंशवृद्धीकरितां पुत्रास सोड. सिंह ह्मणाला—तुझें शरीर रोड झालेलें, त्यावर मांस नाहीं. धष्टपुष्ट मनुष्य असला ह्मणजे आमची क्षुधा शमते. तुह्मां तिघांस भक्षावें तर मृत्यूची आज्ञा नाहीं. तूं चिरंजीव, तुझा जीव कसा घेऊं? याचें आयुष्य सरलें ह्मणून यास मारला. वाघ, सिंह, लांडगे आह्मीं मृत्यूचे सेवक! त्याची आज्ञा पाळितों. असें त्याचें भाषण ऐकून मी पुत्रास मोकळविण्याकरितां त्यास पुष्कळ बोध केला. तेव्हां तो ह्मणाला—जर मयूरध्वज राजाचें शरीर मला देशील तर मी तुझ्या पुत्रास सोडीन. ह्मणून मी आपल्यापाशीं आलों आहे. पूर्वीं रामचंद्रानें ब्राह्मणपुत्र मरण पावतांच निजबळानें आणून दिला तसा तूं रामचंद्र होऊन माझा पुत्र सोडवावा.

असें ब्राह्मणाचें वचन ऐकून राजा ह्मणाला—स्वामी! तुमच्या पुत्राकरितां आपलें शरीर अर्पण करितों. तें ऐकून ब्राह्मण समाधान पावला. मग पुत्रास राज्यावर बसवून गंगाजळ, शालिग्रामशिळा, तुळशी घालून शुद्ध होऊन सर्वांस ह्मणाला—मला सद्गति मिळण्याकरितां तुह्मीं सर्वांनीं साह्य करावें. हरिरूपी ब्राह्मणास कोणी दुर्वाक्य बोलूं नका, हें शरीर कृमि—कीटकांचा गांव आहे, तें सत्कार्यीं लावून सार्थक करावें. असें सांगून ब्राह्मणास ह्मणाला—आतां माझें शरीर कर्वतून अथवा सगळेंच न्यावें. पुढें राजा स्वशरीर कर्वतानें छेदून विप्रास देईल, ती कथा श्रवण करावी.

# अध्याय ४७ वा.

## मयूरध्वजाचें आख्यान.

राजाचें वचन ऐकतांच, हा काळरूपी ब्राह्मण समजून लोक कंपायमान होऊन म्हणाले–आजपर्यंत पुष्कळ ब्राम्हण पाहिले, परंतु प्राणदान कोणी मागितलें नव्हतें ! अशा राजा कल्पांतीं मिळणार नाहीं. नंतर राजानें ब्राम्हणांस दानें देऊन भिंत येऊन करवत आणवून म्हटलें–तुम्हांस पदर पसरून सांगतों कीं, ब्राम्हणास दुर्वाक्य बोलूं नका. जो अनंतकोटि ब्रम्हांडनायक, ज्याचे गर्भगृहांत चतुर्दश लोक आहेत तोच हा ब्राम्हण. यास विन्मुख दवडूं नका. असें बोलून पद्मासन घालून वासुदेवाचें स्मरण केलें आणि ब्राह्मणास बोलाविलें. नंतर पूजा करून शरीरार्ध नारायणप्रीत्यर्थ दान घ्या असें बोलून करवत शरीरावर घातला असें पाहतांच सर्वांस रुदन आलें.

त्यावेळीं शुद्धमती राणी राजास म्हणाली–महाराज ! स्त्री पुरुषाचें अर्धें शरीर असें श्रुतिवाक्य आहे यास्तव माझें कलेवर विप्रकार्यास द्यावें. तुम्ही अर्धें शरीर दिलेंत तरी तें चतुर्थांश झालें. सजीव दान द्या. निर्जीव दानानें पंचानन तृप्त होणार नाहीं, आणि पतिचे अगोदर स्त्रीला मरण आल्यास तिचा वास वैकुंठीं होतो असें मी ऐकिलें आहे. असें ऐकून ब्राह्मण घाबरून राजास बोलला–धन्य तुझा सत्वमहिमा ! तुझें आचरण पाहून आत्माराम तुष्ट झाला. तरी स्त्रीवंत डावें आंग

तें मला नको. तुझें उजवें अंग देशील तरच माझा पुत्र सुटेल. तूं कीर्तिवान् असून भयानें स्त्री दिली असें ह्मणशील. असें ऐकतांच राजपुत्र ताम्रध्वज ह्मणाला-मज बाळकाचें सर्वांग दान घेऊन पुत्र सोडवावा व मला धन्य करावें. तीन ऋणांपासून बापाला पुत्रानें सोडवावा असा वेदार्थ आहे, यास्तव माझा देह घेऊन पिता मुक्त करावा. भीष्म व श्रीराम पितृवचनानें यश पावले, तसें हा तरुण देह घेऊन मला यश द्यावें.

ब्राह्मण राजपुत्राला ह्मणाला- धन्य धन्य तूं एक पुत्र! आपल्या कुळाचा उद्धार केलास! पण त्या सिंहाचें वचन असें आहे कीं, स्त्रीपुत्रानें मिळून राजदेह करवतून उजवें अंग भक्षणास द्यावें, ह्मणजे पुत्र सोडीन. तें वचन खोटें करूं नये. लोक खरें ह्मणतील तेंच केलें पाहिजे. असें ऐकतांच राजानें स्त्री पुत्राहातीं करवत देतांच लोक रुदन करूं लागले. ब्राह्मण शिष्यास ह्मणाला चल उठ. अशा आक्रांतानें दान कोण घेईल! तेव्हां राजा सर्वांस ह्मणाला अश्रुपात करूं नका. विप्र संतुष्ट करून माझा मनोरथ पुरें द्या. हा ब्राह्मण नव्हे, श्रीकृष्ण व शिष्य अर्जुन होय. यांच्या पुढें मस्तक छेदून अर्धांग द्या. मग स्त्रीपुत्र मस्तक कवतूं लागलीं, त्यांस सौन्यरूप पाहतांच विप्र उठून जाऊं लागला व ह्मणाला-हें सौन्यदान आह्मांस नको. नंतर स्त्रीपुत्रांनीं राजाचे गुण राम कृष्ण नांवानें उच्चारून कंठापर्यंत शीर करवतलें. तों नवल झालें. राजाचे डावे नेत्रांतून अश्रुपात झाला. तो पाहून विप्र ह्मणाला-राजा! दुःखानुरुदन केलेंस, यास्तव अमंगळ

लोभीष्टाचें दान कशाला घ्यावें ? माझ्या पुत्राला मरूं दे. लोक मला निपुत्रिक ह्मणतील एवढेंच कीं नाहीं ! असें बोलून शिष्यासह निघाला.

तेव्हां राणीनें ब्राह्मण गेल्याचें कळवितांच, राजानें खूण करून कागद लेखणी मागवून लिहून दिलें कीं, स्वामी ! वामनेत्रीं पाणी येण्याचें कारण असें कीं, उजवें अंग पवित्र झालें व डावें अंगाचा त्याग केलात, ह्मणून त्या नेत्रांतून पाणी पडलें. असें वृत्त जाणून ब्राह्मणानें आत्मस्वरूप प्रगट करून वर मागण्यास सांगितला. शिष्यानेंही रूप पालटून अर्जुन होऊन उभयतांनीं राजास आलिंगन दिलें; त्यावेळीं इंद्रादि देवांनीं पुष्पवृष्टी करून जयजयकार केला. देवानें अमृतवृष्टि करितांच राजाचें शरीर दैदीप्यमान झालें. सत्वशील राजा, धन्य धन्य ! असें ऋषि आदिकरून ह्मणूं लागले. मग देव राजास ह्मणाला—मयूरध्वजा ! तूं कीर्तिध्वज फडक विलास, आतां तूं माझा यजमान व मी तुझा आश्रित होय. तुझ्या ताम्रध्वज पुत्रानें मला व अर्जुनालाही जिंकलें, तुझ्या शुद्धमती राणीची कीर्ति सत्यलोकीं गेली. असा तुझा भक्तिसागर मी अर्जुनास दाखविला, आतां दोन्हीं अश्व घेऊन धर्मयाग पूर्ण कर. यागभोक्ता मीच असून तुझ्या येथें तृप्त झालों. मग कृष्णाला वंदन करून राजा ह्मणाला—देवा माझें मागणें हेंच कीं, पुत्र कलत्र जनांसह वर्तमान तूं माझ्या हृदयांत नांदावें. नंतर श्रीकृष्णाचें स्तवन केल्यावर राजानें षोडशोपचारें पूजा करून केलेले सहा याग

अर्पण केले आणि अर्जुनास वस्त्रालंकारांनीं गौरविलें. तथून राजा कृष्णासह रणांत आला. कृष्णानें सर्व सैन्य उठविलें. श्यामकर्ण आणून राज्य, गृह, पुत्र कृष्णार्पण केल्यावर धर्मकार्यास जाऊं चला असें सांगतांच राजानें पार्थास वंदन करून अर्जुन जी आज्ञा करील ती मी मस्तकीं वंदीन असें ह्मटलें. पुढें श्यामकर्ण सोडून सर्व सैन्य सारस्वतपुरास जाईल, तेथें वीरवर्मा अश्व धरील.

# अध्याय ४८ वा.

## अश्वाचें सारस्वतपुरास गमन.

पुढें श्यामकर्ण सारस्वतपुरास येतांच सेवकांनी वीरवर्मा राजास कृष्णार्जुनाचे श्यामकर्ण आल्याचें कळविलें. तें ऐकून राजास आनंद झाला. त्यानें पुत्रांस हुकूम केला कीं, श्यामकर्ण धरून आणा. आपल्या घरीं नरनारायण आले, त्यांच्या दर्शनानें मी पावन होईन. मग सुशील, सरळ, सुरभ, कुवळ व रसाळ या पांच राजपुत्रांनीं जाऊन परदळ तृणवत् मानून अश्व धरून चालले. नगरांत प्रवेश करणार तोंच बभ्रुवाहनानें दारुण युद्ध केलें. तेव्हां पांच जणांनीं बभ्रुवाहनास वेढा घातला. त्यावेळीं त्यांचे मल्लयुद्ध सुरू झालें. बभ्रुवाहनानें सैन्यसंहार करून पांचही जणांस जिंकलें. तेव्हां राजाचा घरजांवई यम, त्यानें आज्ञा मागून पार्थसैन्यावर चाल करून सैन्यकंदन केलें. तें पाहून अर्जुन कृष्णास विचारूं लागला. हा नररूपी महा-

शूर कोण असावा ? कृष्ण ह्मणाला–हा वीरवर्म्याचे घरजांवई यम ! पार्थ बोलला–राजाचे घरीं यम जांवई कसा झाला ? कृष्ण सांगूं लागला–राजाची मालिनी नांवाची कन्या लावण्यवती होती. तिला नर पति न आवडून मला यमास द्यावी ह्मणून बापास सांगितलें. मानव वर नको याचे कारण असें कीं, मानव मरण पावल्यावर अग्निसंग करावा लागतो, ह्मणून यम पति केल्यानें सर्व अनर्थ चुकतील. अशी माझी इच्छा पूर्ण करावी. मी त्याची सेवा केली असतां माझें न पापापासून रक्षण करील. असा मुलीचा निश्चय पाहून राजानें यमास कन्या अर्पण केली. ती कथा श्रवण कर

# अध्याय ४९ वा.

## रंगांसह यमाचें मारस्वतपुरांत गमन.

वीरवर्मा राजा मुलीचें वचन ऐकून, यमाचें स्तवन करीत अहोरात्र अनुष्ठानास बसला. मालिनीही तरुण होती मनोभावानें यमआराधना करूं लागली. तिचें लावण्य व निश्चय पाहून नारदमुनीनें आपणाकडून जरी कन्यादान घडत नसलें तरी, दुसऱ्याकडून घडवावें; अन्नदान देववलें नाहीं तरी अन्नाचें घर दाखवावें, असा विचार करून यमस भेंत गेला. यमानें त्यास साष्टांग नमस्कार घालून पूजा करून आसनावर बसविलें. मग नारद ह्मणाला–तूं ? सर्वांचे मनोगत जाणतोस आणि मालिनीचे श्रम कां जाणत नाहींस ? ती तुझ्या प्राप्तीकरितां अहोरात्र अनुष्ठान करीत आहे, तरी

तूं सारस्वतपुरांत जाऊन तिचा अंगीकार कर. नारदाचें वचन ऐकून यम ह्मणाला–नारदमुने ! तूं पुढें चल, मी वैशाख शुद्ध द्वादशीस येऊन तिचें पाणिग्रहण करितो. तेथून नारद निघून राजास व मालिनीस वृत्त कथन करिता झाला. तें ऐकून मालिनीस परमानंद वाटला.

इकडे यम एकशें आठ रोगांस वऱ्हाडी मिळवून लग्नास निघाला. सेनापति जो क्षयरोग, त्यास यम ह्मणाला—मी विवाह योजिला आहे. तरी तुह्मीं सारस्वतनगरांत चलावें. क्षय ह्मणाला–आमचा त्या नगरांत प्रवेश होणार नाहीं. तेथील लोक धर्मनिष्ठ पुण्यपरायण आहेत, त्यांच्या पुढें आमचें कांहीं चालावयाचें नाहीं. यमधर्मा ! तेथें तुमचाही शिरकाव होणार नाहीं, मग आमची काय कथा ? असें रोगांचें वचन ऐकतांच यमानें सांगितलें–तुह्मीं सुंदर मानवरूपें धरून प्रवेश करा आणि आपलें वैभव पापी जनांस दाखवा. तेथील यथायोग्य आचरण पाहून तुह्मांस मी स्थानें देईन. ज्यानें ब्रह्महत्या केली तो नरक भोगून नरजन्मीं येतो, तेथें क्षयरोगानें राहावें. क्षयरोग्यानें पंचाक्षरी मंत्राचा कोटी जप करून ब्राह्मणांस दानें दिलीं असतां क्षयानें त्यास सोडावें. सुवर्णपुरुष करून ब्राह्मणास दान देऊन महारुद्रापुढें होम करावा. क्षयरोगी दरिद्री असल्यास सोमवारीं शिव पुजावा, एक महिना गौतमीस्नान केल्यानें क्षयमुक्त होईल. जे नारीनर पुण्यवंत असतील तेथें सेवकाप्रमाणें असावें आतां तुह्मांस स्थळें नेमून देतों तीं ऐका–

जी तुझी नायिका विषूचिका कुमारांस होते ती कोणत्या पातकानें तें ऐक. देवास दिलेलें वित्त चोरणें, ब्राह्मणाचें पात्र ओढणें, अशा स्थानीं तूझी प्रिया राहूं दे, पुत्र, बंधु, ब्राह्मण गावांचून एकटाच मिष्ठान्नभक्षक, त्याच्या देहांत तुझ्या प्रियेस असूं दे. जो अन्नदान क्षीरदान देतो त्याचे चरण वंदून त्या नगास सोडावें. तुझ्या पुत्राचे स्थान—जो मातृगोत्रासी गमन करील, सुवर्ण चोरील, तेथें तुझा पुत्र प्रमेह यानें राहावें. जो सुवर्णवाळु पळभर देईल, देवास सुवर्णभूषणें करील, तेथून प्रमेहानें पळ काढावा. पळप्रमाण सुवर्णकमळ ब्राह्मणास दिल्यानें तो मूत्रस्थळापासून सुटेल. जो शिवलिंगच्छेदक, सर्वस्वाचा अपहारकर्ता, दुसऱ्याचा उदय पाहून दुःखी, तेथें धापेसह पंडुरोगानें असावें. शास्त्रोक्त लक्षण पाहुन महिषदान करून जपा-पुष्पानें पूजन करील, तीर्थांत अथवा गंगातीरावर तीन वेळ विष्णुसहस्रनाम जप करील त्याला पंडुरोगानें सोडावें. जो धर्माचें द्रव्य हरण करितो, तेथें तुझी बहीण संग्रहणी हिनें रहावें आणि वस्त्रें भूषणें सुवर्ण ब्राह्मणास दान दिलें असतां तिनें तेथून पळावें, गर्भपतन करणारास जलोदर होतें. जे एकशें आठ व्रण मला मान्य आहेत तेही त्यांचे देहांत राहावें. त्यानें तुळापुरुष दान केल्यानें जलोदरानें गमन करावें व जो अर्धप्रसूत गोदान करील तेथें व्रणानें राहूं नये. रस चोरणाराजवळ अरुचीनें राहावें; रसदान वस्त्रें, सुवर्ण, दिल्यानें अरुचीनें पळावें. सर्व स्त्रियांसीं गमन

कृष्णाराजवळ भगेंद्रानें राहावें आणि फलयुक्त सुवर्णकर्दळी ब्राह्मणास दिल्यानें भगेंद्रानें पळावें. विश्वासघात्याशीं सन्निपातानें असावें, त्यानें शिवालय बांधतांच सन्निपातानें पळावें परनिंदकाजवळ अतिसारानें रहावें. त्यानें लिंगप्रतिष्ठा केली कीं तेथून पळावें उत्तम पुरुषाचा जो द्वेष करितो तेथें खोकल्यानें असावें, तोभूमीदान व ब्राह्मणस्तवनकरीलतर त्यानरास सोडावें.

आशाप्रकारें अरोचक, शूळ, उचकी, धनुर्वात, कपाळशूळ नेत्ररोग, गालगुंडे, कुष्ठ, गंडमाळा, अपस्मार, गजकर्ण, शीरपीडा, शिरोरोग वगैरेंचीं स्थानें व उपाय यमानें सांगितले. ते सर्व ऐकणें असतील तर कर्म विपाकांत पाहावे अशा रोगांस बरोबर घेऊन यम लग्नास निघाला.

# अध्याय ५० वा.

## वीरवर्म्याचें युद्धाख्यान.

यमधर्म सेवकांसह सारस्वतपुरांत राजकन्या वरण्याकरितां जेथें नारदमुनी होते तेथें गेला. रोग भीतीनें दशदिशा पळूं लागले. तें नगर पाहून धर्मराज समाधान पावला. मालिनी यमधर्माचें स्मरण करीत होमशाळेंत अग्नीस आहुती देत होती, तिला पाहिल्यावर नारदास वंदन केलें आणि राजास ह्मणाला—मी यमधर्म तुला प्रसन्न झालों, काय तो वर माग. राजा बोलला—तूं जरी माझा जांवई झालास तरी मी जर वर मागेन तर मला धिःकार असो. ज्या कुळांत अधर्मी असतात, ते कन्याधनाची इच्छा करितात आणि

कल्पपर्यंत नर्कवास भोगितात; तसा मी नव्हे. यम ह्मणाला-तूं दाता आणि मी प्रतिग्राहिता, त्या तुला मी आशिर्वाद दिला असतां निषिद्ध कोण मानील ? राजा बोलला-ज्यावेळीं मला मरण येइल त्यावेळीं हरीस्मरण असावें; हाच वर मागतों, यम राजास ह्मणाला-मी कल्पपर्यंत तुला सोडणार नाहीं. जोपर्यंत तूं कृष्णास पाहशील तोंपर्यंत शत्रुसैन्य वारीन. असें बोलून राजकन्येचें पाणिग्रहण केलें. मग यम समाधान पावून घरजांवयासारखा राहिला.

कृष्ण पार्थास ह्मणाला—तो हा यमधर्म ! राजाला माझें दर्शन होतांच यम निजस्थानास जाईल. तो वीरवर्मा माझ्या दर्शनाकरितां वीरांसह येत आहे. यास्तव मयूरकेत, बभ्रुवाहन, ताम्रध्वज, वृषकेत, प्रद्युम्नादिक वीरांस युद्ध करूं दे; आपण कौतुक पाहूं. असें कृष्ण बोलत आहे, तोंच वीरवर्मा धांवत येऊन पार्थास ह्मणाला—माझे बाण सहन कर. असें बोलून सात बाणांनीं अर्जुनास विंधून, कृष्णास आच्छादून टाकला आणि पांच पांच बाणांनीं सर्व विरास मूर्च्छित केलें. तेव्हां पार्थानें बाणांनीं आकाश व्यापून टाकिले वीरवर्म्यानें आपल्या विरांस ह्मटलें-अश्वाचें रक्षण करा, आतां कृष्णार्जुनासीं युद्ध करावें लागेल. असें बोलून शरजाळ मोडिलें. त्याचें पार्थानें निवारण करून एक बाण सोडून राजाचें ह्दय भेदलें. तोंच त्यानें साठ बाणांनीं अर्जुन, शंभर बाणांनीं कृष्ण व शंभर बाणांनीं हनुमंत खिळला.

असें पाहून कृष्ण अर्जुनास ह्मणाला—मा आजपर्यंत पुष्कळांस जिंकलें; परंतु वीरवर्म्यास मज्यानें जिंकवणार नाहीं कर्णरथाचें चाक भूमिगत करून त्याचा घात केला पण याचें चक्र ग्रासावयास धरणीही समर्थ नाहीं. शिशुपाळाचें शिर चक्रानें छेदलें, तसा याचा कंठ चक्रानें छेदणार नाहीं. माझें चक्र याला पुष्पप्राय आहे. तूं ज्या शरांनीं जयद्रथाचें शिर समुद्रांत उडविलेंस ते शर येथें चालणार नाहींत. तूं खांडवन जाळून ऐरावतीस खालीं आणलेंस. ज्या शरानें भीष्मादिक मारलेंस ते शर येथें तृणासमान आहेत. असें बोलून हनुमंतास ह्मणाला—तूं आतां पुच्छानें रथ गुंडाळून महासमुद्रांत नेऊन टाकशील तरच हा थांबेल. नाहींतर सर्व वीरांचा एकदांच घात करील. मारुती ह्मणाला—हें अशोकवन किंवा जंबुमाळ्याचा प्राण घेणें नव्हे. किंवा ही राक्षसजाति नव्हे. आणि त्या वेळीं मी तरुण होतों आतां वृद्ध झालों आणि हा काळाचा मामरा, याशीं कोणी झुंजावें ? कृष्ण ह्मणाला--अरे ! धर्मकार्यास अंग कां चोरतोस ? धर्मकार्यार्थ शतोपाय करून समुद्रांत रथ टाक, नंतर मारुती रथ घेऊन, आकाशांत उडाला; तोंच वीरवर्म्यानें कृष्णार्जुनास हातांत धरून आकाशांत उडून मारुतीस ह्मटलें तूं माझा रथ नेलास पण मी तुझा रथ कृष्णार्जुनांसह घेऊन मागें आलों. तूं जेथें जाशील तेथें मीही येईन. ज्यांची स्वप्नांत भेट नाहीं तें कृष्ण अर्जुन सांपडले असतां कसे सोडूं ? मारुती ह्मणाला—कृष्णानें स्वभक्त ह्मणून तुझा महिमा वाढविला

तू पराधीन असून बळाभिमानानें पुरुषार्थ कां वर्णितोस ? जो आपला पुरुषार्थ सांगतो त्यास सत्पुरुष ह्मणत नाहींत. नंतर राजानें हनुमंतास मुष्टिघात देतांच तो पडत असतां कांखेंत दाबला. असें पाहून कृष्णानें हृदयावर लाथ मारली. तरी तिघांस सोडिलें नाहीं. तो त्यांस ह्मणाला–तुमचें तिघांचे बळ काय झालें ? यमानें मला मरण सांगितलें तें कृष्णदर्शन झालें तरी कोठें पळून गेलें ? आतां मी जन्म-मरणास आंचवलों. कृष्ण अर्जुनास ह्मणाला–याशीं हजार वर्षपर्यंत युद्ध केलें तरी हा पराभव पावणार नाहीं. त्यावर पार्थ बोलला–चक्रपाणी ! तुला जो प्रिय त्याला मज दुर्बळा-च्यानें जिंकवणार नाहीं. मग वीरवर्मा ह्मणाला–अर्जुना ! तूं त्रैलोक्य जिंकून देवास संतोषित करशील असें बोलून रथावर धनुष्यबाण ठेवून कृष्णार्जुनास व हनुमंतास वंदन करून आलिंगन दिलें. पांच दिवस युद्ध होऊन सहावें दिवशीं सैन्य उठतांच सर्वांस नगरांत नेऊन त्यांचा गौरव केला. एकवीस हजार शुभ्र हत्ती, हजार श्यामकर्ण, हजार नारी अर्जुनास अर्पण करून राज्य कृष्णार्पण केलें. पुढें जातां-च नद लागला, त्यावरून श्यामकर्ण पाण्यास खुर न लागे-तां उडून गेले. राजानें नौका आणून सैन्य परतीरास नेलें. पुढें चंद्रहास श्यामकर्ण नेईल.

---

# अध्याय ५१ वा.

## चंद्रहासआख्यान.

जैमिनी सांगतात—जन्मेजया ! येथून पुढें चंद्रहास राजाचें चरित्र ऐक. दोन्ही श्यामकर्ण चंद्रहासाचें नगरांस जातांच मागील वीरांस दिसेनासे झाले. तेव्हां सर्वांस संकट पडून अश्वास कोणी धरून नेलें किंवा तेच पाताळांत गेलें तें कांहींच कळेना. इतक्यांत नारदाची स्वारी समोर येतांच दृष्टीस पडली. त्यांस पार्थादिकांनीं नमस्कार करून, श्यामकर्ण पाहिले काय ? ह्मणून प्रश्न केला. तेव्हां नारदानें सांगितलें—अश्व कुंतलपुरास चंद्रहासाचे नगरांत गेले. ते तुह्मांस मिळणें कठीण आहे, त्याचा कळिकाळास धाक आहे. तेथें तुमची कथा काय ? यास्तव नगरास परत जावें असें ऐकून पार्थ ह्मणाला—मुनिनाथा ! त्या पुण्यश्लोकाची कथा मला सांगा.

नारद ह्मणाला—पार्था ! पूर्वीं केरलदेशाधिपति सुधार्मिक नांवाचा राजा धर्मन्यायें राज्य करून प्रजेस पुत्रवत् पाळित होता. त्याचा हा मूळ नक्षत्रावर जन्मलेला पुत्र ! त्या राजास रणांत शत्रुनें मारलें. त्याची स्त्री रमणी हिनें पतिसहगमन केलें. त्या चंद्रहास मुलास दासीनें घेऊन कुंतलपुरास पलायन केलें आणि भिक्षा मागून पोट भरित असे. पुढें तीही मरण पावली. त्यावेळीं मुलगा तीन वर्षांचा होता. त्याचेवर भगवंताची दया ह्मणून तो वांचला. तो

मुलगा मुळावर जन्मल्यामुळें पितृकूळ नष्ट करून एकटाच उरला. तो आईबापरहित अनाथ बाळ जाणून सर्व लोक त्याची जोपासना करूं लागले. तो सर्वांस आवडता झाला. श्रीकृष्णानेंच त्याची आईबापें होऊन सांभाळ केला. तो मुलांबरोबर खेळत असतां, त्याला एक शालिग्राम सांपडला. त्यावर बाळानें प्रेम ठेविलें. त्याला मुलें ह्मणत कीं, या गोटीनें कां खेळत नाहींस ? तो ह्मणाला—हा माझा स्वामी पंचप्राणांस जडवून ठेविला आहे. खेळतांना संकट पडेल तेव्हां या गोटीनें खेळेन. तो त्याला भलत्याच उदकानें स्नान घालून भलतेंच पान वाहून भलतेंच अन्न अर्पण केल्यावर जेवीत असे.

एके दिवशीं तो खेळत खेळत दुष्टबुद्धि प्रधानाचे घरीं गेला. त्याचेकडे त्या दिवशीं प्रयोजन असल्यामुळें ब्राह्मण जेऊन तृप्त होऊन विडा दक्षिणा घेऊन प्रधानास आशिर्वाद देते झाले कीं, तुझे मनोरथ पूर्ण होतील. अशा मंत्राक्षता मंत्रून हाच प्रधानपुत्र समजून चंद्रहासास आशिर्वाद दिला. तोंच प्रधान आला. त्याला हा राजचिन्हांनीं मंडित तुमचाच पुत्र काय ह्मणून त्यांनीं प्रश्न केला. प्रधान ह्मणाला–अशीं मुलें घरोघर पुष्कळ आहेत. हा कोणाचा पुत्र व काठेचा हें मी जाणत नाहीं. असें ऐकून ब्राह्मण ह्मणाले–याची लक्षणें उत्तम असून हा राजा होईल. याचा तूं प्रतिपाळ कर, हा तुझ्या संपत्तीचें रक्षण करील. असें ऐकतांच प्रधान व्याकुळ होत्साता मनांत समजला कीं, हा माझा

घात करून संपत्तीचा मालक होईल. असें मनांत आणून त्याचा घात करण्याचा निश्चय करून मारेकऱ्यांस बोलावून ह्मणाला–याचा अरण्यांत नेऊन वध करून पदांगुलीची खूण मला दाखविण्यास आणा. राजाज्ञेप्रमाणें चांडाळांनीं त्याला भयंकर वनांत मारण्यास नेलें, आतां माझा प्राण घेणार असें बाळानें जाणून हातांतील शालिग्राम शिळेकडे पाहून ह्मणाला–आतां उशीर कां लाविलास ? माझा अन्याय काय झाला ? तूंच पालन करून मारूं लागलास, मग हांक कोणाला मारावी ? प्रल्हाद, ध्रुव, भक्त गज यांचें रक्षण केलेंस आणि मजविषयीं निष्ठुर कां झालास ? मी मेल्यावर तूं परदेशी होऊन एकटाच वनांत उपाशीं फिरशील. याकरितां प्रथम तुला गिळून मग मी मरण पावेन. असें भक्तवचन ऐकतांच ईश्वरानें कौतुक केलें. तें असें कीं, चांडाळाची बुद्धि फिरवून त्यांच्या मनांत दया आणिली. मग त्यांनीं त्याच्या डाव्या पायाचें सहावें बोट कापून घेऊन सोडून दिलें व तें बोट दुष्टबुद्धीस आणून दाखविलें. तेव्हां त्यास आनंद होऊन मारेकऱ्यांस धन देऊन संतुष्ट केलें. पुढें कुलिंद येऊन चंद्रहासास घेऊन जाईल.

# अध्याय ५२ वा.

## चंद्रहासआख्यान.

नारद ह्मणाला–पार्था ! चंद्रहासाची कथा एकाग्र चित्तानें ऐक. त्या बाळानें तुझ्या मित्राचें चिंतन केल्यामुळें चांडाळास

सदय करून वध करविला नाहीं. बाळ, वृद्ध, तरुण, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र जे मनांत वासुदेवाचें स्मरण करतील त्यांचें नारायण रक्षण करितो. त्या पांच वर्षांच्या बाळानें स्मरण करितांच त्याची आलेली मरणवेळा चुकली. अशी भक्तस्तुति ऐकतांच रमापतीच्या आंगावर रोमांच उभे राहून नेत्रांतून प्रेमाश्रु आले, ते पीतांबरानें पुसिले.

त्या मुलाची अंगुळी छेदतांच ती मधून रक्त वाहूं लागलें. तेव्हां तो रुदन करीत ह्मणाला–हे भक्तवत्सल नारायणा! तुझ्या चिंतनानें सर्व दुःखें निरसन होतात; मग मजवर निष्ठुर कां झालास? असे बाळशब्द ऐकतांच वनांतील हरिणी धांवत येऊन अंगुळीचें रक्त चाटूं लागल्या. त्या बाळकाच्या दुःखेंकरून सर्व प्राणी तटस्त होऊन शोक करूं लागले. त्यावेळीं कुलिंद नांवाचा राजा शिकारीकारितां त्या वनांत आला होता. त्यानें बाळकास पाहतांच अश्वावरून खालीं उतरून जवळ येऊन त्याचे नेत्र व अंगुळीचें रक्त पुसिलें. तो राजा निपुत्रिक असल्यामुळें हा देवानें आपणास बाळ दिला असें समजला. मग त्याला आईबाप विचारता, चक्रपाणी ह्मणून सांगितलें. नंतर त्यास बरोबर घेऊन नगरास आला आणि मनांत ह्मणाला—दैवयोगानें हा बालक मिळाला आहे; याचें पालन केलें असतां, माझेवर देव प्रसन्न होऊन, त्याच्या पुण्यानें पूर्वज सद्गतीस जातील. दत्तक, कृत्रिम, विक्रित, सहोदर, मुलीचा मुलगा, पति असतां जारापासून झालेला, पति मेल्यावर झालेला, स्वतः प्राप्त झाला

क्षेत्रज व पौरुषज असे दहा प्रकारचे पुत्र धर्मशास्त्रांत सांगितले आहेत. त्यांतील वीर्याचा श्रेष्ठ ह्मणतात. तो नसल्यास त्याच्या ऐवजीं हे नव पुत्र मानितात.

मग त्या स्वयंपुत्रास घेऊन चंदनावतींत जाऊन अंतर गृहांत प्रवेशून मेधावती राणीजवळ देऊन सर्व वृत्त कथन केलें. तिला त्या हरिभक्ताचा स्पर्श होतांच पान्हा फुटला पुत्रास पाहून ती सुखी झाली. नंतर राजानें ब्राह्मणांस बोलावून नामकर्मविधि आरंभून त्यांस दानें देऊन संतुष्ट केलें. त्याचें चंद्रहास असें नांव ठेविलें आणि वस्त्राभरणीं मंडित केला. देशांतील दुर्भिक्ष नाहींसें होऊन प्रजेस सौख्य झालें. मुलगा सात वर्षांचा होतांच त्यास विद्यारंभ करविला. गुरुजी जें जें सांगत तें तें न शिकतां फक्त हरि हीं दोन अक्षरें हृदयीं धरिलीं. तो गुरुजीस ह्मणाला—इतर खटपटींत जीव कशास घालावा? हरी या दोन अक्षरांशिवाय दुसरें अक्षर माझ्या मुखांतून निघेल तर मजकडून अन्याय होईल मी स्वामीचा चाकर आहें. असें त्याचें वचन ऐकतांच गुरुजी छडी घेऊन मारूं लागला. तेव्हां चंद्रहास कांपत ह्मणाला— मला अन्य शास्त्रांचें कारण नाहीं. जेथें हरी स्मरण नाहीं तें कुशास्त्र जाणावें.

असें त्याचें वचन ऐकतांच गुरु कोपून त्याला बापाजवळ घेऊन गेला. आणि ह्मणाला— राजा! तुझा हा पुत्र सुंदर आहे, पण याला भुतसंचार झाला आहे, हा भ्रमिष्टासारखा वागतो, सांगितलेलें न ऐकतां फक्त हरिशिवाय मला दुसरें

कांहीं नको असें सांगतो. राजा ह्मणाला–दैवयोगानें पुत्र लाधला आहे, त्यास ताडण करूं नको. मग मूर्ख होवो किंवा पिशाच्च होवो. मला तर पालन केलेंच पाहिजे. याचें चरित्र पाहून समाधान वाटतें हा एकादशीस अन्न घेत नाहीं आणि याच्याशिवाय मी भोजन करित नाहीं. तरी आतां आमचे घरीं येऊन हा वर्तेल त्याप्रमाणें शिकवित जा. नंतर गुरुजी निघून गेला. आठ वर्षांचा होतांच राजानें मुंज केली. अपार धन याचकांस वाटलें मग वेदाध्ययन शिकवितांच, तो वेदाभ्यास चांगला शिकला. धनुर्वेद पढविला अशाप्रकारें तो हरिस्मरणानें चौदा विद्या, चौसष्ट कला, शस्त्रास्त्रविद्या यांत निपुण झाला व तरुणावस्थेंत आला.

# अध्याय ५३ वा.

## चंद्रहास आख्यान.

पार्थ ह्मणाला–नारदमुने ! ज्यानें हृदयीं गोविंद धरून धनुर्वेदाचा अभ्यास केला, त्याचे चरण कधीं पाहीन असें झालें आहे. अनंत जन्मींचें पुण्य गांठीं असेल तरच हरिभक्ताचें दर्शन घडेल, हरिभक्त ध्रुवबाळास आकाशांत अढळ स्थापिला, बळी पाताळांत व आमचा पितामह स्वर्गांत गेला रामभक्त बिभीषण लंकेंत आहे व तूं कृष्णभक्त सर्वत्र गमन करित आहेस. जो सर्वव्यापक श्रीहरी सर्वांच्या अंतरांत आहे, त्याच्या भक्ताचा संग कोणत्या प्रयत्नानें होईल ?

नारद म्हणाला–पुढें चंद्रहासकथा सांगतों ऐक. चंद्रहास

पंधरा वर्षांचा होतांच बापाजवळ भूपाळास जिंकण्याची आज्ञा मागूं लागला. बाप ह्मणाला —जेकळिकाळास जिंकणारे, अशा राजांस तूं एकाएकीं कसा जिंकशील ? तूं वासुदेवाच्या प्रतापानें जिंकशील तरी सांगतों ऐक. कुंतलेश्वराचा दुष्टबुद्धि नांवाचा प्रधान, त्यानें माझें सर्व राज्य जिंकून फक्त मला शंभर गांव ठेविले आहेत. असे जे बलिष्ट राजे त्यांनीं मला पीडिलें. पण सुपुत्रा ! तुझी कीर्ति ऐकून ते शांत झाले. असें वचन ऐकून चंद्रहास दिग्विजयास निघाला. त्याची कीर्ति श्रवण करितांच सर्व राजे करभार घेऊन शरण येऊं लागले. चंद्रहास त्यांस ह्मणाला- तुह्मी मानू नका, रामनाम विसरूं नका व क्षत्रियधर्म टाकूं नका. असे सर्व राजे जिंकून शंभर अक्षौहिणी सैन्य, सुवर्णमुक्तांचे अनंत गाडे बरोबर घेऊन विजयी होऊन आला. त्याला बाप सामोरा गेला. मेधावती मातेनें पंचारती ओंवाळून लिंबलोण केलें. नंतर जनक—जननीस पालखींत बसवून, पित्याच्या पादुका हातांत घेऊन चंदनावतींत प्रवेश केला. तो मातापितरांस ह्मणाला— लक्ष्मीनारायणासारखीं तुह्मीं आहांत, तुमच्याच प्रसादानें मला जय प्राप्त झाला. पितृभक्तीसारखें व्रत त्रिभुवनांत नाहीं. पितृभक्तीनें विष्णू विटेवर उभे राहिले. नगरांत प्रवेश करतांना स्त्रियाही विनोद करूं लागल्या. अशा प्रकारें तो सर्वांस आवडतां झाला.

नंतर सुदिन पाहून राजानें चंद्रहासास राज्याभिषेक केला. सर्वांस दानें दिलीं. नगरजनानीं चंद्रहासाचें पूजन

करितांच, राजानें त्यांस वस्त्रालंकार दिले. चंद्रहासानें सर्वांस सांगितलें, तुह्मीं एकादशी व्रत करा. जो न करील, तो माझा वैरी समजून त्याला अन्य ग्रामांत घालीन. हा अस्तिरक्तमांसाचा देह जन्ममरणांत गुंतलेला आहे त्याचें सार्थक करा. असा त्याचा उपदेश ऐकून सर्व जनांनीं हृषिकेश भजनाचा उल्हास धरिला. दीन अनाथ ब्राह्मण यांस सुवर्ण रत्नें मोत्यें अर्पण करून घरें, मठ धर्मशाळा वगैरे बांधून दिल्या. विप्र, क्षत्रिय, वैश्य, शूद्रादिक जाती स्त्रीपुत्रांसह घरें बांधून चंदनावतींत राहिलीं.

पुढें पिता चंद्रहासास ह्मणाला–कुंतलेश्वरास मी प्रतिवर्षी एक लक्ष सुवर्णमुद्रा करभार देत असतों व त्याच्या दुष्टबुद्धि प्रधानासहीं द्रव्य देतों. त्याच्या निम्मे त्याच्या पत्नीस द्यावें लागतें. तरी तें कुंतलपुरास पाठवावें. येथून साठ योजनें कुंतलपूर आहे. तेथें गालव पुरोहित व दुष्टबुद्धि प्रधानासह राजा राज्य करितो. तें द्रव्य गालव स्वीकारतो. मग चंद्रहासानें हत्ती, घोडे, उंट, खेंचरें, गाड्या द्रव्यानें भरून सेवकाबरोबर पाठविलें. ते नामस्मरण करीत चालले असतां, रस्त्यांत नदी लागली तेथें स्नान करून पुढें चालले, त्या दिवशीं एकादशी होती. त्या तुळसीमाळामंडित भक्तांनें नेलेलें द्रव्य प्रधानाचे घरीं नेतांच तो ह्मणाला–तुह्मी कुलिदाचें मरण इच्छितां, ह्मणून अमंगळरूपानें येथें आलेत. सेवक बोलले–त्यांच्या शत्रूला मरण असो. राजाचें कल्याण मुनिजन इच्छितात त्याच्या चंद्रहास पुत्रानें हें अपार धन पाठ

विलें आहे. प्रधान सेवकांस ह्मणाला-यांस भोजन घालावें. पण ते अन्न घेईनात. तेव्हां प्रधान निष्ठुर वाणीनें बोलला-तुह्मांस दुष्ट छंद लागून परान्न सेवीत नाहीं तरी कुलिंदास शृंखलाबंधन करून त्याचें धन हरण करितों. सेवक ह्मणाले-आह्मीं एकादशीचे दिवशीं अन्न घेत नाहीं. तें ऐकून प्रधान ह्मणाला-कोठचें एकादशी व्रत आह्मांस स्वप्नांतही माहित नाहीं. तुमच्या तुळसीपुष्पांचा मी निःपातच करितों.

तें व्रत राजास कळवून त्याची आज्ञा घेऊन प्रधान चंद्र-नावतीस जाण्यास निघाला. तेव्हां त्याची कन्या विषया बापास ह्मणाली-राजकार्यांत चित्त मदोदित व्यग्र असतें आणि परदेशीं जाण्याचें अकस्मात् कां केलेंत! तें तिचें वचन जाणून प्रधान सेवकांसह निघून दोन दिवसांनीं चंद्र-नावतीस आला. त्याला कुंलिंद राजा पुत्रासह सामोरा गेला प्रधान राजास ह्मणाला-तुह्मांस पुत्र कधीं झाला. तें आह्मांस कळविलें नाहीं. राजानें सांगितलें हा आमच्यापासून झालेला नव्हे, मी शिकारीस गेलों असतां, त्याच्या पायाचें सहावें बोट छेद त्यामुळं दुःखी होऊन वनांत पडला होता, तो मला पांच वर्षांचा सांपडला. हा माझा हरिभक्त पुत्र आहे.

असें प्रधानानें ऐकतांच त्याला भीति प्राप्त झाली. त्यानें जाणलें कीं, चांडाळांहातीं मारण्यास पुत्र दिला होता, तोच हा असावा त्या चांडाळांनीं कपट करून त्यास जीवंत सोडलें तरी याला आतां कसा मारावा ! हा माझ्या संपत्तीचें रक्षण करील. असें ब्राह्मणाचें वचन आहे. तरी माझें मदन न

अनीळ पुत्र, हा संपत्तीचा मालक झाल्यावर काय करतील ? असें मनांत आणून ब्राह्मणाचें वचन खोटें करण्याचा त्यानें निश्चय केला. पुढें चंद्रहास विषयंस वरील.

---

# अध्याय ५४ वा.

## चंद्रहासाचें कुंतलपुरीं गमन.

नंतर दुष्टबुद्धि चिंतातुर होऊन चंद्रहासास मारण्यास काय उपाय करावा ह्मणून विचार करूं लागला. जर येथेंच करावा तर मलाही मरण येईल. असें मनांत आणून विष देऊन मारावा असा निश्चय करून चंद्रहासास बोलावून ह्मणाला- तूं माझें गुप्त कार्य केलें पाहिजे. चंद्रहासानें तें मान्य केलें मग स्वपुत्र मदनास पत्र लिहिलें कीं, पत्र घेऊन पाठविलेला चंद्रहास माझा शत्रु, माझ्या संपत्तीचा मालक होणार आहे. यास्तव त्याचें रूप वित्त कुल पराक्रम याचा विचार करून काळवेळ न पाहतां विष द्यावें. राजास व आप्तजनांस कळूं देऊं नये असें पत्र लिहून सील करून तें चंद्रहासाचे हातीं देऊन सांगितलें-तूं कुंतलपुरांत जाऊन हें पत्र मदनाच्या हातांत एकांतीं दे. चौघां सेवकांसह अश्वारूढ होऊन त्वरित जा नंतर चंद्रहास, प्रधानास व आईबापास वंदन करून, हरिद्राकुंकुमांकित वस्त्रालंकार परिधान करून चौघां सेवकांसह निघाला. समोर गाय वितांना दृष्टीस पडली, तिला चंद्रहासानें वंदन केलें. तो कुंतलपुरांत क्रीडावनांत येताच

तें नंदनवनासारखें दिसलें. तेथील पशु, पक्षी, वृक्षलतादि पाहून त्याला समाधान वाटलें. तेथेंच स्नान करून हरिपूजा केली आणि फळें भक्षण करून दोन प्रहरीं झोपीं गेला.

त्या क्रीडावनांत कुंतलेशाची कन्या चंपकमालिनी व प्रधानकन्या विषया शंभर दासींसह फुलांकरितां आल्या होत्या त्यांचें वय सोळा वर्षांचें होतें. त्यांना तेथें अनेक प्रकारचे विनोद झाल्यावर पुष्पांची शय्या करून तीवर विषया पडली असतां मालिनी बोलूं लागली हे चंपकांगि! पुष्पशय्येवर निजूं नको, लौकर ऊठ; येथें भोगी पुरुष तुला पाहील, हा वदन चंद्रासारखा असून तुझ्या उरोभागीं स्वयंलिंग उगवलें आहे, त्यांचा पूजक येथें येऊन स्थापना करील, तुझा डावा डोळा लवतो व कावळा मधुर स्वर करीत आहे, त्यावरून द्वय लिंगांचा पूजक प्राप्त होईल असें वाटतें असें चंपकमालिनीचें वचन ऐकून विषया हांसूं लागली.

नंतर सर्वजणी जलक्रीडा करावयास निघाल्या, मार्गांत दासांनीं राजकन्येस व विषयेस पुष्पहार व फुलें अर्पण केलीं. सरोवराच्या पाळीवर येतांच सर्वांनीं वस्त्रें ठेवून सर्वजणींनी जळांत क्रीडा केल्यावर वस्त्रें परिधान करून अंगास सुगंध लावून सर्व शृंगारानें नटल्या, तोंच सरोवराचे तीरावर चोळ्यास राजपुत्र दृष्टीस पडला. त्याचें वय सोळा वर्षांचें होतें, त्याला पाहतांच विषयेचें मन लुब्ध झालें. आतां सर्वजणींची दृष्टी त्यावर गेली हा राजपुत्र कोणी असावा असें वाटलें.

# अध्याय ५९ वा.

## चंद्रहास आख्यान.

नारद ह्मणाला-अर्जुना ! चंपकमालिनी आदि करून स्त्रिया जलक्रीडा करून घरीं जाण्यास निघाल्या; परंतु विषया चंद्रहासाच्या मोहांत गुंतल्यामुळें मागें राहून विचार करूं लागली कीं, असा सुंदर पुरुष टाकून जाऊं कीं नको जाऊं! याचें दर्शन न घडेल तर जन्म व्यर्थ होय. मग तिनें नुपुरांच्या आवाजानें राजपुत्र उठेल. असें जाणून ती पायांतून काढून पुरंध्री सखीजवळ दिली आणि मंद मंद पावलांनीं राजपुत्राजवळ जाऊं लागली तोंच अश्व दूर्वांकुर खात असतां दृष्टीस पडला; त्याला नमस्कार करून खिंकाळूं नये ह्मणून प्रार्थना केली व राजपुत्राजवळ आली त्याचें लावण्यरूप पाहतांच मदन पीडा देऊं लागला. ती मनांत ह्मणाली-येथें शयन करूं काय ? यांस झालेले श्रम चरण चुरून घालवूं काय ? असा विचार करीत मुखाकडे पाहात आहे तोंच वस्त्रपल्लवाला बांधलेलें पत्र दृष्टीस पडलें. तें सोडून बापाचें हस्ताक्षर ओळखून फोडून पाहिलें. त्यांत लिहिलें होतें कीं-हा पत्र घेऊन पाठविलेला चंद्रहास माझा शत्रू आहे, हा माझे संपत्तीचा मालक होईल. रूप, वित्त, कुळ विद्या, पराक्रम यांचा विचार न करितां यास शीघ्र विष दीजे. हें कोणास कळूं देऊं नको. काळवेळ न पाहतां निजकार्यावर दृष्टि देऊन, राजास व आप्तजनांस न कळतां या

कार्यांचें साधन कर. असें पत्र वाचून ती समाधान पावून विचार करितां तिला सुचलें कीं; मला योग्य पति मिळाला ह्मणून बाबास हर्ष झाला, त्या हर्षांत मति चांचरून एक अक्षर चुकला. जर लिहिणारापासून चुकी झाली तर वाचणारा विवेकी पाहिजे. यास्तव बापाची चुकी मी सुधारतें. हें असेंच पत्र जर मदनानें वाचलें तर याला विष देऊन मारील, त्यामुळें मलाही मरण येईल. असें मनांत आणून तिनें नेत्रांतील काजळ काढून विष शब्दाच्या पुढें 'या' घालून तें पत्र होतें तसें बंद करून त्याच्या पदरास बांधून तेथून सख्यांस गांठण्यास आली. तिला पाहतांच सख्यांनीं विनोद केला. नगरांत येतांच वधुवरें सामोरीं आलीं. तिला पाहतांच सख्या विषयेस ह्मणाल्या-तूंही अशीच मिरवत जाशील. मग सर्व घरोघर गेल्या. विषयेस चंद्रहासाचें ध्यान लागून मदन पीडा देऊं लागला.

इकडे चंद्रहास झोपेंतून उठून, मुख धुऊन, तिलक रेखिला व तांबूल भक्षण करून सेवकांसह नगरांत गेला. तेथील अवर्णनीय शोभा पाहतांच त्यास आनंद झाला. प्रधानाच्या द्वाराजवळ येतांच घोड्यावरून खालीं उतरून द्वारपाळास वर्दी देण्यास सांगितलें. सात दरवाज्यांवर सात द्वारपाळ होते. सातवा द्वारपाळ मदनास ह्मणाला-तुमच्या जनकानें दिलेलें पत्र घेऊन हरिभक्त चंद्रहास राजपुत्र आला आहे. तें ऐकून मदन सर्वांसह सामोरा जाऊन त्यास सभेंत घेऊन आला आणि श्रेष्ठ आसनावर बसवून पूजन केलें. एकमेकांचे कुशल प्रश्न

आल्यावर चंद्रहासानें पत्र देऊन ह्मटलें-हें पत्र एकांतीं वाचून गूढ कार्य त्वरित करावें. अशी पितृआज्ञा आहे. असें ऐकून मदन ह्मणाला- आपलें मन शुद्ध असून जेथें भगवद्भक्त असतात, तोच एकांत जाणावा, तूं कृष्णभक्त पितृसेवक श्रेष्ठ पराक्रमी असा हरिभक्त असून तुला चोरून पत्र वाचीन तर मी महामूर्ख होय माझे सभाजनही पवित्र आहेत, असें बोलून पत्र वाचूं लागला.

"मदना ! तुला स्वस्ति असो. रूप, विद्या, कुळ यांचा विचार न करितां विषया चंद्रहासास द्यावी, राजास कळवूं नये, वेळ लावूं नये." सभाजन ह्मणूं लागले—कुल शील, पाहूं नये असें लिहिलें आहे तरी तें प्रधानांनीं पाहिलें असेल, राजास कळवूं नये लिहिलें तरी त्यांची चंपकमालिनी कन्या कुमारी आहे, ती वराप घेऊन जाईल. असें पत्र वाचतांच सर्वांस मानवलें मदनास हर्ष झाला. सारांश, कर्माचें विंदान कसें आहे पहा ! मातीचें सोनें झालें ! !

इकडे विषया अन्नोदकरहित व कामपीडित होत्साती चंद्रहासाचा ध्यास करीत शिवपार्वतीस ह्मणाली—माझा हेतु पुरल्यानें भाद्रपद शुद्ध तृतीयेस हरितालिकेचें व्रत करीन. इतक्यांत सखी धांवत धांवत येऊन सांगूं लागली, चंपकमालिनी तुला बोलली, तोच कुलिंदनंदन तुला वर मिळेल. तें ऐकतांच विषयेस संतोष वाटला. पुढें दोघांचें पाणीग्रहण होईल.

---

# अध्याय ५६ वा.

## चंद्रहासाचा लग्नोत्सव.

इतकी कथा ऐकून अर्जुन संतोष पावून पुनः नारदास कृष्णभक्तचरित्र विचारूं लागला तेव्हां नारद सांगूं लागला— बापाचें पत्र मदनानें वाचून ब्राह्मण बोलावून त्यांस लग्न मुहूर्त विचारला. ब्राह्मणांनीं सांगितलें—वधुवरांचे स्थानीं तिसरा व अकरावा गुरु शुक्र शुभ असून आजच गोरज मुहूर्त आहे. गाई वांसराकरितां मुखें पुच्छें वर करून गोपाळांसह ज्या समयीं गोठणीवर येतात तीच वेळ आहे; असें ऐकतांच मदनास हर्ष होऊन, सुवासिनी स्त्रियांस विषयेस व चंद्रहासास मंगल स्नानें घालण्यास आज्ञा दिली. त्यांनीं लग्नविधीप्रमाणें सर्व कार्य आटोपतांच सुमुहूर्तावर अंतरपाट धरून ओमपुण्याहं ह्मणून उभयतांचें लग्न लाविलें. मदनानें कन्यादान करून ' लक्ष्मीनारायण संतुष्ट असो ' असें बोलून उदक सोडलें. पाणिग्रहण केल्यावर अग्नि कुंकुम हरिद्रालेपन केल्यावर वधुवरें बोहल्यावर बसवून अग्नीची शांतता केली.

नंतर मदनानें अपार दानें वांटून सर्वांस संतुष्ट करून चंद्रहासाची प्रार्थना केली कीं, हें शिरकमळ पंचप्राण पुढें मी अर्पण करीन. हें राज्य पुत्रपौत्रादिक नांदावयास घ्यावें. मग मदनानें ब्राह्मणांची पूजा करून वस्त्रालंकार अन्नदान अर्पण केल्यावर विषयेसह चंद्रहासास घेऊन भोजन केलें आणि

तांबूलादिक देऊन सर्व झोंपी गेलीं. प्रातःकाळीं उठल्यावर चित्रमंडप शृंगारून नाच, गायनादिक उत्सव केला. पतिव्रता स्त्रियांनीं नीरांजनें ओंवाळलीं. मंडपांतील वेदवेत्त्या ब्राह्मणांस गजाश्व, वस्त्रालंकाराचीं दानें दिलीं. नागरिक जनांस संतोषित केलें. असा तो विष्णुभक्त चंद्रहास प्रधानाचा जांवई झाला पहा, हरीची अघटित सत्ता आहे, 'याला विष देऊन मारावें, असें प्रधानानें लिहिलेलें असतां, तें नारायणानें असत्य करून लग्न करविलें, अशा प्रकारें चंद्रहास विषयेचा लग्नोत्सव झाला. पुढें प्रधान चंदनावतीस कुलिंदप्रजेस पीडा करील.

# अध्याय ९७ वा.

## चंद्रहास विषयेचें लग्न.

नारद सांगतात—पार्था! आतां चंदनावतीस झालेली हकीगत सांगतो ऐक. चंद्रहास कुंतलपुरास गेला असें दुष्टबुद्धीनें जाणून कुलिंद राजास धरून बेड्या घातल्या व प्रजेस पीडा करूं लागला. कुलिंदास म्हणाला—तूं अभिमान धरून मला सेवकाबरोबर धन कां पाठविलेंस? या नगरांत शिवालयें, मठ, धर्मशाळा, कूप वगैरे पूर्वीं नव्हते ते काय म्हणून बांधलेंस! ते कामदार कोठें गेले? अशी कुलिंदाची निर्भर्त्सना करून बंधन केलें आणि लोभी सेवकास बोलावून म्हटलें—तूं तृष्णा वधु बरोबर घेऊन या चंदनावतीचें रक्षण कर. असें सांगून नगरास चालला. त्या नगरांतील सर्व ब्राह्मण स्त्रीपुत्रांसह पळून गेले. दुष्टबुद्धी मनांत म्हणाला—मदनानें चंद्रहासास

विष देऊन मारलें असेल. आतां आपण मदनभेटीस लौकर जावें असा विचार करून पालखींत बसून वाहकांस ताडण करीत निघाला, तों मार्गांत एक भुजंग फणा पसरून प्रधानास मनुष्यवाणींत म्हणाला—तुझें जें सुवर्णघट वित्त मी राखीत होतो तें मदनानें सर्व वेंचून टाकलें ' असें सांगून तो भुजंग पाताळांत गेला. तें गूढ अर्थाचें बोलणें ऐकून प्रधान मनांत खोचला. नंतर तो एका प्रहरांत कुंतलपुरांत येतांच तेथील उत्सव पाहून मनांत समजला कीं, मदनानें चंद्रहासास मारल्यावर हा आनंदप्रदर्शक उत्सव केला असेल.

नंतर तो पालखींतून उतरून धांवत निघाला. तों बंदीजन ह्मणाले—धन्य तुझ्या उदरींचें रत्न मदन ! त्यानें भागिनीचा विवाह करून आह्मांस संतोषित केलें, असें ऐकतांच संतप्त होऊन ह्मणाला—जर कोणी चंद्रहासाचें नांव घेईल त्याचें शिर छेदीन, पुढें चालला तों वस्त्रालंकारांनीं गौरविलेले ब्राह्मण भेटले. त्यांस रथ, अश्व, गोदानें दिलेलीं पाहतांच विचारूं लागला कीं, तुमचें मदनानें कोणत्या निमित्तानें पूजन केलें ? ब्राह्मण ह्मणाले—तुझें कल्याण असो. चंद्रहासासारखा जांवई तुला पूर्वभाग्यानें मिळाला. असें ऐकतांच जशी प्रल्हादमुखाची नामवाणी ऐकून हिरण्यकश्यपूचा क्रोधाग्नी खवळला, तसा प्रधान खवळून ब्राह्मणांस मारावयास दंड घेऊन मागें लागला. त्याबरोबर ब्राह्मण वस्त्रालंकार धन टाकून धांपा टाकित पळत सुटले. त्यांचें श्वासोश्वास बंद होऊन मूर्छित पडले. पुढें गायक

भेटले, त्यांच्याही टाळ मृदंग विण्याचें चूर्ण केलें. नंतर सुवासिनी स्त्रिया आरत्या ओंवाळावयास आल्या. त्यांस पुत्रानें उत्सव कशाचा केला ह्मणून विचारलें. त्यांनीं सांगितलें- मदनानें चंद्रहास जांवई जोडून वडिलांस पावन केलें त्यांचाही धिःकार करून, तो पुढें निघाला. तों वधुवरें दृष्टीस पडलीं. त्यांस पाहतांच सर्वांगास क्रोधाग्नि पेटला त्या वेळीं चंद्रहासानें पत्नीसह सासऱ्यास नमस्कार घातला, पण त्याला संतोष वाटला नाहीं. इतक्यांत मदनानें येऊन पितृचरणांस वंदन केलें. त्यास प्रधान ह्मणाला-हे दुरात्म्या ! हें काय केलेंस ? पुत्र ह्मणाला-आपल्या पत्राप्रमाणें भगिनी चंद्रहासास देऊन अपार दानें दिलीं व आपल्या नांवाप्रमाणें कीर्ति केली, मग राग कां करितां ?

असें पुत्राचें वचन ऐकतांच, प्रधान कपाळावर हात मारून घेऊन ह्मणाला--अरे ! तूं माझ्या पोटीं कीटक जन्मलास ! आतां वनांत जा अथवा भिक्षा माग. मदन ह्मणाला-त्यांत आश्चर्य तें काय ! जसा पितृवाक्यें करून श्रीराम वनवासास गेला, त्याची कीर्ति अद्याप गाजत आहे तसा मी वनांत जाईन. माझा अन्याय काय झाला ? लग्नांत मी कांहीं कमतरता केली ह्मणून तुह्मांस कोप आला असेल, तर आणखीं धनवस्त्रें देतों. पत्नीसह कुलिंदास मात्र बोलाविला नाहीं. हा माझा अन्याय खरा; तरी आतांच चंदनावतीस जाऊन त्याची प्रार्थना करून आणितों आपण ' काळवेळ लावूं नको, असें पत्र लिहिलेंत, व लग्नघडीही

जवळ मिळतांच, यथाशक्ति धनधान्य देऊन पत्राप्रमाणें लग्न केलें. तें ऐकून प्रधानानें क्रोधानें पत्र मागितलें. तें वाचून पाहतांच ह्मणाला-ब्रह्मलिखित घडलें व माझें दैव फिरलें ह्मणून विपरित झालें. मग क्रोध शांत करून पुत्राचा गौरव करून चार दिवसांनीं विवाहकृत्य आटपलें. श्रीनारायणाचे कृपेनें लग्न सिद्धीस गेलें. प्रधानाशिवाय सर्व जनांस आनंद झाला. पुढें चंद्रहासास मारण्याचे उपाय दुष्टबुद्धि करील.

---

# अध्याय ५८ वा.

## चंद्रहासाचें लग्न, राज्यप्राप्ति व मदनाचा वध.

नारद पार्थास ह्मणाला-तो दुष्टबुद्धि मनांत चिंताक्रांत होत्साता विचार करूं लागला कीं, मी 'शत्रूला विष द्यावें' असें लिहिलें असतां, अर्थाचा अनर्थ झाला. दैवानें उलट घडलें आणि शत्रू जांवई झाला ! आतां यास मारण्याचा काय उपाय करावा ? विषया विधवा झाली तरी हरकत नाहीं , पण मुनिवाक्य खोटें करीन; असा निश्चय करून चांडाळास बोलावून ह्मणाला-तुह्मीं नगराबाहेर चंडिकेच्या देवळांत जाऊन लपून बसा. तेथें संध्याकाळीं पूजेकरितां जो पुरुष येईल त्याचा शिरच्छेद करा. पूर्वी जसें मला ठकविलेंत तसें करूं नका हें काम केल्यास मदनपुत्राची आण वाहून सांगतों कीं, अर्धें वैभव तुह्मांस देईन. तें ऐकून चांडाळ देवळांत जाऊन बसले.

इकडे चंद्रहासास प्रधान ह्मणाला–आमच्या कुळधर्माप्रमाणें चंडिकेस जाऊन पूजा नमस्कार केला पाहिजे, यास्तव तूं एकटाच देवळांत जाऊन देवीची पूजा कर ह्मणजे पुढें संतान होऊन कुलोत्पत्ति होईल, त्या हि प्रकारें सासऱ्याचें वचन मान्य करून पूजापात्र घेऊन श्रीहरीचें स्मरण करीत देवळांत निघाला. इकडे कुंतलाधिपतीनें गालवमुनीस बोलावून ह्मटलें– मला या भूलोकीं राज्य करतांना सुख वाटत नाहीं. माझा अंतकाळ जवळ आला असें भासतें, तरी अरिष्टनिवारणार्थ उपाय सांगावा. ऋषि ह्मणाला–जें दत्तात्रेयांनीं ऋषीस सांगितलें, तेंच सांगतों; ऐक.

देहास अनेक अरिष्टें आहेत, त्यांतील मुख्य सांगतों- देवमार्ग, ध्रुव, शुक्र, छाया, अरुंधती, चंद्र हे ज्यास दिसत नाहींत त्याचें एक वर्षाचें आयुष्य जाणावें. सूर्य, चंद्र; अग्नि यांचे ज्याला किरण दिसत नाहींत त्याचें अकरा महिन्याचें आयुष्य; वांती, मूत्र, मळ ज्याच्या जागृती स्वप्नांत सुवर्ण रौप्यमय दिसतात तो दहा महिने वांचेल. प्रेतें पिशाचें गंधर्वनगरें हीं नेहमीं समोर व वृक्ष सुवर्णासारखे दिसणें तो नऊ महिनें; कृश स्थूल कृश असा स्वभाव अकस्मात् वाटेल तो आठ महिनें; गिधाड, कावळे, कपोत, सर्प, घुबड यांच्या कपाळास स्पर्श होणें तो सहा महिने वांचेल. धूळीचा वर्षाव किंवा कांकपंक्ति पाठीस लागणें तो पांच महिन्यांनीं मरेल. आकाशांत अभ्र नसतां वीज पाहिल तो तीन महिन्यानंतर मरेल. जो ढगाशिवाय आ-

काशांत वीज दक्षिणेस पाहील तो दोन मासांत; जळांत इंद्रधनुष्य अकस्मात् पाहतो, त्याचें आयुष्य एक महिना उरलें असें जाणावें, तुपांत, तेलांत, पाण्यांत आरशांत मस्तकाशिवाय देह पाहील व अजागंध शवगंधाची दुर्गंधी देहास येईल तर तो पक्षार्ध वांचून मरेल. अस्वलें वानरांसह दक्षिणेस गमन करणें, असें जो स्वप्न पाहील तो तात्काळ मृत्यु पावेल. रक्तांबर धारण केलेली हास्यमुखी नारी हात धरून पुरुषास दक्षिणेकडे नेईल, नग्न वेड्यासारखें हांसून नाना प्रकारचें भाषण करणें, पायांपासून मस्तकापर्यंत पाण्यांत बुडणें, अग्नि केंश विस्तव यांसह शरीर भक्षण करणें, अक्राळ विक्राळ काळे पुरुष शस्त्रांनीं मारताहेत इत्यादि प्रकार जो स्वप्नांत पाहील त्यास तात्काळ मरण येईल.

असा अनेक प्रकारचा अरिष्टाध्याय राजास कथन केला. तो ऐकून राजानें राज्य त्यागाचा निश्चय केला, आणि गालव मुनीस ह्मणाला—आतां मी राज्य न करितां आत्महितार्थ तपास जातों. ऋषीनें सांगितलें—चंद्रहासास आपली कन्या देऊन जांवई कर आणि मग तपाला जा तें वचन मान्य करून, मदनास बोलावून सांगितलें कीं माझी कन्या चंपकमालिनी चंद्रहासास द्यावयाची आहे, तरी तो वर घेऊन ये. असें ऐकतांच मदन त्यास आणावयास निघाला.

इकडे चंद्रहास अस्तमानाचे वेळीं पूजा घेऊन चंडिकेच्या देवळांत निघाला त्यास मदनानें कोठें जातां ह्मणून विचारलें तेव्हां चंद्रहासानें सासऱ्याचें वचन त्यास सांगितलें तें ऐकतांच

मदन ह्मणाला-तुह्मांस कुंतलपतीनें आणावयास पाठविलें आहे तुह्मीं राजाचे दर्शनास जा मी चंडिकापूजनास जातों.

नंतर चंद्रहास घोड्यावर स्वार होऊन सेवकांसह राजभुवनास गेला व मदन चंडिकापूजनास गेला. चंद्रहासानें राजाचें दर्शन घेतल्यावर राजानें आपली चंपकमालिनी कन्या देऊन राज्यदान व चतुरंग सैन्य अर्पण केलें, आणि तपोवनास जाऊन सर्व संग निर्मुक्त होत्सता योगसिद्धि पाहून जेथें जन्म मरण नाहीं अशा मोक्षाचा अधिकारी झाला. गालव मुनीनें चंद्रहासास अभिषेक करून राज्यावर अधिकारी केला.

इकडे मदन पूजा घेऊन निघाला, त्याला मार्गांत अपशकून झाले. मस्तकावर घुबड येऊन बसलें, पूजापात्र खालीं पडलें, नेत्र व तोंड यांतून रक्त वाहूं लागलें, मांजरांचें भांडण पाहिलें, कृष्ण सर्प आडवा आला. असें अपशकून पाहिले तरी चंद्रहासाचें कल्याण चिंतिलें. देवळांत जातांच दरवाजा मस्तकास आपटला, त्या आवाजानें चांडाळ सावध होऊन मदनाचे अंगावर तरवार मारूं लागले. तोंच मदनानें देवीची प्रार्थना केली कीं, हे देवि! मी महिषासुर किंवा शुंभनिशुंभ असुर नव्हे, मी पूजनास आलों असतां माझा घात का करितेस! महिषासुराच्या कंठावर चरण देऊन जसा त्याचा वध केलास तसाच माझाही करून मला मुक्तिसदन दे. दोन बाहू व शिर चंद्रहासास अर्पण करीन. हें माहें वचन सत्य झालें. असें बोलून हरिस्मरण करून देवीपुढें प्राण अर्पण केला. असें पाहतांच चांडाळ भीतीनें पळून गेले. अशी श्रीह-

रीनें अभिनव लीला करून निजभक्त चंद्रहास वांचविला. पुढें चंद्रहास स्वभक्तीनें मदनास उठवील.

# अध्याय ५९ वा.

## चंद्रहासआख्यान–पुत्रासह प्रधानाचें पुनर्जीवन.

नारद पार्थास ह्मणाला–मदन मरण पावल्यावर पुढें काय वर्तमान झालें तें सांगतों. एक चंद्रहासास राज्य मिळाल्यावर चंपकमालिनी स्त्रीसह शुभ्र हत्तीवर बसून, दुष्टबुद्धीस नमस्कार करावयास आला. ती बातमी सेवकांनीं प्रधानास कळवितांच, तो क्रोधाविष्ट होत्साता ह्मणाला—दुसरा राजा ह्मणाल तर तुमचा शिरच्छेद करीन. आमचा राजा कुंतलेश्वर ! त्या शिवाय दुसरा कोण राजा झाला आहे इतक्यांत चंद्रहास चंपकमालिनीसह हत्तीवरून उतरून वंदन करिता झाला. त्यास प्रधान ह्मणाला–चंडीकेचें पूजन करून आलेत ना ? चंद्रहास ह्मणाला—मी पूजा घेऊन जात असतां मार्गांत मदन भेटला. त्यानें मला सांगितलें कीं, राजानें तुह्मांस आतांच भेटीला बोलाविलें आहे. तरी तिकडे जा मी देवीची पूजा घेऊन जातों. त्याप्रमाणें तो तिकडे गेला आणि मी राजदर्शनास जातांच, राजानें मला कन्या देऊन राज्य अर्पण केलें आणि आपण वनास गेला.

असें ऐकतांच दुष्टबुद्धि हाय हाय करीत आक्रोश करित निघाला दुसऱ्यास संकटांत टाकण्याची जो इच्छा करितो तो आ-

पणच दुःखांत पडतो. भस्मासुरशंकरापासून वरमिळवून त्याच्याच मस्तकावर हात ठेवण्यास गेला. शेवटीं आपणच भस्म झाला. तसा तो पापी प्रधान धांवत चालला असतां, प्रचंड वायुनें चित्ताभस्म त्याच्या नेत्रांत गेलें. वेताळादिक भूतगण त्यास पाहतांच ह्मणाले–आमच्या पेक्षां हा पापी कोण येत आहे? त्यांतील एक भूत ह्मणालें—मी उत्तम ब्राह्मणांच्या तीनशें हत्या केल्या, माझ्या भावानें पांचशें वाटसरांचा संहार केला. त्या तुमच्या आमच्या पापापेक्षां या प्रधानाचें दर्शनाचें पाप अधिक होय. भक्तांचा द्वेष व मातुःसंहार करणारा भूतपिशाच्यांत अपवित्र जाणावा. असा तो शोकातुर प्रधान अंधकारांतून चितेंतील जळतीं लांकडें घेऊन चंडिकेच्या देवळांत आला, तों मदनाचें प्रेत दृष्टीस पडलें. तें पाहतांच पुत्राचे गुण आठवून विलाप करूं लागला, तो अवर्णनीय होय. मग देवीस ह्मणाला––मदन तुझा भक्त असतां त्याला उत्तम गति देऊन प्राण घेतलास, तसा मीही प्राण देतों. असें बोलून खांबावर मस्तक आपटून पुत्राजवळ मरून पडला. हें दोघांचें मरण नगरांत कोणास कळलें नाहीं.

प्रातःकाळीं पुजारी देवळांत आले. त्यांनीं दोघांचीं प्रेतं पाहतांच त्यांस आश्चर्य वाटलें. मग ते शोक करीत चंद्रहासाजवळ येऊन म्हणाले–राजा ! मोठा अनर्थ झाला ! प्रधानास पुत्रासह छिन्न भिन्न करून चंडिकेच्या देवळांत टाकिलें आहे. असें ऐकतांच चंद्रहास चिंतातूर होऊन हा अनर्थ कोणी केला ! अशा विचारांत पडला. नगरांत हलकल्लोळ होऊन हा नव्या राजाचा पायगुण असें ह्मणूं लागले.

त्यामुळें चंद्रहास दुःखीत होऊन, एकटाच देवळांत गेला, तों शस्त्रघातानें मरण पावलेले पितापुत्र पाहिले. नंतर चंडिकेस वंदन करून ह्मणाला-या दोघांस कां मारलेस? आतां माझ्या प्राणाची आहुती घे. असे बोलून चतुष्कोनी कुंड तयार करून त्यांत अग्नीची स्थापना केली आणि आपल्या शरीराचें मांस कापून आहुति देऊं लागला. सर्व मांस सरल्यावर अस्थिपंजर राहतांच शिर छेदावयास हातांत शस्त्र घेतलें आणि कंठावर, ठेवणार तोंच देवी प्रगट होऊन हात धरून ह्मणाली-चंद्रहासा! सावध हो, आत्महत्या कां करतोस? हा पापी प्रधान आत्मपापानें मेला व मदनानें बहिणीच्या दानाचे वेळीं बोललेलें वचन पुरें केलें, तरी आतां दोन वर मागून घे. चंद्रहासानें ह्मटलें--देवी! मला जन्मजन्मांतरीं हरीभक्ति दे आणि पुत्रासह प्रधानास जीवंत कर. देवीनें तथास्तु ह्मणून मस्तकावर हात ठेविला व दोघांस जीवंत करून गुप्त झाली. चंद्रहास, प्रधान व मदन यांच्या भेटी झाल्या. चंद्रहास ह्मणाला-अजून तूं कां भ्रमलास! श्रीहरि वांचून कांहीं नाहीं तेथें जन्ममरण कसलें! सर्वभावें श्रीहरीस शरण असावें. ते दोघे जीवंत होतांच जनांस आश्चर्य होऊन कौतुक वाटलें. मग चंद्रहास सासरा व मेहुणा यांसह नगरांत आला.

इतकी कथा ऐकल्यावर अर्जुनानें नारदास विचारलें--चंद्रहासास कुंतलपुरास पाठविल्यावर कुलिंदाची काय हकिगत झाली? नारद ह्मणाला-दुष्टबुद्धीनें कुलिंदास पीडा देतांच

तो अत्यंत खेद पावून हरिस्मरण करित उदास होऊन ह्मणाला- देवा ! तूं मला जो पुत्र दिलास तोही अंतरविलास ! आतां माझें रक्षण कर असें बोलून परिवारासह अग्निप्रवेश करण्याचा निश्चय केला. तो प्रधानदूतानें रक्षकास सांगितला. तेव्हां त्यालाही पश्चाताप होऊन कुलिंदास ह्मणाला—तूं अग्निप्रवेश करूं नको. आपलें राज्य घे, मी दुष्टबुद्धिला जाऊन समजा गों. तें ऐकतांच कुलिंद अग्निप्रवेश न करितां पुत्राच्या समाचाराची चिंता करित राहिला.

इकडे प्रधानाला चंद्रहासानें दिव्यज्ञान सन्मार्ग सांगून सैन्यासह आईबापांच्या भेटीस निघाला पुढें दूत पाठवून कुलिंदास जाणविलें कीं, तुझा पुत्र राजा, प्रधानाचा जांवई होऊन राज्य संपादन करून भेटीस येत आहे. असें ऐकतांच आईबापांस हर्ष होऊन सामोरें जाऊन प्रेमालिंगन दिलें. सर्वांच्या भेटी होऊन आनंदी आनंद झाला. नंतर अपार दानें वाटलीं. चंदनावतीस शंभर गुणांनीं शोभा आली. पुढें तेथें एक सेनापती ठेवून आईबाप व सैन्यासह येऊन कुंतलपुरास राहिला. प्रधानकीचीं वस्त्रें मदनास दिलीं. विषयेस पद्माक्ष व चंपकमालिनीस मकरध्वज असे दोन पुत्र महाभक्त झाले. नारायण भक्त शालिग्रामपूजेनें वाढतात. त्या शालिग्रामाचें माहात्म्य असें आहे कीं, ज्याचेजवळ द्वादश चक्रांसह शालिग्राम असेल त्याचें पुरुषोत्तम महासंकटीं रक्षण करितो पापी लोक तारावयाकरितां नारायणानें शालिग्राम शिला व संन्यासी अशीं दोन रूपें धारण केलीं आहेत. दुस्तर संसार तरण्यास व अनंत पापें जाळण्यास

शालिग्रामाची पूजा करावी. शालिग्राम शिळेजवळ सर्व तीर्थे दैवतें व लक्ष्मीसह श्रीहरि राहतो. अंतकाळीं शाल्ग्रिाम शिळेचें पाणी मुखांत गेल्यास तो पापी असला तरी सद्गतीस जाईल शालिग्राम पूजनानेंच चंद्रहास राज्य पावला; इतकी कथा सांगून नारदानें गमन केलें आणि अर्जुन सैन्यासह कुंतलपुरास गेला. पुढें चंद्रहास श्यामकर्ण धरील.

# अध्याय ६० वा.

## चंद्रहासआख्यान समाप्ति व श्रीकृष्ण भेट.

जैमिनी सांगतात-जन्मेजया! पुढे कुंतलपुरांत श्यामकर्ण येतांच पद्माक्ष व मकरध्वज यानीं अश्व धरून पत्रिका वाचून राजाजवळ आणिला. राजानें पाहतांच ह्मटलें-मी बाळपणापासून ज्याचें चिंतन करितों तो पार्थासह नारायण आज आपणास भेटेल. हे धर्मराजाचे श्यामकर्ण! एक वर्षपर्यंत कृष्ण व अर्जुन रक्षण करित आहेत तरी तुह्मी दोघांनीं अश्वाचें रक्षण करावें. ते मागावयास आले ह्मणजे मी युद्ध करून जनार्दनास संतोषित करीन मग अश्व. अर्पण करूं असें सांगून चंद्रहास सैन्यासह नगराबाहेर आला. त्यास कृष्णार्जुनांनीं पाहतांच संतोष पावले. अर्जुन ह्मणाला- या हरिभक्तांचे दर्शनानें गोत्रवधाचा दोष दूर झाला. अशा हरिभक्ताच्या दर्शनानें कोटिकुलांचा उद्धार व गंगादि तीर्थांचें स्नानपुण्य घडतें, नंतर चंद्रहासास पाहतांच श्रीकृष्ण चतुर्भुज झाला. तोंच चंद्रहास रथाखालीं उडी टाकून श्रीकृष्णास भेटला. कृष्णानें अर्जुनास

संग्रह करितो. नंतर तेरा योजनें पर्वत चढतां चढतां सैन्यास अनिवार दुःख झालें तें वर्णन करणें अशक्य होय. त्या भयंक. अंधारांतून पाणी पाणी करीत व दिवसा दीप लावीत तीन म हिन्यांनीं सर्व सैन्य गंगातीरास येतांच सूर्यदर्शन झालें. त्यावेळ सर्वांस वाटलें कीं, जसें कारागृहांतून सुटावें किंवा यमयात पासून मुक्त व्हावें, तसें भगवंतकृपेनें आज झालें.

नंतर तेथें तंबू देऊन गंगास्नान, नित्यविधि उरकू. सर्वजण कृष्णास वंदन करावयास गेले. तों कृष्ण स्नान संध्या करून दैत्य कसा जिंकावा अशा चिंतेंत पडला होता. त वीरांस ह्मणाला—येथून बारा हजार योजनें मोजकोट पट्ट चौदाशें गांव विस्तीर्ण आहे, तेथें दुंदुभी नामक तीनशें मुखें तीन हजार हातांचा दैत्यराज देवांसहि अजिंक्य असा आहे. कसा जिंकावा अशी चिंता पडली आहे. असें एकतांच रा म्लानवदन होत्साते ह्मणाले—कोटि योजनें विस्तीर्ण वन उदक शिवाय उल्लंघन करितां करितां आमचे प्राण कष्टानें वांच आणि हें दुसरें संकट पुढें आलें. असें बोलून चिंतेंत पडले. तों तेथें नारदमुनींचें आगमन झालें. त्याची कृष्णानें पूजा करू आसनावर बसविलें. नंतर नारदानें नृपांसह चिंतातुर होण्या कारण विचारतांच कृष्णानें मार्गांतील संकटें व पुढें दुंदु दैत्याची भीति यांची साद्यंत हकिगत सांगून, भयाचा परिह विचारला आणि नारदाचे चरण धरले. पुढें नारद सांगेल एकाग्र चित्तानें श्रवण करावें.

# अध्याय ६२ वा.

## दुंदुभीचें जन्मकथन.

नारद सांगतात—हे वैकुंठपिठा ! तूं बाळचेष्टा आरंभून आयुष्य असतां मृत्यूच्या वाटेस कां लागलास ? त्या दुंदुभीला अर्जुनाच्यानें जिंकवणार नाहीं. त्याचें आख्यान सांगतों ऐक—भयंकर उत्तर सागराचे तरंग पाहून सुरनरही कांपतात. तेथें काजळाच्या पर्वतासारखे दोन मगर चोविस हजार वर्षेंपर्यंत भांडत आहेत. बारा योजनें लाटा तुटून भोंवतीं समुद्राचा वेढा आहे. तेथें चौदाशे गांव विस्तीर्ण दुंदुभी नामक दैत्य राज्य करितो. त्याचें अगणित सैन्य आहे. त्याला जिंकण्यास सुरनर कोणी समर्थ नाहीं यानें वाळी रावण यांसही पळवून लाविलें. त्याच्या पुढें या मुंग्याच्या रांगे कां चालविल्यास ! तूं पार्थ पराक्रमी ह्मणत असशील पण त्यास पाहाण्यासही तो समर्थ नाहीं. पार्थासह तो तृणासारखा मानील.

त्याचा पुरुषार्थ ऐकतांच पार्थ नारदास ह्मणाला -माझा प्रताप तूं जाणत नाहींस ! मी मारुतीस जिंकून ध्वजस्तंभावर ठेविला ! इंद्राजवळून ऐरावत आणून आईचें व्रत पुरें केलें ! मजबरोबर लढण्यास वीर जन्मलाच नाहीं हें काय पुरुषोत्तम जाणत नाहीं ? असें ऐकून नारद खदखदां हांसून ह्मणाला—तुझ्या वल्गना स्वप्नांतील मनोरथाप्रमाणें आहेत. मग कृष्णास बोलला—तूं स्त्रीपुत्रांसह द्वारकेंत जा, तुझ्या सोळा हजार स्त्रिया, अष्टनायका, साठ लक्ष पुत्र, कन्या, अशा

कुळाचा संहार कां मांडलास? या अर्जुनाच्या नादीं लागशील तर सर्व नृपांचा अंत करशील दुंदुभीस मारणारा वीर कोणी जन्मलाच नाहीं, यास्तव तूं परत जा.

हें नारदाचें वचन कृष्णास मानवून, पार्थानें प्रद्युम्न, बभ्रुवाहन, अनुशाल्व, यौवनाश्व, वृषकेतु, वीरवर्मा चंद्रहास, हंसध्वज, ताम्रध्वज, नीलध्वज,इत्यादिकांस बोलावून तो ह्मणाला- दुंदुभीदैत्य युद्धास मिळतांच अनर्थ करून मलाही मृत्युपंथ दाखवील. असें ऐकतांच बभ्रुवाहन, ताम्रध्वज, वृषकेतु आपापले पराक्रम सांगूं लागले. तेव्हां नारद ह्मणाला-हें तुमचें भाषण जशी सुवर्णापुढें पितळ त्याप्रमाणें निष्फळ होय. मग कृष्णानें दुंदुभीचें जन्मकथन व मगरांचा वृतांत विचारतांच नारद बोलला—पूर्वीं दैत्यकुळांतील तारकासुर सर्व चराचर व देवांस जिंकून अमरपुरींचें राज्य करित होता. त्याचें मरण शिवपुत्राच्या हातीं होतें. शंकर पार्वतीवियोगानें दुःखित होते. पुढें कांहीं काळानें पार्वतीनें हिमालयाचे पोटीं जन्म घेऊन तपानीं शंकरास वरिलें. दैत्यपीडेनें देव त्रासून त्यांनीं पुत्रोत्पत्ति करून दैत्य मारण्यास शिवाची प्रार्थना केली. अनंत काळपर्यंत पार्वतीस गर्भ धरला नाहीं. मग देवांनीं अग्नीस पाठविला. त्यानें शिवाचे रतिदानाचे वेळीं रेत भक्षण करितांच गर्भ अग्नीस सहन होईना, मग गंगेंत टाकला. तोच षडानन जन्मून त्यानें तारकासुरास मारलें, त्याच्या गजासुर पुत्रानेंही चराचर जिंकलें. त्याला वीरभद्रास घेऊन शिवानें मारला. तेंव्हां त्यानें शिवस्तवन करून वरदान मागितलें कीं, "तीनशें

तोंडांचा व तीन हजार भुजांचा पुत्र द्यावा. त्यात शंभर हत्तींचीं शंभर मनुष्यांचीं व शंभर अश्वांचीं तोंडें असावीं व तो सर्वांस अजिंक्य व्हावा." असा वर मागतांच तथास्तु ह्मणून त्याचा भव केला. तोच हा दुंदुभी दैत्य होय. पार्थ त्याच्या पासंगासही पुरणार नाहीं. असें ऐकतांच सर्व राजे म्लानवदन झाले. पुढें मगरआख्यान सांगितलें आहे.

# अध्याय ६३ वा.

## मगराचें युद्ध व नारदाचा उपदेश.

नारद कृष्णास ह्मणाला–कोणे एके काळीं मी प्रातःकाळीं उठून पूर्वसागरास येऊन स्नानसंध्या सारून तुझा नामोच्चार करून गायत्री मंत्र जपत होतो. इतक्यांत समुद्राचें पाणी खवळून शंभर योजनें लांब, बारा गांव रुंद व बत्तीस योजनें मुख पसरलेलें असा एक मत्स्य बाहेर येऊन मला वंदन करून मी तुमचा शिष्य आहें असें बोलून गायत्री मंत्राचा उपदेश करण्यांस सांगूं लागला. त्यास पाहतांच मला आश्चर्य वाटून मी ह्मटलें–हा नीच योनी मकर आणि गायत्री मंत्र पवित्र ! त्यानें पापसंहार होईल हें त्यास कसें कळलें बरें हा अपवित्र मत्स्य ! यास मंत्ररत्न कसें द्यावें ? न द्यावें तर मला भक्षण करील ! प्राणरक्षणार्थ करूं नये तेंही केल्यास पाप नाहीं. मार्गांतील चोर जर प्राण घेण्यास आला तर असत्य बोलून शरीर रक्षावें. असा नीश्चय करून त्यास जवळ बसवून त्याच्या मस्तकावर हात ठेविला. तेव्हां

मकर हांसून ह्मणाला—तुह्मीं जप करितां तो मी कर्णरंध्रा ठेविला आहे. त्याचा उच्चार करून दाखवितों, त्यांत वर्ण स्वरांचा अभाव असल्यास तेवढाच सांगावा. त्याचा मंत्रो च्चार ऐकतांच. नारदास कंप सुटला. तो ह्मणाला—हें मोठें अकार्य झालें. परंतु या मंत्राच्या रक्षणार्थ उपाय केला पाहिजे. तरी आतां याला चिंतेंत पाडावा ह्मणजे मंत्र विसरेल. मग मत्स्यास ह्मणाला—तुला मंत्रोपदेश करण्यास मी येथें आलों. तूं माझा शिष्य झालास, तरी सांगतो ऐक, तो ह्मणाला—मी तुमचा दास आहे. मला आज्ञा करा.

नारद ह्मणाला—शिष्या ! उत्तर समुद्राचें स्नान मला दहा हजार वर्षें अंतरलें आहे. तेथील वडवानळ नामक मीन मार्ग रोधून तुला मारीन ह्मणतो, तरी स्वबळानें त्याचा गर्व हरण करावा. असें ऐकतांच तो मुनीस वंदून क्रोधानें उत्तर सागरी जात असतां पर्वत आडवा आला. त्याची बारा गांव कडा दाढांनीं कापून पुढें जाऊन गर्जना केली त्याबरोबर वडवानळ मीन उठून उभयतांचें दारुण युद्ध झालें. शंभर गांव पाणी आटून, तीनशें गांव पर्यंत निर्जल प्रदेश झाला. ते चोवीस हजार वर्षे झुंजत होते त्यामुळें गायत्री मंत्राचें विस्मरण झालें. ते दोघे मत्स्य व भोजक्रोट पडून पहावें व सर्व वीरांचा अभिमान झडावा या हेतूनें श्रीकृष्णानें सर्वांस सांगितलें.

नंतर सैन्यास आज्ञा करून अश्व पुढें सोडले. नारद मार्ग दाखवूं लागला. बारा योजनें तुटलेला कडा पाहतांच सर्व

वीर भयाभीत झालें, ध्वजाग्रीं बसलेला मारुतीही मार्ग दिसत नाहीं असें बोलूं लागला तोंच अस्तमान होऊन सैन्याची दाटी झाली. इतक्यांत दैवयोगानें गिरीपाठारावरून सैन्य खालीं उतरलें. तेव्हां कृष्णानें सांगितलें—या ब्रह्मारण्यांत जागलें पाहिजे. नाहींतर निजात्मधन जाईल मग तीन लक्ष अश्वभार दोन लक्ष हत्ती व पांच लक्ष धनुर्धर फिरते ठेविलें बत्तीस हजार गगमोहरी व अन्य वाजंत्राचा गजर होत होता प्रातःकाळ होतांच कृष्णाची आज्ञा घेऊन नारद काशीस्नानास गेला. सर्वांनीं नित्य नेम सारून ध्वजावर मारुती, सारथी कृष्ण व मध्यें अर्जुन बसून पुढें चालले. मारुतीस कृष्ण ह्मणाला—सैन्य सुखानें जाईल असा मार्ग नीट पहा. मारुतीनें ह्मटलें—दिशाभ्रमानें मार्ग दिसत नाहीं. मागें मी सागर उडालों, वनचर मारले, लंका जाळिली, त्यावेळीं श्रीरामसेवेंत कष्ट वाटले नाहींत आतां कष्ट कां होतात कळत नाहींत. रमाकांत ह्मणाला—धीर सोडून पार्थास बुडवितोस ? तुझ्या भरंवशावर या परदेशांत आलों! आतां कूपांत घालून दोर कसा कापतोस निर्वाणींचा तुझा आश्रय ! तूंच भय धरलेंस, मग आह्मीं सर्व मेलों ! श्रीरामास तूंच लंकेत नेलेंस ना ? आतां काय हांसें करून घ्यावें? मरावें किंवा मारावें पण धैर्य सोडूं नये. असें ऐकून मारुतीस हांसें आलें. तो ह्मणाला-भक्तलीलाविग्रही भगवंत तुझा महिमा अगाध होय. असें दोघें बोलत असतां सैन्य काळनदीतिरास आलें. ती सोळा गांव रुंद व कूर्मपाठीपर्यंत खोल भयंकर नदी पाहतांच सैन्य भयचकीत झालें. पुढें नारद येऊन नदी—आख्यान सांगेल व मारुती पुच्छावरून सैन्य उतरील.

# अध्याय ६४ वा.

## काळनदीचें जनन. उल्लंघन व दुंदुभीनगर प्रवेश.

नारद गंगास्नान करून येतांच, कृष्णानें काळनदीचें वृत्त विचारतांच ह्मणाला-यमाची कालिका नांवाची कन्या लावण्यवती होती, ती उपवर होतांच, यमानें पुष्कळ वर आणिले पण तिला एकही पसंत पडेना. शेवटीं बापानें शाप दिला कीं पापिष्टे ! तूं उसरगामिनी घोर नदी होशिल तिनेंही बापास शाप दिला कीः तूंही निर्दय होशील ती ही काळनदी होय. हिला नाव नावाडी असून कधींच उतार होत नाहीं. यास्तव तुह्मीं हा दुराग्रह सोडून द्वारकेस जावें. नाहीं तर मारुतीची प्रार्थना करून परतीरास नेण्यास सांगावें. मग मारुतीस बोलावून कृष्ण ह्मणाला—या काळनदींतून तूं सर्वांस तारता हो. मारुती हांसून बोलला—तुझ्यापुढें काळ मशकाप्रमाणें होय. मग काळनदीच्या जळास लटकाच कां भितोस ? हे लिलालाघवी हृषीकेशा ! तुझ्या कृपाबळानें सैन्य अर्ध क्षणांत परतीरास नेतों.

असें बोलून चोवीस गांव लांब बारा योजनें रुंद पुच्छ लांबवून सेतु रचून सैन्य परतीरास भोजकोट नगरीं गेलें. त्या दुंदुभीच्या नगरांतील चौक्या पाहतांच वीर भयाभीत झाले. सेनापती ध्रुवमंडळ याचे वीर धांवत येऊन त्यांनीं श्यामकर्ण धरून नेले तें बभ्रुवाहन व वृषकेतूनें पाहून युद्धास मिसळले. उभय सैन्याचें युद्ध होऊन दुंदुभी सैन्य मागें हटलें. तोंच

ध्रुवमंडळानें दोघांस मूर्च्छित केलें, त्यामुळें पार्थसैन्य पळूं लागलें. सेनापतीनें वीरांस सांगितलें- हे पांडवांचे श्यामकर्ण नगरांत नेऊन राजास कळवा. मग सेवक अश्व घेऊन गेले.

इकडे घायाळांनीं बभ्रुवाहन व वृषकेतु पडल्याचें पार्थास कळवितांच, मारुती व कृष्ण आतां कसें करावें ? असें परस्पर बोलूं लागले. नंतर परंतप प्रद्युम्न, अनिरुद्ध सैन्यासह निघाले, तों ध्रुवमंडळास पाहिला. इतक्यांत अस्तमान झाला. त्यामुळें सैन्य तेथेंच थांबलें. कृष्ण मारुतीस ह्मणाला-तूं नीट न्याहाळून पाहा. मारुती बोलला—उत्तरेकडे चौदा गांव विस्तीर्ण भोजकोट नगर दिसत आहे. तें विश्वकर्म्याचें तप फळ नगररूपानें गोठवलेलें असून, सुंदर मंडपांत सिंहासनावर तीनशें मस्तकें व तीन हजार भुजा असलेला दुंदुभी वसला होता. त्याच्या सभामंडपाची शोभा वर्णन करण्यास शेषही असमर्थ होय ! त्याच्यासमोर सेवक श्यामकर्ण घेऊन गेले. राजानें हे कोणाचे अश्व असें विचारतांच सेवकांनीं सर्व वर्तमान कथन केलें मग पत्रिका वाचून अभिप्राय जाणून, दैत्यनाथ खदखदां हांसूं लागला, आणि सैन्य किती आहे ह्मणून विचारूं लागला. सेवक ह्मणाले- त्याचें सैन्य मागून अपार येत आहे, पण श्यामकर्ण धरिलें असें पाहतांच दोघ वीर पुढें आले, त्यांस ध्रुवमंडळानें मूर्च्छित केलें आणि अश्व तुह्मांजवळ न्यावयास सांगितलें, ह्मणून घेऊन आलों, असें वचन ऐकून दैत्य हांसला, पुढें दुंदुभी आपल्या मुखानें आपला थोरपणा सांगेल व पांडवांस दूषण देईल.

# अध्याय ६५ वा.

## दुंदुभी आख्यान व दैत्याच्या प्रतापवल्गना.

मग दैत्यनाथ हांसून ह्मणाला—हें कवढें अद्भुत कौतुक ! जसा सूर्यापुढें काजवा आपलें तेज दाखवीन ह्मणतो, त्याच न्यायानें पार्थ मजपुढें येऊन सर्पमुखांत पडला. माझें नांव ऐकून यम थरथरा कांपून इकडे श्रम गोळून गेला. माझ्या प्रतापाच्या ज्वाळेनें कूर्मराज उदकांत दडून बसला तो बाहेर येत नाहीं. सूर्य, नक्षत्रें निस्तेज झालीं; माझ्या कीर्तीनें हें विश्व पांढरें झाल्यामुळें शिव जवळ असून पार्वतीस दिसला नाहीं. अशा प्रकारें माझ्या प्रतापाचा देव, दानव, इंद्र, चंद्र, शेष, अग्नि आदि करून सर्वांस दरारा आहे. माझ्या रथभारानें पृथ्वीचें पिष्ट होतें; माझे शंभर कोटी अश्व, सत्तर कोटी मोठे हत्ती, साठ कोटी रथ असून पायदळाची गणती नाहीं. शिवाय मांडलिकांच्या सैन्याची कोण गणना करील ? असा मी पराक्रमी असून तो हस्तनापूरचा पार्थ माळी माझ्याबरोबर हातोफळी करीन ह्मणतो एवढी त्यास भूल पडली ! ही ईश्वराची माया होय. येथील अठरा कोटी जनबाळकें रस्यानें खेळतात, तीच पार्थसैन्याचें भातुकें करतील. काळयवनापुढें पळ काढणारा त्याचा सारथी गोपाळ, त्यानें जरासंधापुढें मथुरा स्थळ टाकून द्वारका वसविली आणि पानें भक्षक लाल तोंडाचा मर्कट या दोघांच्या जोरावर पार्थ बलाढ्य झाला काय ?

असा पराक्रम सांगून दुंदुभीनें सेवकांस असा हुकुम केला ., श्यामकर्ण अश्वशाळेंत बांधून सैन्याची तयारी करा. आज्ञेप्रमाणें छप्पन्न कोटी रथ, साठ कोटी मत्त हत्ती, शंभर कोटी अश्व सज्ज केले. पायदळांस गणती नाही. एक लक्ष खड्गें ढाली, दोन लक्ष भाते बाण, तीन लक्ष शक्ति, अठरा लक्ष त्रिशूळ चौदा लक्ष गदा, तीन लक्ष वाजंत्रें, एक लक्ष छत्रें तीन लक्ष चवऱ्या, पांच पालख्या वीसहजार वेत्रधारी, एक लक्ष भाट असें दुंदुभीचें सैन्य; शिवाय मांडलिकांचे अशा थाटानें सैन्य निघालें. प्रधानानें दरवाजे उघडण्यास सांगताच, त्या नगराच्या चौदाशे वेशी व एक हजार खिडक्या उघडून सैन्य नगराबाहेर आलें. त्याचें गणित जैमिनी जनमेजयास सांगतात—मुख्य प्रधान तराशें, मांडलिक पांचशें, राजे तिनशें, शंभर कोटी घोडेस्वार, सत्तर कोटी मत्त हत्ती, साठ कोटी रथ, असंख्य पायदळ. छत्र, ध्वज, चामरें, पताका, एक कोटी चाळिस लक्ष पालख्या, एक लक्ष सुखासनें. वाजंत्री भाट साठ लक्ष; अशा सैन्याच्या दणदणाटानें सप्तपाताळें व सप्तसागर उसळले.

दुंदुभी रथावर बसतांच, स्वर्गीं कोलाहल होऊन अष्टदिक्पाळांसह इंद्र सिंहासनावरून खालीं पडला. दैत्य रणांत येतांच अष्टभैरवांनीं पांडवसैन्य पाहून दुंदुभीस ह्मटलें—अशा अल्प सैन्याबरोबर युद्ध करणें लाजिरवाणें होय, यास्तव सेनापतीस हुकूम द्यावा. चंद्रबिंब प्रधान बोलला—समुद्रांत पांडवसैन्य बुडवून टाकावें. दैत्य ह्मणाला—मी समुद्रास शरण

जाऊं ? मग माझें जिणें व्यर्थ होय. श्रेष्ठानें धर्मयुद्धच करावें. कृष्णानें जयंद्रथ, जरासंध, जालंधर. भीष्म, द्रोण, कर्णादि यांस कपटानें मारलें. त्याचें कृत्य निंद्य होय. यास्तव त्याची करणी आपण करूं नये येथें जो कोणी कपट करील त्याचें शिरच छेदीन.

इकडे बारा योजनें पांडवसैन्य हळूहळू चाललें होतें. तेव्हां कृष्ण मारुतीस ह्मणाला—तें नगर दिसत कां नाहीं. मारुती ह्मणाला—तुमच्या चौपट सैन्य पसरलें आहे, त्यामुळें नगर दिसत नाहीं. सैन्य पाहतांच तुमच्या वीरांचे प्राण जातील. चंद्रहास ह्मणाला—या दैत्याबरोबर युद्ध करणारा कोणी वीर दिसत नाहीं, इतक्यांत सैन्य जवळ आल्याचें मारुतीनें सांगतांच सर्व दळभार कंपित झाला. कृष्ण मेघ मंडळ्याच्या पोकळींत यौवनाश्व, वृषकेतु, अनुशाल्व, सात्यकी, बभ्रुवाहन, अनिरुद्ध, वीरवर्मा, प्रद्युम्न, हंसध्वज, कृतवर्मा. नील ध्वज, ताम्रध्वज, चंद्रध्वज, मकरध्वज, पिकध्वज इत्यादिकांस नेऊन ह्मणाला—दैत्य जवळ आला; आतां काय करावें ? अर्जुन ह्मणाला—सख्या ! कां भिववितोस ? तुझ्या प्रतापानें दैत्याचा संहार करूं तूं जर उपेक्षा करशील, तर मात्र मरण येईल. राजे ह्मणाले—धर्मकार्यास प्राण वेंचूं असा पूर्वींच संकल्प केलेला आहे. आतां नगराजवळ जाऊं चला. मग चौदाशें उपवनें ओलांडून रणांत आले. पुढें प्रांजळ शिष्टाई करील.

# अध्याय ६६ वा.

## दुंदुभीआख्यान–युद्धशिष्टाई.

कृष्णार्जुन सर्व वीरांसह युद्धास तयार झाले. दुंदुभी आपल्या रथावर उभा राहून परसैन्य पाहूं लागला; तों अकस्मात् श्रीकृष्णमूर्ति दृष्टीस पडली तेव्हां ह्मणाला– आज पुण्यतरूस फळ आलें किंवा पूर्वपुण्यानें धांवणें केलें ह्मणून कृष्णचरण दृष्टीस पडून जन्मसार्थक झालें! तसाच भक्तचक्रचूडामणि पार्थ व रुद्रमूर्ति हनुमंत पाहून मी मनां- तंत कृतार्थ झालों. असें बोलून प्रधानास पाचारून सांगि- तलें–तूं शिष्टाईस जा आणि कृष्णास सांग कीं, तूं पार्थवचनास कां भुललास? तुझ्या सोळा सहस्र स्त्रिया, कन्या पुत्रादि गोतवळा आहे, यास्तव मला दया आली. तरी तूं परत जा. माझा पुरुषार्थ ऐकतांच कृष्ण पार्थ पळून जातील. मग प्रधान पार्थसैन्यांत येऊन श्रीकृष्णास वंदन करून उभा राहिला. कृष्णानें त्यास येण्याचें कारण विचारलें. तेव्हां प्रधान ह्मणाला–संग्रामाअगोदर शिष्टाई करावी अशी राजनीति आहे ह्मणून दुंदुभीनें मला पाठविलें आहे. तरी दुंदुभीचा युद्धपुरुषार्थ ब्रह्मांडांत मावूं शकत नाहीं, असें तुह्मी जाणत असतां येथें कां आलेत? त्याच्या प्रतापाच्या ज्वाळांनीं कूर्म- राज पोळून ब्रह्मलोक तप्त झाला, तो मानवांस जाळणार नाहीं काय? त्याचें नांव ऐकतांच यम प्राण सोडतो! ईश्वराव- तारी परशुरामास त्यानें आकाशांत उडविलें! मग राजांची पर्वा

काय ! याचा तुह्मींच विचार करा. जो श्रीराम सेतु बांधून लंकेंत गेला, कुंभकर्ण–रावणाचा वध करून ब्रह्मांडांत प्रताप मिरविला, त्यानें अश्वमेधार्थ श्यामकर्ण सोडिला होता, तो येथें येतांच दुंदुभीनें धरिला, त्यास सोडविण्याकरितां स्वतः श्रीराम दीक्षा सोडून बंधूसह येथें आला. मग युद्धसमय जाणून दैत्यानें नारदास बोध करावयास पाठविलें. तेव्हां नारदानें पुष्कळ नीतिवचनें रामास सांगून परत जाण्यास सांगितलें. तेव्हां रामास क्रोध येऊन रणांत आला. मग वसिष्ठानें त्यास मागें फिरवून दुंदुभीजवळ गेला व त्यास बोध करून दोघांचें सख्य करतांच श्यामकर्ण सोडून दिला. जेथें श्रीरामाची अशी गति झाली तेथें पार्थ तो काय ? याचा श्रीकृष्णा विचार कर, आणि पार्थाच्या वचनास भुलून आपल्या कुटुंबास अंतरून दैत्यबाणानें मरूं नको. परत जाऊन सर्वांनीं आपलें रक्षण करा.

असें ऐकतांच मारुतीस कोप चढून ह्मणाला–अरे तूं दूत होऊन आलास ह्मणून क्षमा केली. माझा श्रीराम जो त्रैलोक्यामध्यें पुरुषार्थी त्याला तूं अशक्त मानलास ! तोच राम हा श्रीकृष्ण ! त्याच्या सेवेसी पार्थ आहे व मी त्या दोघांचा सेवक समर्थ असतां त्या दैत्यास पुरुषार्थ दाखविन. जसा समुद्र अगस्तीपुढें निर्बळ त्याप्रमाणें दैत्य होय. मी पुच्छानें राक्षसांची मोळी बांधून समुद्रांत बुडविली ती ख्याति ऐकलीस नाहीं ! आतां दैत्यांच्या रक्तामांसांचा बळी रणमंडळास देऊं ! असें दैत्यनाथास सांगून संग्रामास लौकर पाठीव.

त्यावर पार्थ व राजानी सांगितलें–जा, दुंदुभीचे युद्धसोहाळे पुरे करण्याकरितां समरंगणीं पाठवून दे. परंतु दूत ह्मणाला–जशा कर्मरेषा असेल तसें होईल. असें बोलून वंदन करून रणांत येऊन दुंदुभीस कथन केलें. तेव्हां तो कोपून रणकर्कश, काळकेत, सुधर्मा, सुवर्मा, धूम्रकेतु, रणराज, गजराज, वज्रकेत, वज्रदंत, रणकर्मा या दहा सेनापतीस बोलावून साठ दळभार व्यूह रचण्यास सांगितलें. एक भार ह्मणजे कोटि अश्व, अर्ध कोटी हत्ती, पाच कोटी रथ, दोन कोटी पायदळ, असे आठ भार रचून वीर सिद्ध होऊन रणांत आले. पार्थदळही सावध झालें. पुढें दोन्हीं सैन्यें रणांत येऊन वीर रण माजेल.

# अध्याय ६७ वा.

## दुंदुभीआख्यान–युद्धारंभ.

नंतर बभ्रुवाहनानें कृष्णार्जुनांस वंदन करून, निजसैन्यासह शत्रूंवर असंख्य शर सोडून बाणांधकार पाडून दैत्यसंहार करूं लागला. असें पाहतांच रणमंडळीं दैत्य अमित बाणांचा वर्षाव करूं लागला. परस्परांचें एक घटका दारुण युद्ध होऊन, त्यांत रणमंडळ मूर्च्छित पडला; त्याला सारथ्यानें रथांत घालून दुंदुभीजवळ नेला, त्यास दुंदुभी क्रोधानें ह्मणाला–अरे ! एक घटका सुद्धां न भरतां पळ कां काढलात ?

इकडे वृषकेतूनें बाणांचा वर्षाव करून सूर्य झांकून टाकला. त्यावर चंद्रचूड धांवत आला. त्या दोघांचें प्रचंड युद्ध जुंपून एकमेकांचें उणें काढीत, शेवटीं चंद्रचूड धरणीवर

पडला;त्यालाही सारथ्यानें रथावर घालून नेलें. मग बभ्रुवाह. वृषकेतूचें क्षेमालिंगन झालें. तें पाहतांच नरनारायण समाधान पावले. चंद्रचूड पडतांच दुंदुभी दांत ओंठ चावी पांच कोटी अश्व, पांच कोटी हत्ती, चार कोटी रथ व असंख्य पायदळासह रणांत आला. त्याला मारुतीनें पाहतां भुभुःकार देऊन कृष्णार्जुनास सावध करतांच सर्वजण सिद्ध झाले. मारुतीनें दुंदुभीस पक्ष्यासारखा आकाशांत न्यावा, अशा हेतूनें उड्डाण केलें. तें कृष्णानें पाहतां म्हटलें-मारुते ! तुझा निर्वाणीचा भरंवसा असतां, आतां असें करणें तुला योग्य नाहीं. तूं ध्वजाग्रावर बसून युद्ध चातुर्य पहा. असें ऐकून मारुती खालीं उतरला. नंतर नकुळध्वज, ताम्रध्वज व मयूरध्वज शंभर अक्षौहिणी दळ भारासह दैत्यसैन्याचा संहार करीत चालला. असें दुंदुभीनें पाहतांच हातांतील दीड हजार धनुष्यांनीं तिघांवर तीक्ष्ण बाण सोडले. तेव्हां तिघे तीन ठिकाणीं होऊन सर्व बाणांचें निवारण केलें शेवटीं तीन बाण सोडून तिघांसही भूमिगत केलें. सैन्यांत हाहाकार होऊन पार्थसैन्यानें पळ काढिला असें कृष्णार्जुनानें पाहतांच त्यांचेजवळ वृषकेतूनें आज्ञा मागून आपण बभ्रुवाहन, प्रद्युम्न व अनिरुद्ध असे चौघेजण सिद्ध होऊन, चोहोंकडे झाले आणि कर्णीक, नालीक, शिलीमुख वत्सदंत, क्षुरप्र, चंद्रकार असा बाण व गदा पट्टीश तोमर शक्ति पाश परिघ मुद्गर प्राश शूल अशा आयुधांचा वर्षाव करूं लागले, तेव्हां दैत्य सहस्र गदा घेऊन सैन्य संहार

लागला. चौघांनीं दैत्यास कोंडून धरिला. त्या बाळकांचा पराक्रम पाहतांच दैत्यास आश्चर्य वाटून तो घाबरा झाला. मग अष्टभैरवांचें स्मरण करतांच त्यांनीं चौघांसही मोहून घातलें. लगेच दैत्यानें चार शर सोडून चौघांचे प्राण घेतले. बायाळांनीं कृष्णार्जुनास कळवितांच ते पुत्रशोकानें अश्रु ढाळूं लागले. त्यावेळीं चंद्रहासादि वीरांनीं प्रार्थना केली कीं, या मृत्युलोकीं जें आकारास आलें त्याचा संहार होणारच. हे देहातीत मुकुंदा! लटका पुत्रशोक कां करितोस? मला दैत्यमर्दनार्थ सुखानें आज्ञा द्या. मारुती ह्मणाला—कृष्णनाथा! आतां वेरें दिमत नाहीं, यास्तव पुरुषार्थ न सांडितां यास मारिला पाहिजे. मग कृष्णानें अर्जुनास बोध करून क्षत्रियधर्माची हानि करूं नको असें सांगितलें. तें ऐकतांच पार्थानें दैत्याचें मर्दन आतांच करतों असें ह्मटलें.

नंतर चंद्रहासास वीरवर्मा हंसध्वज सात्यकी कृतवर्मा यौवनाश्व प्रवीर नीलध्वज अनुशाल्व यांस बोलावून विचार करूं लागला. चंद्रहास ह्मणाला—सैन्यांचें अष्टविभाग करून दुंदुभीस कोंडून धरावा. मारुतीनें ह्मटलें—याला गुरु शुक्र प्रसन्न असून शंकराचा वर आहे. याच्या गजासुर बापानें हजार वर्षे युद्ध केलें, त्यास मारावयास शंकर समर्थ झाला नाहीं. वीरभद्र व शिवानें गजासुरास मारतांच, शेवटीं शंकरापासून वर घेतला कीं, माझ्या पुत्रास कोणापासून मरण नसावें व माझ्या चर्माचें वस्त्र अंगावर घ्यावें ह्मणून हा दुंदभी अजिक्य होय. यास्तव निजकार्य साधेल असा विचार करा. असें ऐकतांच कृष्णार्जुन स्तब्ध झाले.

# अध्याय ६८ वा.

## दुंदुभीआख्यान-युद्धप्रसंग.

नंतर वीरवर्मा कृष्णाची आज्ञा घेऊन बत्तीस अक्षौहिणी सैन्यासह दैत्यसैन्यावर चालून गेला. त्यास दुंदुभीनें पाहतांच चौदा कोटी अश्वभार, तितकेच हत्ती, दहा कोटी रथ व असंख्य पायदळ सिद्ध करून रथारूढ होऊन वाद्यें वाजवीत रणांत आला. दोन्हीं सैन्यांच्या भेटी होतांच, परस्परांवर शरवृष्टि करूं लागले. वीरवर्म्यानें सैन्य दशदिशांस पळविलें असें पाहतांच दुंदुभी ह्मणाला तूं यमाचीं कर्में पुष्कळ जाणतोस, पण तीं येथें चालणार नाहींत. असें बोलून पंधराशें धनुष्यें ओढून बाण सोडले. ते वीरवर्म्यानें तोडून टाकून शिलीमुख शरानें दैत्यास भ्रमीत केला. तो सावध होऊन दीड हजार गदांनीं नृपदळभाराचें चूर्ण केलें. वीरवर्म्यानें गदांचें निवारण केलें. असें परस्पर दारूण युद्ध होऊन, एक निर्वाण शरानें वीरवर्म्यास पाडून प्राण घेतला. पांडव सैन्यांत हाहाकार झाला. तेंव्हा यम क्रोधानें धांवत आला, त्याला नारदानें भेटून म्हटलें—जो हरिहरास अजिंक्य तेथें तुझा पाड काय? असें ऐकून यम मागें फिरला. कृष्णार्जुन दुःखांत लोटले, तेव्हां अनुशाल्व आज्ञा घेऊन चतुरंग दळासह निघाला. दोन्हीं सैन्यें एकत्र होतांच अनेक शस्त्रास्त्रांच्या मारानें परस्पर दळांस जर्जर केलें, रक्तप्रवाहांत प्रेतें वाहून जाऊं लागलीं, अनुशाल्वानें एक बाण सोडून

दैत्यास आकाशांत उडवून धरणीवर आपटलें त्याबरोबर दैत्यानें अनिवार शक्ति सोडून अनुशाल्वाची शांति करितांच पार्थसैन्य पळूं लागलें अनुशाल्व पडतांच कृष्णार्जुनास दुःख होऊन वीरांस भीति प्राप्त झाली.

मग हंसध्वज कृष्णआज्ञा घेऊन निघाला. उभय दळांचें तुंबळ युद्ध जुंपलें शेवटीं दुंदुभीनें दीड हजार गदा राजावर टाकून मूर्छित केलें असें पाहून सुबुद्धि प्रधान उठला, त्याचें मस्तक आकाशांत उडविलें, पुनः हंसध्वज सावध होऊन अतुल संग्राम करूं लागला, तोंच दैत्यानें भैरवमंत्र जपून खड्गानें त्याचें शिर कृष्णार्जुनाजवळ उडविलें. तें पाहतांच सर्व कृष्णास म्हणाले–तूं सर्वांची उपेक्षा केलीस म्हणून हीं सारे पुत्र मेले. मग चंद्रहास, नीलध्वज, प्रवीर, कृतवर्मा व सात्यकी कृष्णाजवळ आज्ञा मागूं लागले. कृष्णानें चंद्रहासास राखून चौदा कोटी सैन्यासह चौघांस युद्धास पाठविलें.

# अध्याय ६९ वा.

## दुंदुभीआख्यान–युद्धप्रसंग.

नंतर चौघे वीर दुंदुभीवर चोहोंकडून मारा करूं लागले. तेव्हां दैत्य घाबरून कुळगुरूचें स्मरण करून अमित शर सोडूं लागला. त्यांचें चौघे निवारण करित होते. दैत्य जें जें संधान करि तें तें व्यर्थ जाऊन त्याचें सर्वांग रक्तमय झालें दुंदुभी म्हणाला–एकेकानें झुंजावें अशि राजनीति असतां ती सोडून, जसा कृष्ण कपटी त्याच्यासारखा परिपाठ तुम्हीं चाल-

विलात. नंतर चार बाण एकदांच सोडून, चौघांचे प्राण घेतले; ती वार्ता पार्थास कळतांच, दुःखसरितेस भरती येऊन कृष्णार्जुनांचीं नेत्रकमळें शोकजीवन स्रवूं लागलीं.

असें चंद्रहासानें पाहतांच दोघांचें समाधान करून आज्ञा मागितली आणि दहा अक्षौहिणी सैन्यासह वाद्यगजरानें रणांत आला. असें दैत्यानें पाहतांच, हा श्रीकृष्णप्रिय चंद्रहास येथें मरण पावल्यास प्रत्यक्ष नारायण येईल, असें जाणून कोटी बाण सोडिले. त्यांचें चंद्रहासानें खंडण केलें. दोघेही प्रतापीय प्रसिद्ध योद्धे शस्त्रास्त्रांचें कठिण युद्ध करूं लागले. ते एकमेकांस आटोपत नव्हते चंद्रहासानें दैत्याचा रथ शंभर फेरे आकाशांत फिरवला व मुखकमळ आणि हात खिळून टाकले. त्यावेळीं धन्य याचा पुरुषार्थ! आतां शिवाचें वरदान व्यर्थ जातें असें दैत्यास वाटलें व तो चिंतेंत पडला. तें चंद्रहासाचें कौतुक मारुतीनें कृष्णास सांगितलें. असा संग्राम कोणत्याच वीरानें केला नाहीं.

नंतर दैत्यानें शिवस्मरण करतांच हात व मुखें मुक्त झालीं. तेव्हां दैत्य संतोषून धन्य या वीराची माता कीं असें रत्न प्रसवली! असें बोलूं लागला. शेवटीं बारा सूर्यासारख्या तेजस्वी रुद्रबाणानें चंद्रहासाचें शीर उडाविलें, तें कृष्णार्जुनाजवळ पडलें. शिर पाहतांच दोघे दुःखसागरांत बुडाले. त्यांचें समाधान करण्यास एकटा मारुतीच राहिला होता. असें तीन दिवस युद्ध होऊन शिल्लक तिघेच राहिले. तो अस्तमान झाला. प्रातःकाळीं कृष्ण स्नानसंध्या करून पार्थाजवळ आला. पुढें जे मगर चोवीस हजार वर्षें भांडत होते, त्यांच्या तोंडांत कृष्ण, पार्थ व मारुती पडतील.

# अध्याय ७० वा.

## दुंदुभीआख्यान, कृष्णार्जुन व मारुतीचें मत्स्यमुखीं पडणें.

दुसरे दिवशीं कृष्णार्जुनानें स्नान संध्या केल्यावर मारुतीनें मला संग्राम करण्यास आज्ञा द्यावी अशी विनंति केली. कृष्णानें आज्ञा देतांच कपि आकाशांत उडाला. त्या वेळीं इंद्रास वाटलें कीं, आतां दैत्याचा [illegible] संहार होणार! तेव्हां बृहस्पति इंद्रास ह्मणाला [illegible] बसा [illegible]तोस? त्रैलोक्य जरी आलें तरी त्यास [illegible] आंत [illegible]तांत मारुती प्रचंड पर्वत उचलून चालला, [illegible] अष्टभैरवांनीं पहातांच दैत्यास कळविलें. तोंच मारुतीनें पर्वत दैत्यावर टाकला. त्यानें पिष्ट केलें आणि ह्मणाला अरे मर्कटा! ही दशांतील नव्हे. पर्वताचें झुंजणें व झाडें मोडणें [illegible] कुस्ती येथें चालावयाच्या नाहींत; असें बोलून [illegible] बाण मोडिले, त्यांचें कपीनें चूर्ण केलें. मग हनुमंतानें बाण [illegible] मोडला. त्या पुढें कपीनें पर्वत आड धरिला. नंतर रुद्र बाण मोडतांच तो कपीजवळ भांडण करूं लागला. दुंदुभीनें पंधरासें गदा टाकिल्या त्याही व्यर्थ गेल्या. शेवटीं शक्ति, तोमर, गदा एकदांच टाकतांच मारुती जर्जर झाला. कपी पुच्छानें दैत्यास समुद्रांत फेंकला. पण, वरदान खोटें होतें. ह्मणून माघार घेऊन तेथून परतला.

असें पाहून पार्थास दुःख झालें. मग मारुती ह्मणाला-इतरांप्रमाणेंच आपलीही गति होईल, यास्तव आपल्या गांवीं जावें. कृष्ण ह्मणाला-या दैत्यास भिऊन पळावें ? यांत थोरपण तें काय ? यासीं झुंजलेंच पाहिजे, मग होणार तें होईल. तें भाषण पार्थानें श्रवण केलें. पुनः मारुती ह्मणाला-आपण येथें निर्वाण केल्यास हस्तनापुरास जाऊन धर्मास कोण सांगेल ? त्यावर कृष्णानें तुझा विचार कसा काय ह्मणून अर्जुनास विचारलें. पार्थ ह्मणाला-जो स्वामीचा विचार, तोच मला प्रमाण आहे. जें होणार असेल तें कधीं चुकणार नाहीं. कृष्ण ह्मणाला-असें सृष्टींत कधींच झालें नाहीं. कालीश्वरामारखा वज्रदेही तोही जर्जर झाला. मग धर्मास मुख कसें दाखवावें ? तरी शत्रूचा संहार करून श्यामकर्ण आणावे; हें आपलें प्रतिज्ञावचन कोण खोटें करील ?

असें कृष्णवचन ऐकून मारुती ध्वजाग्रीं बसला, अर्जुन रथारूढ होतांच कृष्ण रथ चालवूं लागला. दहा अक्षौहिणी सैन्यासह पार्थ रणांत येतांच, भैरवांनीं पाहून खदखदां हांसला. दोघांच्या शरसंधनानें बाणांचें वर्षण होऊन अग्नीचा वर्षाव होऊं लागला व दोन्हीं सैन्यें जळूं लागली. देव विमानें वरून पळूं लागले, जळचरें उकडून मेलीं व शस्त्रांची रक्षा झाली, तेव्हां दैत्यानें पर्जन्यास्त्र सोडतांच पार्थानें पवनास्त्र सोडलें असें तुंबळ युद्ध होऊन दैत्यानें तीन हजार गदा पार्थावर टाकल्या त्यांचें एका बाणानें चूर्ण केलें, मग दैत्य ह्मणाला--आतां कुळदेवतेचें व गुरूचें स्मरण करा, समुद्रांत चोविस हजार वर्षें

तो मत्स्य भांडत आहे. त्यांच्या क्षुधाशमनार्थ तुमचा ग्रास देतों असें बोलून आकाशांत रथ शंभर वेळां भोवंडून तो सूर्यापर्यंत गेला आणि तेथून अकस्मात् पूर्वसमुद्रांतील मत्स्य, ज्यानें गायत्री मंत्र उच्चारला होता त्याच्या मुखांत टाकला. माशाचे दांत घोड्यास लागूं नयेत ह्मणून मारुतीनें कोंपर पुढें केला व तिघांचा मत्स्यमुखीं प्रवेश झाला. उरलेलें सैन्य वनांत लपलें. दैत्य विजयी होऊन आनंदानें नगरांत गेला. देवानें राजाचा गर्व हरण करून आपलाही अहंपणा निवारला. पुढें दुंदुभीच्या गर्वराशी अरण्यास हृषीकेशी विंदान करील. नारद द्वारकेस जाऊन हा वृत्तांत कथन करून, सर्वांस समुद्रतीरास घेऊन येईल.

# अध्याय ७१ वा.

## दुंदुभीआख्यान–कृष्णकुटुंबाचा वीलाप.

दुंदुभीनें जय प्राप्त झाल्याबद्दल भोजकोट नगरांत उत्सवकेला नारद ब्रह्मविणा घेऊन हरिनामानें गात नाचत द्वारकेस आला. सभास्थानीं येतांच उग्रसेनादिकांनीं नमन करून आदरातिथ्य केल्यावर मुनि विणा टाकून दुःखामुळें कांहींच बोलेना ह्मणून यादवांनीं असे दुःखीं कां ह्मणून प्रश्न केला. मुनी ह्मणाला– मोठा अनर्थ झाला ! उत्तर समुद्राचे तिरीं भोजकोट नगरींत दुंदुभी नांवाचा राजा राज्य करितो; त्याच्या नगरांत श्यामकर्ण फिरत गेले. त्यानें अश्व धरतांच, राजे सोडविण्यास गेले; त्यांचा वध केला. शेवटीं कृष्णार्जुनाचें युद्ध होतांच

त्या तिघांस त्यानें मत्स्यमुखांत टाकिलें, ही बातमी सांग-ण्यास कोणीच वांचला नाहीं ह्मणून मी सांगावयास आलों; असें ऐकतांच सभेंत हाहाकार होऊन यादव शोकांत पडले. अंतपुरांत कळतांच स्त्रिया धाय मोकलून रडूं लागल्या. त्या-सर्वांचें उद्धवानें शांतवन करतांच बळरामानें गरुडाचें स्मरण केलें. तो येतांच बळरामानें ह्मटलें—चक्रपाणी मीनोदरीं पडला आहे, यास्तव आह्मां सर्वांस समुद्रतिरीं घेऊन चल. लगेच गरुडानें विस्तीर्ण शरीर करून कृष्णपरिवारास समुद्रतिरीं घेऊन आला. नारदानें तें ठिकाण दाखविलें. रुक्मिणी आणि स्त्रिया आतां काय करावें ? अशा चिंतेंत शोक करित बसल्या.

नारदानें तेथून कैलासास जाऊन शंकरास सर्व वृत्तांत कळविला आणि ह्मणाला—आतां वेळ न लावितां दुंदुभीस मारून कृष्णपार्थास सोडवावें. बरें ह्मणून शंकर परिवारा-सह निघाला. त्याच्यापुढें नारद येऊन बलरामास ह्मणाला—तूं उगाच काय बसलास, असुरास वधून बंधूचा सूड घे; आतां शंकर येऊन युद्धाचें यश घेईल. असें ऐकतांच बळ-राम क्रोधानें असुरास बोलावून युद्ध करूं लागला. दोघांचें गदायुद्ध, मल्लयुद्ध, शस्त्रयुद्ध होऊन शेवटीं दैत्यानें रुद्रमंत्र बाणानें बळरामास बत्तीस योजनांवर मूर्च्छित पाडिला. असें पाहतांच गरुड धांवला, त्याचे दहनास्त्रानें पंख जाळले मांस कोथळा राहिला तोही बाणानें फोडून संहार केला. दोघांचा नाश झालेला पाहतांच नारद कैलासास जाऊन शिवास ह्मणाला—वेळ कां लाविलांत ? गरुड बलराम युद्धास गेले त्यांचाही त्यानें विध्वंस केला.

असें ऐकतांच शंकर वीरभद्रासह प्रमथादि परिवार घेऊन वेगानें आला. शंकराचें व दैत्याचें निकराचें संभाषण होऊन शिवानें त्रिशूल व पाशुपतास्त्र सोडलें. त्यांचें भैरवांनीं निवारण केलें. त्यावेळीं शंकरास उणेपणा येऊं नये ह्मणून नारद ब्रह्मदेवाजवळ जाऊन ह्मणाला—ताता ! तुह्मीं निश्चित काय असतां कर्मभूमीवर अनर्थ काय झाला तो ऐकिला नाहीं काय ! असें बोलून सर्व वृत्तांत कथन केला आणि ह्मणाला—शंकराचीही तीच गति होईल, यास्तव कांहीं उपाय करा. असें ऐकतांच ब्रह्मदेवानें शिवाजवळ येऊन वंदन केलें व तृतीय नेत्र उघडलेला पाहून ह्मणाला—दयानिधी ! हें काय करतां ? तुमचा हा वरदपुत्र. यास जाळावयास पाहतां ? आपण वाढविलेल्या वृक्षाचें खंडण दुसऱ्याच्या हातानें करावें हेंच थोरांस योग्य होय. तुमच्याच वरानें तो अजिंक्य असतां, त्याचा स्वतः क्षय करणें योग्य नाहीं. मग शंकर ह्मणाला -जर त्रिशूल, पाशुपात देऊन कृष्ण पार्थ व श्यामकर्ण सोडिल तर त्याचे पंचप्राण वांचतिल. असें ऐकून बरें ह्मणून ब्रह्मदेव दैत्याजवळ गेला आणि ह्मणाला—दुंदुभे ! तूं व्यर्थ प्राणास कां मुकतोस ! त्रिशूल पाशुपत देऊन शिवाला शरण जा. जो अनंत ब्रह्मांडाच्या माळा डोळा उघडून जाळतो त्याशीं युद्ध करण्यास कोण समर्थ आहे ? ज्यानें वर दिला त्याचाच प्राण घेईन ह्मणतोस ! अशा तुज कृतघ्नास यश येणार नाहीं असा बोध करून त्रिशूळ पाशुपात व श्यामकर्ण देऊन शिवाच्या चरणावर घातला.

नंतर नारदानें ब्रह्मदेवास विचारलें -मत्स्यमुखांतून तियांचें मोचन कसें होईल? ब्रह्मदेवानें सांगितलें, चोविस हजार वर्षांचा अंत व मगरविरोधाची समाप्ति जवळ आली आहे लौकरच त्यांची सुटका होईल. मग नारदानें बळरामाजवळ जाऊन शंकरासही जिंकल्याचे सांगितलें व ह्मणाला-कृष्णार्जुनानीं वैकुंठाची वाट धरिली त्यांच्या मागें तूंही जा. तेथून कृष्णस्त्रियांजवळ येऊन त्यांसही वैकुंठी गमन केल्याचें कळविलें नारदांचें वचन ऐकतांच सर्वांनीं आक्रांत केला तो अवर्णनीय होय त्या ह्मणाल्या-द्रौपदीनें आमचें घर घेतलें! त्या कवटाळणीनें आपलें पांचजण आवरून आमच्या निधानासही हातघातला अशी ती चेटकी पांचांस वंचून आमचे निधान कशी भोगित होती! शेवटीं तिच्याच कार्यास प्राणास मुकला! आग लागो तिच्या अश्वमेधाला. प्राणवल्लभा! आतां आमची गति काय होईल? असा विलाप करित समुद्रांत उड्या टाकण्याचा त्यांनीं निश्चय केला. तें पाहतांच नारद हांसूं लागला, अशा त्या कळलाव्या नारदानें कृष्णकामिनी मरणास घातल्या. इकडे मीनमुखांत कृष्ण घाबरा झाला. तो बाहेर येऊन दैत्यास मारून कामिनींचें रक्षण करील.

# अध्याय ७२ वा.

## दुंदुभीआख्यान-कृष्णार्जुनमुक्तता व कुटुंबभेट.

कृष्णास मीनमुखांतून बाहेर पडण्यास सात दिवस होते, पण कामिनींच्या आक्रांतास्तव बाहेर आले. अर्जुनास व

मारुतीस निजशक्तीनें सावध करून रथासह मारुतीच्या कोंपराच्या आधारानें बाहेर पडले. पुढें रम्य स्थानीं स्नानें करून सुवस्त्रें परिधान केलीं. अक्षय भात्यासह अर्जुन सिद्ध झाला. तोंच नारदानें येऊन वंदन केलें आणि द्वारकेंतील, कैलासांतील व ब्रह्मदेवास आणिलें, दैत्याचें समाधान केलें व बळराम, कामिनी वगैरे प्राण देण्यास सिद्ध झाल्या, येथपर्यंत सर्व हकिगत सांगितली. ती ऐकून कृष्ण हांसून ह्मणाला—आपणास फार श्रम झाले. मला जाणत असतां कामिनीस कां कष्टविल्या बरें ? आतां तें स्थान दाखीव. असें नारदास सांगून चौघे आकाशमार्गानें समुद्रतीरास आले. दुरून कृष्णास पाहतांच सर्वांचे जीव परतले. बळरामाची भेट झाली गरुडास कृपादृष्टीनें सजीव केलें शेवटीं विदेह स्थितींत रुक्मिणी होती तिलाही सावध करून आनंदी आनंद झाला.

नंतर बळरामास सांगितलें—तुह्मी गरुडपृष्टीवरून द्वारकेस जा. देव गरुडास ह्मणाला—या सर्वांस द्वारकेंत पोंचवून पाताळांत जाऊन अमृत घेऊन ये. देवाज्ञेनें बळराम द्वारकेस गेला. मग हनुमंत ह्मणाला—आह्मींही जाऊं काय ? देव ह्मणाला—हें काय बोललास ? माझ्या भक्तांस रणांत शोधावें लागेल. मी स्त्रीपुत्रांचा त्याग करीन, पण मातृचरणाची शपथ घेऊन सांगतों कीं, भक्तांचा त्याग करणार नाहीं. मी ही सर्व माया दाखविली आहे. नाहीं तर या दैत्याचें बळ तें काय ? भ०= पार्थास ह्मणाला—तूं भिऊं नको, तुझा रक्षिता मी आहें नंतर रथांत बसून दैत्यनगरास येतांच कृष्णानें ह्मटलें

तुह्मीं येथेंच रहा. मी एकटाच जाऊन दुंदुभीचा संहार करितों. असें सांगून देवानें वामनमूर्ती ब्राह्मणरूप घेऊन दैत्याकडे निघाला. त्या वेळीं दुंदुभी विजयाच्या आनंदात जात अ सतां ब्राह्मणास पाहतांच, रथाखालीं उतरून वंदन केलें. देवानें 'कल्याण असो' असा आशिरवाद दिला. मग दैत्यानें काय इच्छा धरून कोठून आलेत ह्मणून विचारलें. ब्राह्मण ह्मणाला–माझें कुटुंब द्वारकेस आहे. पुत्राची मुंज करावी या हेतूनें देशावर निघून धर्मनगरास चाललों होतों, तों तुह्मी त्याचा सैन्यभंग केला, कृष्णार्जुनहि निमाले, दाता कोणी उरला नाहीं, हा आमचा कर्मयोग ओढवला ! ह्मणून मी आपल्यापाशीं याचक आलों आहे. दैत्य ह्मणाला––स्वामी ! काय मागणें असेल तें मागा. ब्राह्मण काय मागेल तें पुढें सांगितलें आहे.

# अध्याय ७३ वा.

## दुंदुभीआख्यानाची समाप्ती.

ब्राह्मण ह्मणाला–राजा ! माझ्या मुलाचा व्रतबंध करणें आहे, तरी सर्व स्त्रियासह स्नान करून मला व्रतबंध पूर्ण होईल इतकें द्रव्य द्यावें. तें राजानें मान्य करून, मंडप सुशोभित केलें आणि स्त्रियांस बोलावूं पाठविलें, दैत्याच्या एक लक्ष कामिनी होत्या, त्यांच्या शतांच्या शत दासी सेवेंत हजर असत. त्या मंडपांत येऊन दैत्यास रत्नखचित पाटावर बसवून अनंत पात्रांत जळ आणून पतीस स्नान

घालूं लागल्या. तेव्हां देवानें त्याच्या स्नानाच्या पाण्यां
सुदर्शन घातलें, त्यामुळें अंगावर पाणी पडतांच करकमळें
शिरकमळें पक्व फळासारखीं गळून पडून फक्त मासगोळा मा
राहिला. असें पाहतांच सर्व स्त्रियांनीं जो अकांत केला ते
अवर्णनीय होय. त्यावेळीं, अहा दाता निमाला, असा लटक
भाव दाखवून देवानें तेथून पळ काढला आणि पार्थाजवळ येऊ
दैत्यमारल्याचें कळविलें. नंतर तिघे रथारूढ होऊन रणांत आले

इकडे गरुड कृष्णाज्ञेनें पाताळांत जाऊन शेषाला युद्धाचं
हकीगत कळवून अमृत मागूं लागला. पण ते दुर्जन अमृत देइ
नात. तेव्हां गरुडानें युद्धख्याती करून अमृताचें हरण के
आणि रणमंडळांत आला. श्रीकृष्णानें त्यास क्षेमालिंगन देऊन
रणांत अमृतासिंचन करून नृपादिक सर्व सैन्यास उठविलें. मग
सर्वांसह कृष्णार्जुनांनीं नगरलूट केली. हें नारदानें पाहून समुद्र
तीरीं दुंदुभीचे रणधीर व रणदुर्धर असे पित्यासारखे पराक्रमी
दोघे पुत्र होते त्यांचे जवळ जाऊन ह्मणाला—अरे स्वस्त काय
बसलेत ? तुमच्या पित्यास कृष्णानें कपटानें मारून सर्व नगर
लुटून फस्त केलें त्याचा सूड घेणें तुह्मास योग्य आहे, नाहीं
तर तुह्मी भूमिभार जन्मलेत ! असें ऐकतांच ते दोघे चोवीस
लक्ष वीरासह युद्धास आले. इकडे नारदानें कृष्णार्जुनास दुंदुभी
पुत्र युद्धास आले. पळारे पळा असें सांगितलें तोंच कृष्णानें
त्यांचेवर मायेचें मोहन घातलें. तेव्हां ते दोघेही शरण आले
असें पाहून नारद चकित झाला. मग तेथील राज्य त्यांचे स्वाधी
करून दोघांस बरोबर घेऊन पुढें चालले; ब्रह्मदेव व शंकराच्य

भेटी झाल्या; त्यांस आद्यंत शुद्ध कथन केलें. तें लीलाचरित्र ऐकतांच शंकरास हांसूं आलें व सर्व समाधान पावले.

नंतर नारद कृष्णास ह्मणाला–तुह्मीं तिघे ज्याच्या मुखांत सात दिवस होतेत, त्यास दुःखांत टाकून जाणें योग्य नव्हे. मग गरुडास सांगून त्या दोघांस आणविलें. त्या मत्स्यास देव ह्मणाला–आतां तुह्मीं विरोध सोडा. धुमकेतूस ह्मणाला–तूं गायत्री मंत्रोच्चारण केलेंस ह्मणून तुझ्या मुखांत वास घडला. तुला सत्यलोक प्राप्त होईल नंतर धूमकेतु पूर्वसागरास व वडवानळ उत्तरसागरास गेला. शंकर, ब्रह्मदेव व नारद आपापल्या स्थानीं गेले. पुढें श्यामकर्ण सोडून कृष्णार्जुन चालले. ते कोठें जातील तें पुढें सांगेन. हें दुंदुभीआख्यान जे भक्तीनें श्रवण करतील त्यांच्या पातकांचें दहन होऊन श्रीहरि त्याचेवर कृपा करील.

# अध्याय ७४ वा.

## सैन्यपाळआख्यान.

जैमिनी ह्मणतात–जन्मेजया ! पुढें श्यामकर्ण वायव्य दिशेस हिरापट्टणांत गेला. तेथील सैन्यपाळ नांवाचा राजा महापराक्रमी होता. तो शिकारीस जाऊन मागें परतला, तों मार्गांत सिंदुरगिरी नांवाची नगरी लागली. तेथील राजा भानुकांत व चंद्रपुरगिरीच्या राजाचा व्याही चंद्रकांत, त्याचा पुत्र चंद्रसेन हा भानुकांताचा जांवई होय. त्या भानुकांताची कन्या मालिनी आपल्या दासींसह सरोवरावर येऊन स्नानें करून

वस्त्रें परिधान केलीं आणि गौरीचें पूजन करून उपवनांत खेळावयास गेली. त्याच मार्गानें सैन्यपाळ राजा श्रृंगारवनांत आला. त्यानें मालिनीस पाहतांच सेवकाकडून जवळ बोलावून तूं कोणाची कोण, कुमरी किंवा सुवासिनी आहेस तें सांग. तेव्हां ती लज्जित होऊन, माझा पिता भानुकांत, सासरा चंद्रकांत व पति चंद्रसेन असें सांगितलें. त्यावेळीं राजास मदनानें गांठलें. तो तिला ह्मणाला—तूं माझी कामिनी हो, माझ्या सातशें स्त्रियांत तुला पट्टराणी करीन. ज्याची इच्छा इंद्र करितो तें सर्व माझ्या घरीं आहे. मी तुला बळेंच नेईन तर मला चोर ह्मणतील व लोक निंदा करतील तरी बापाला सांगून पाठव कीं, मला सैन्यपाळ धरून नेत आहे. असें ऐकतांच तिला वज्रपात वाटला. मग तिनें दासीबरोबर बापास सांगून पाठविलें. दासीनें भानुकांतास सांगतांच तो काळासारखा खवळला आणि सैन्याची तयारी करण्यास सांगून रथावर बसला. चित्रसेन प्रधानाला हुकूम केला कीं, अगोदर शिष्टाई करून तो राजा कोण व बलात्कार कां करितो त्याचा समाचार काढ. प्रधान ह्मणाला मी त्याला बोध करून कन्या सोडल्यास घेऊन येतों, नाहीं तर युद्ध करावें लागेल. तुह्मीं चंद्रकांतास पत्र पाठवावें.

प्रधान निघून गेल्यावर चंद्रकांतास पत्र लिहिलें कीं, माझी मालिनी कन्या चंद्रसेनाची स्त्री हिला सैन्यपाळ राजा नगरांत नेऊं पाहात आहे, तरी तुह्मीं आह्मीं मिळून कन्या सोडवूं. असें पत्र लिहून दूताहातीं पाठविलें. इकडे प्रधान

सैन्यपाळाजवळ जाऊन ह्मणाला-मी भानुकांताचा प्रधान, राजा ! तूं क्षात्रधर्मी पुण्यशील असतां, परदारा हरण करून कलंक लावून कां घेतोस ! स्त्रियांच्या संगतीनें किती नाडले तें तुला ठाऊक असतां नरकगर्तांत कां पडावें ? अशीं अनेक बोधवचनें सांगितलीं, पण तीं त्यानें मान्य केलीं नाहींत तो ह्मणाला—माझी हानि होवो किंवा नरकीं पडो, तिला मी सोडणार नाहीं. भानुकांतानें मला वधून कन्यारत्न न्यावें किंवा मी त्याला मारून अंगनारत्न वरीन. प्रधान बोलला तुझा मृत्युकाळ जवळ आला ह्मणून दुर्बुद्धि आठवली ! तिला राजानें ध्वजस्तंभास बांधून ठेविली. प्रधानानें सर्व वृत्तांत भानुकांतास कळविला. तेव्हां मरावें किंवा मारावें असा निश्चय करून तीन कोटी सैन्यासह भानुकांत निघाला. सैन्य नर वानर राक्षस आहेत असें प्रधानानें सांगितलें.

नंतर दोन्हीं सैन्यें एकत्र मिळून निकराचें युद्ध झालें. त्यांत असंख्य वीरांस मरण येऊन शेवटीं भानुकांताचा निःपात केला. राक्षसांनीं नगरास वेढा घालून भोंवतीं अग्नि लाविला. मग सैन्यपाळानें भानुकांतास सांगून पाठविलें कीं, अजून युद्ध करणें असेल तर कर. नाहींतर मालिनीस नेण्यास हुकूम दे. असें ऐकून राजास मी वांचून भूभार झालों, असें वाटून कन्यादुःखानें तो रुदन करूं लगला. मग सैन्यपाळ मालिनीस घेऊन नगरास चालला. त्याच मार्गानें पार्थाचे श्यामकर्ण आले. नारदाच्या सांगण्यावरून सैन्यपाळाच्या दूतांनीं धरून राजाजवळ नेतांच सर्वांनीं पाहून

समाधान पावले. नंतर मस्तकींची पत्रिका वाचून पाहतां पांडवांचें असें कळलें. मग सैन्यपाळानें कृष्णार्जुनाशीं युद्ध करण्याचा निश्चय करून मालिनी व श्यामकर्णास रक्षणांत ठेविलें आणि नर वानर राक्षस सैन्य सिद्ध करून कृष्णार्जुनांची वाट पाहत बसले. पुढें सैन्यपाळ व कृष्णार्जुनाचें युद्ध होईल.

# अध्याय ७९ वा.

## सैन्यपाळ–आख्यान.

श्यामकर्ण धरल्याची बातमी दुतांनीं पार्थास सांगितली. हनुमंत ध्वजाग्रीं होता, त्यानेंही सैन्यपाळानें अश्व धरिलें ह्मणून सांगितलें. तुमचे सैन्यापेक्षां दसपट सैन्य त्याचें असून, हा अंगदाचा वडील मुलगा श्रीरामभक्त आहे,त्याच्या पासंगास तुमचें सैन्य पुरणार नाहीं; आतां श्यामकर्ण मिळणें दुर्लभ आहे. असें हनुमंताचें वचन ऐकतांच राजे भयाभीत झाले. असो, मारुतीस कृष्ण ह्मणाला–तूं राजांचे पोटीं भय कां घालतो ? या राजांचा काळासही धाक आहे. अर्जुन ह्मणाला–तुझ्या मनांत भय उत्पन्न कां झालें ? शत्रूसैन्यास एका क्षणांत दग्ध करीन. मग राजांस ह्मणाला–तुमचा काय हेतु आहे ? राजे बोलले, आह्मीं मारूं किंवा मरूं पण क्षत्रियधर्म सोडणार नाहीं ! नंतर अर्जुन सिद्ध होतांच बभ्रुवाहनाचें सैन्य खवळलें. तों नारद तेथें अकस्मात आला. त्यास सर्वांनीं वंदन केलें.

नारद ह्मणाला—सैन्यांत गजबज कसली आहे! पार्थ ह्मणाला—सैन्यपाळानें श्यामकर्ण धरिले आहेत, त्यासीं युद्ध करणें आहे! मुनी बोलला तुमचा हा उद्योग निष्फळ होइल. युद्धास त्रिभुवन आलें तरी त्यास न आटपतां तो नारायणासही पळवील. यास्तव युद्ध न करितां हस्तनापुरास जाऊन सुखानें नांदा. त्यानें भानुकांतास जिंकून त्याची मालनी कन्या नेली. हे सर्व कृष्णाचे खेळ आहेत असें ऐकून पार्थ क्रोधानें ह्मणाला—त्या मशकाला कृष्णचक्रानें एका क्षणांत जिंकीन. नारद ह्मणाला—गर्व कशाला धरतोस? मी भक्त ह्मणून जे गर्व धरतात ते देवास आवडत नाहींत. गर्वानें रावणाचा प्राण गेला दुर्योधन गर्वानेंच निमाला! सत्यभामेनें कृष्ण दान दिला ह्मणून मला गर्व झाला, त्याचें हरण नारायणानें केलें. यास्तव गर्व करूं नको. सर्वांवरतीं नारायण भरून उरला आहे. पार्थ हांसून ह्मणाला—माझा सारथी चक्रपाणी उणें पडूं देणार नाहीं. असें बोलून सर्वसैन्यासह युद्धास सिद्ध झाला आणि सैन्यपाळास सांगून पाठविलें कीं,! तूं रणखांब रोवशील किंवा मळभिमळ व द्वंद्वयुद्ध करशील. त्यानें जबाब दिला—रणखांब नको. सर्वांनीं युद्धास मिसळून माझ्या एकाच वीरास मारा. नर वानर असुर निमाल्यावर मग मी युद्धास येईन असें ऐकून निशाणी घाव देऊन रणांत आला.

नंतर सैन्यपाळानें भीमामनास सैन्य देऊन युद्धास पाठविलें दोन्हीं सैन्यें एकत्र मिळून तुंबळ युद्ध सुरूं झालें;

त्यांत पांडव सैन्याचा पराजय होतांच अनुशाल्व धांवला, त्याचें शिर आकाशांत उडविलें. तों प्रवीर, सुवेग, हंसकेतु नीलध्वज सैन्यासह येतांच त्यांचाही पराजय केला. शेवटीं बभ्रुवाहनानें भीमासनाचें शिर उडविलें व सात कोटी सैन्य मारलें. ती बातमी सैन्यपाळाला कळतांच वृक नांवाच्या वीरास पाठविलें. त्या महा बलवान योद्ध्यानें बभ्रुवाहनाचें मस्तक छेदिलें. तें पाहतांच पुत्रासह मयुरकेत उठला. दोघांस वृकानें नृसिंहमंत्रानें बाण सोडून खालीं पाडलें, त्यांस हंसध्वज रथांत घालून घेऊन गेला. मग वीरवर्मा, कृतवर्मा व वृकाचें युद्ध होऊन वृकानें दोघांस मारलें. त्यांसही हंसध्वजानें नेलें मग चंद्रहास, मदन, यौव-नाश्व, हंसकेत, सात्यकी, कामनंदन, मकरध्वज. प्रद्युम्न असे आठजण उठले. त्यांचाही वृकानें निःपात केला. तेव्हां पार्थ धांवला, त्याच्यापुढें वृषकेतु जाऊन वृकाशी लढूं लागला. वृकाच्या एकशें आठ रथांचें चूर्ण केलें. वृकानें निर्वाण बाण सोडून वृषकेतूचा प्राण घेतला. नंतर अर्जुनाचें व वृकाचें तुंबळ युद्ध होऊन दहा कोटी वीर वृकाचे पडले. शेवटीं वृकानें शक्तिबाण सोडून अर्जुनास मूर्च्छित केलें. पार्थ-सैन्यांत हाहाःकार झाला व वृक स्वस्थानीं गेला. इकडे कृष्णानें निजकृपेनें दळभार उठवून पार्थास सावध करितांच त्याला दसपट आवेश चढला. मग वृकानें मेलें किंवा वांचलें तें पाहण्यास दूत पाठविला. तो येऊन पाहतो तों पार्थादिक सावध होऊन युद्धवार्ता करित आहेत. दूतास कृष्ण ह्मणाला—

बृकास सांगा कीं, सर्व सैन्य उठलें. आतां अस्तमान झाला आहे तरी उद्यां युद्धास ये असा वृत्तांत दूतानें बृकास कळविला तेव्हां त्यास भीति प्राप्त झाली. पुढें चंद्रकांत व भानुकांत पार्थ सैन्यांत येतील.

# अध्याय ७६ वा.

## सैन्यपाळ-आख्यान, मारुतीचा संवाद.

दूतवचन ऐकतांच बृक सैन्यपाळास जाऊन भेटला आणि ह्मणाला-कृष्णानें सांगितलें आहे कीं, उद्यां रणांत यावें नाहींतर श्यामकर्ण देऊन प्राण वांचवावा. राजा ह्मणाला-तूं चिंता करूं नको मीच कृष्णार्जुनांस जिंकावयास जातों. नृपवाक्य ऐकून सर्व स्वस्थानीं गेले. दैत्यांचा पांडवांस कोणी साह्य येतील किंवा पळून जातील ह्मणून रात्रीं पहारा ठेविला. सर्व राजे श्रीकृष्णास विचारून शिबिरांत जाऊन झोंपेंत निमग्न झाले. एक प्रहर रात्रीच्या सुमारास चंद्रकांत व भानुकांत सैन्यासह पांडवसाह्यार्थ आले रक्षकांनीं तुह्मीं कोण ह्मणून विचारतांच, त्यांनीं चंद्रकांत व भानुकांत अशीं नांवें सांगून चंद्रसेनाची स्त्री सैन्यपाळानें नेली ह्मणून कृष्णार्जुनास शरण आलों आहों. असें सांगितलें. ती बातमी रक्षकांनीं कृष्णार्जुनांस कळवितांच, त्यास बोलावून आणिलें. त्यांनीं वंदन करून स्तुति केली व मालिनीस सैन्यपाळानें नेल्याची बातमी सांगून शरण आलों आहों असें ह्मटलें. कृष्णानें त्यांस मालिनीस सोडविण्याचें

अभयवचन दिलें. नंतर ते जवळच निवांतस्थान पाहून तंबू देऊन झोंपी गेले.

इकडे दूतांनीं चंद्रकांत व भानुकांत कृष्णास शरण गेले असें सैन्यपाळास कळविलें आणि दैत्यभार त्यांचा संहार करावयास मोठ्या आनंदानें निघाला. त्यांनीं पार्थास निरोप पाठविला कीं, आमचीं कुळें चंद्रकांत व भानुकांत तुमचेकडे आलीं आहेत तीं द्यावीं, नाहीं तर आपला नाश करून घ्याल. पार्थ ह्मणाला—तुह्मांस जें वाटेल तें करा, पण आह्मांस जे शरण आले ते परत मिळणार नाहींत, शरणांगताचें रक्षण न करणारे कल्पपर्यंत नरकीं पतन पावतात असें ऐकतांच कपिराक्षसांनीं कांपून निद्रिस्त पांडवसैन्यास शिळा वृक्ष पाषाण यांचा वर्षाव व अग्निप्रलयाचा आकांत केला. असा रात्रीचे वेळीं पांडवदळाचा संहार केला. पार्थ श्रीकृष्णास ह्मणाला—आह्मीं या दोघांस आश्रय दिला ह्मणून ही आपदा प्राप्त झाली! यांच्या पायगुणामुळें राक्षस—वानरांनीं सैन्याचें कंदन केलें. असें ऐकतांच श्रीकृष्ण बोलला—पार्था! ही अमंगळ वाणी काय बोललास? शत्रुभयानें पाठीशीं रिघाले त्यांचा अव्हेर केला असतां लोक हांसतील. शरणांगताची उपेक्षा करणारे कल्पपर्यंत रौरव भोगून मग विष्ठेंतील कीटक होतात. अशा पापाच्या राशी शिरीं कां घेतोस? मी पाठीशी असतां धैर्य कां सोडतोस? हें कृष्णवचन ऐकून पार्थ लज्जित होत्साता तूं रक्षणकर्ता, असें बोलून वंदन केलें.

कृष्ण पुनःअगाळा—जें झालें तें झालें. उद्यां सैन्यपाळास जीवंत धरावा. मग मारुतीस ह्मणाला— तूं साह्य होऊन अरिष्ट निवारण कर. मारुती ह्मणाला—देवा ! सोंगसंपादणी करून मला गौरव देतां, तरी आपल्या प्रसादानें सर्वांस सुख देतां. नंतर पुच्छानें वानर—राक्षसांची मोळी बांधून मस्तकावर घेतली आणि कृष्णस्मरणानें आकाशांत उडून सैन्यपाळास भेटावयास निघाला सैन्यपाळानें दुरून पाहतांच तो घाबरून गेला.मारुती मोळीसह सैन्यपाळाजवळ येऊन ह्मणाला—माझें नांव हनुमंत तूं राक्षस वानर पाठवून माझा स्वामी कष्टविलास! तरी सावध हो नांव ऐकतांच रामभक्तास सैन्यपाळानें लोटांगण घातलें व उत्तमासनीं बसविला. बांधलेली मोळी मस्तकावर तशीच होती. वीर सोडण्याकरितां काकुळतीस येत होते. असें सैन्यपाळानें पाहून भयभीत होऊन हात जोडून स्वामी ! कां आगमन झालें ह्मणून प्रश्न केला व वीरांस सोडावयास सांगितलें. कपि ह्मणाला—माझा स्वामी अर्जुन रात्रीस कां कष्टविलास ? राजा बोलला, अर्जुन आपला स्वामी कसा तें सांगा.

मारुती ह्मणाला—पण करून त्यानें मला जिंकिलें व मला ध्वजाग्रीं स्थापिलें. मीही वचन दिलें कीं, तुला सोडणार नाहीं. संकटसमयीं रक्षण करीन. माझा स्वामी श्रीराम तोच हा श्रीकृष्ण सारथी झाला आहे. तो त्रिभुवन जाळील रावणाची गति झाली तशी तुझीही होईल. अर्जुनानें गर्व धरिला ह्मणून त्याचें निरसन केलें. निर्वाणीचे वेळीं पार्था

साठीं तो प्राण देईल. पार्थास तूं न ओळखून मर्कट राक्षस त्याचेवर पाठविलेस ! तूं रामभक्त असून तुझा क्षय होऊं नये ह्मणून एवढ्या रात्रीं आलों. असें ऐकून सैन्यपाळ ह्मणाला–तुह्मीं पूज्य आहां, आतां जेणेंकरून उभयतांचें सख्य होईल असें करा. कपि–राक्षस राजास म्हणाले–ज्यानें आमची मोळी बांधिली, असा वीर पार्थदळांत आहे. तरी संग्राम न करितां सख्य करावें. श्यामकर्ण देऊन कृष्णार्जुनास भेटावें.

असें ऐकतांच राजानें श्यामकर्ण मारुतीस अर्पण केलें. नंतर मारुती बोलला–राजा ! तूं अधर्म करून मालिनी आणिलीस ! तिचा बाप व सासरा कृष्णास शरण आले. त्यांस कृष्णानें अभयवचन दिलें कीं, प्राण वेंचून मालिनीस सोडवीन. यास्तव मालिनीसाठीं प्राणास मुकशील. परस्त्री अभिलाषानें अनेक मरण पावले आहेत. रावण, दुर्योधन यांचा परस्त्रीच्या अभिलाषामुळेंच नाश झाला. ह्मणून विचार करून परदारागमन करूं नये. मी मोठा, दुसरा लहान हा अभिमान धरूं नये. सारांश पापाचरण करूं नये. याविषयीं टिटवीची कथा सांगतों ऐक.

# अध्याय ७७ वा.

## टिटवीआख्यान.

सैन्यपाळास मारुती ह्मणाला–राजा ! टिटवी नांवाची एक पक्षीण समुद्रतिरावर प्रसूत होऊन पिलें ठेवून चाऱ्यास

गेली तिचीं तीं पिलें एका बेडकीनें खाऊन ती समुद्रांत गेली. हें तिला कळतांच धांवत आली व समुद्रतीरावर रडत बसली. ती ह्मणाली–जर ती बेडकी मिळेल तर तिची चोंचीनें पाठ फोडून पिलें बाहेर काढीन. मेलीं असलीं तर पुरीन आणि जीवंत असलीं तर रक्षण करीन. असें मनांत आणून रडत बसली. तोंच तिचा नवरा तेथें आला. त्यानें रडण्याचें कारण विचारलें. तिनें सर्व वृत्त कथन केलें. तोही शोक करूं लागला. स्त्रियांस माया फार असते, पुरुष विवेकानें आकर्षण करून विचार करितात. मग पक्षी स्त्रीचें समाधान करूं लागला. तेव्हां ती त्याला झिडकारून ह्मणाली—तूं माझा पति नव्हेस, शेजारी वाटतोस, माझें दुःख जाणत नाहींस, दूर हो. पाठीचें दुःख कठीण त्याहून पोटचें जास्त. तूं जर नांवाचा पिता असतास तर या दुःखानें त्या बेडकीस ठार मारून पोटांतील बाळें काढलीं असतींस. नवमास भार व प्रसूतिवेदना एक श्रीहरिच जाणतो. वेश्यापुत्राच्या बापाला दुःख नसून वेश्येलाच असतें. अनंत वेश्या, अनंत लोक, अनंत दुःखें व अनंत शोक आहेत;पण जिच्या पोटचें तिलाच दुःख असतें. कोणी पति नसून विधवा असतात आणि तूं माझा पति असूनहि मी त्यांच्यासारखीच झालें आहें. त्या बेडकीचा मीं सूड घेईन. स्त्री केवळ विषाची लता आहे तिच्या वचनशरानें नराची उरी उरत नाहीं. ती टिटवी पतीची निर्भर्त्सना करून समुद्रतिरीं जाऊन रडूं लागली. मग तिनें चोंचीनें समुद्र आटवून बेडकीस शोधण्याचा विचार

केला आणि चंचुपुटानें पाणी बाहेर टाकूं लागली. तेव्हां तिचा पति तेथें येऊन उगाच कष्ट कां करतेस ह्मणून बोलूं लागला. पण तिनें तें न मानितां आपलाच आग्रह धरून पतीलाही पाणी उपसण्यास बरोबर घेतलें तों तेथें नारद मुनीची स्वारी झाली त्यांनीं त्यांचें दुःख श्रवण करून ह्मटलें मी येथें गरुडास घेऊन येतों. त्यामुळें सागर त्रासून बेडकी तुह्मांस देईल.

असें सांगून नारद आकाशांत जाऊं लागला, त्याला भक्षण्याकरितां गरुडपुत्र कागकेत यानें धरिलें. तो पक्ष्यांशिवाय सर्वांस भक्षीत असे. नारदाला तूं कोणाचा कोण ह्मणून कागकेतानें विचारलें नारद ह्मणाला–तूं पक्ष्यांचा राजा ह्मणवितोस आणि तुला कुळाचा अभिमान नाहीं ! तुझ्या पक्ष्यांस सागरानें गांजिलें त्याची लज्जा नसून गरुडउदरीं जन्मून दुर्बळ ब्राह्मण मारावयास सिद्ध झालास ! जळो तुझा पराक्रम ! ! तूं भूभार झालास. बळ असतां जो स्वकुळाचें रक्षण करित नाहीं तो वंशांत कृमि जन्मला ! त्या पक्ष्यांचें दुःख गरुड निवारण करील, ह्मणून त्यास सांगावयास जात होतों, तों तूं येथें विघ्न करून मला भक्षावयास पाहतोस ! मी मेल्यावर पक्ष्याचें धांवणें कोण करील ? तूं गरुडाचे पोटीं अधम जन्मलास ! हें नारदाचें वचन ऐकतांच कागकेत खवळून नारदाबरोबर त्या स्थानीं गेला. नारदानें त्या दोघांस त्याचे चरणावर घातलीं. त्यांनीं सर्व वृत्तांत कागकेतास कळविला.

नंतर कागकेतानें समुद्रास निरोप पाठविला कीं, मी

गरुडाचा पुत्र टिटवीसाह्यार्थ आलों आहें, तरी टिटवीची पिलें बेडकीनें मारलीं तिला तूं पाठीशीं घातलेंस. तीं पिलें आणून दे नाहींतर मरण पावशील. समुद्र ह्मणाला— तूं मला भीति कां दाखवितोस ? पाठांच देईन पण पाठीनें देणार नाहीं. तूं पाहिजे तें कर. मी शरणागतास देणार नाहीं नंतर कागकेत जलचरांस साह्य करण्यास सांगूं लागला. त्यांनीं आह्मीं समुद्राधीन असें सांगितलें. असें ऐकून गरुड- पुत्र युद्धास सिद्ध झाला. समुद्रही मनुष्यरूपानें जलचरांसह रथारूढ झाला. दोघांचें युद्ध होऊन कागकेत मुर्च्छित पडला. तें पाहून नारद चिंतेंत पडला. पुनः कागकेत सावध होऊन जळचरें ग्रासूं लागला. समुद्रास नखानें फाडलें. असें नारदानें पाहून सागरपुत्र जालंदरास आणावा, असा वि- चार करून जालंदराजवळ गेला आणि सर्व वृत्तांत कथन केला. तो ऐकतांच जालंदरास कोप येऊन तो धांवत आला. दोघे घोर युद्ध करूं लागले. मग नारदानें पुत्रास गांजलें ह्मणून गरुडास जाऊन सांगितलें. गरुडानें जालंदरास पळ- वून सागरास जर्जर केलें. तेव्हां नारदास चिंता पडून चंद्रा- जवळ गेला आणि तुझ्या पित्यास गरुडानें त्रास दिला असें सांगितलें. त्या बरोबर चंद्र सैन्यासह येऊन गरुडाशीं युद्ध करूं लागला. नंतर नारद गरुडाला ह्मणाला—मी कैलासास जात आहें. शंकरास कांहीं निरोप सांगणें असल्यास मज- जवळ सांग, गरुड ह्मणाला—शंकर व अगस्ती यांस घेऊन यावें. नारदानें शंकरास सांगतांच, शंकर गणांसह अगस्तीस

घेऊन रणांत आला. नारद ब्रह्मदेवाकडे जाऊन सर्व हकिगत सांगता झाला. मग ब्रह्मदेव वैकुंठास गेला व श्रीहरीसह रणांत आला. गरुडानें विष्णुस वंदन करून टिटवीचें साह्य करण्यास सांगितलें. देवानें अभय देऊन कृपादृष्टीनें पक्षीकुळें जिवंत केलीं. इकडे कागकेत मत्स्य भक्षण करीत संहार करीत चालला. चंद्र व जालंधराची कागकेतानें व गरुडानें विटंबना केली. शंकर अगस्तीस घेऊन रणांत आला, त्यास पाहतांच समुद्र भयाभीत झाला. तेव्हांपासून गरुडानें जलचरांस पक्षहीन केलें तें वैर अद्याप चालत आहे. मग समुद्र ब्रह्मदेवास शरण जातांच, ब्रह्मदेवानें समुद्राचें रक्षण करण्यास विष्णुस सांगितलें. तेव्हां देवानें गरुड व समुद्र यांची भेट केली गरुड समुद्रास ह्मणाला—बेडकी टिटवीस दिल्यावर तुमचें आमचें वैर राहणार नाहीं.

तें ऐकून समुद्रानें सर्व बेडक्या आणून दिल्या त्यांत ती अपराधी बेडकी आली नव्हती ती खालीं चिखलांत जाऊन लपली होती, तिला आणून टिटविला दिली. मग टिटवीनें तिचें विदारण करून मृत पिलें बाहेर काढलीं व मातींत पुरलीं, तेव्हां तिचें समाधान झालें. त्या दीन टिटवीकरितां गरुडानें भांडण करून हरिहर ब्रह्मादिक साह्यार्थ आणिले. मी थोर हा अभिमान धरून जे दीनाचें छळण करितात, त्यांचा अभिमान चालत नाहीं. ह्मणून लहान थोर हा अभिमान धरूं नये, सर्वांच्या अंतःकरणांत भगवान् भरून उरला आहे. ही मारुतीनें सांगितलेली गोष्ट सैन्यपाळानें

एकतांच संतोष पावला आणि ह्मणाला-तुमचें वचन मला प्रमाण आहे. असें बोलून श्यामकर्ण व मालिनी आणून कृष्णार्जुनांस शरण गेला व वस्त्रालंकार देऊन क्षेमालिंगन दिलें. कृष्णानें सैन्यपाळाला अर्जुनास भेटविलें देवानें मालिनी भानुकांताच्या स्वाधीन केली, तिनें बापाचे व सासऱ्याचे चरण वंदिले. नंतर कृष्णाज्ञेनें श्यामकर्ण पुढें सोडिले. हें सैन्यपाळाचें आख्यान जे श्रवण पठण करतील त्यांचें पाप क्षालन होऊन अंतीं ते शिवपदास जातील.

# अध्याय ७८ वा.

## सिंहध्वज-आख्यान.

पुढें श्यामकर्ण दुर्घट वनांत जातांच श्रीकृष्ण चिंतातुर झाला, तो अर्जुनास ह्मणाला-माझ्या बुद्धीस भ्रंश झाला कांहीं विघ्न येईल असें वाटतें. पार्थ ह्मणाला--तुमच्या स्मरणानें भ्रांतिवनाच भस्म होतें, मग आपणांस भ्रम कां झाला? कृष्ण बोलला-पुढें सिंहध्वज दैत्याचें नगर आहे; त्यानें अश्व धरल्यास सर्वांचा संहार करील, मग पार्थानें तो कोणाचा कोण ह्मणून विचारतांच कृष्ण सांगूं लागला—एक सुमित्र नांवाचा ऋषि गंगातीरीं समाधिस्त राहात असे! त्याच्या दर्शनाकरितां उत्कंठ नांवाचा राजा आपल्या मेधावती कन्येसह गेला. मेधावतीनें मुनीस वंदन केल्यावर तिचें मन त्याचे चरणीं जडून त्याची सेवा करून जन्म सार्थक करावें असें तिला वाटलें. तिनें घरीं आल्यावर

आपल्या आईस मनाची इच्छा कळविली. ती राणीनें राजास सांगितली. मग राजा मुनीचे आश्रमास जाऊन नेहमीं सेवा करूं लागला. पुढें कांहीं दिवस लोटल्यावर अकस्मात् राजा दृष्टीस पडला. त्यास सेवा करण्याचें कारण विचारिलें. त्यानें माझ्या मुलीचा अंगिकार करावा ह्मणून प्रार्थना करितांच मुनीनें वचन दिलें. नंतर राजानें कन्या अर्पण केली. ती पतीची सेवा करीत असतां एके दिवशीं संध्याकाळचे वेळीं कामानें व्याप्त होऊन भोगदान मागूं लागली तेव्हां मुनीस चमत्कार वाटून हें हिला काय आठवलें ह्मणून विचारांत पडला. मदनासारखा चांडाळ या त्रिभुवनांत नाहीं. यानें थोरथोरांची मुरकुंडी पाडिली आहे. तेथें मानवांची काय कथा ? कामबाण लागतांच चंद्रानें गुरुपत्नींशीं गमन केलें ! ब्रह्मकन्या इंद्रानें कपटानें भोगितांच सर्वांगास भगें पडलीं ! ब्रह्मदेवानें कन्यागमन केलें ! कृष्णानें वृंदा भोगिली ! विश्वामित्र उर्वशीस भुलून कुत्रा होऊन इंद्रलोकीं गेला. पराशरानें धीवरकन्येचा उपभोग घेतला. अशा ज्ञानवज्राच्या गिरीचें कामबाण वज्रानें चूर्ण झालें ! मग अबला मोहिली यांत आश्चर्य काय ? हा काम सुकृताचा क्षय करितो. मी शक्तिहीन वयातीत झालों, मला काम काय करील असें ह्मणूं नये.

अशा त्या कामानें तप्त झालेल्या मेधावतीला मुनीनें पुष्कळ प्रकारें समजाविली पण तिनें ऐकिलें नाहीं. मुनीनें भविष्य जाणून तिला भोग दिला. त्याचा गर्भ राहून वीर-

केतु, गृहकेतु व धर्मकेतु ( सिंहध्वज ) असे तीन पुत्र झाले. सिंहध्वजानें दारुण तप मांडलें. त्याच्या ज्वाळा इंद्रलोकीं जातांच, इंद्र सत्यलोकीं गेला. तेथें ज्वाळा जातांच ब्रह्मा वैकुंठास गेला. तेथून कैलासास आले. मग चौघे देव दैत्यास वर देण्यास आले. त्यानें दहा हजार वर्षांनीं ध्यान विसर्जन केलें देवांनीं वर माग ह्मणतांच, " सुरासुर, वृद्ध अथवा तरुण असो, त्यापासून किंवा तुमच्या मुळापासून मला मरण येऊं नये. " असा त्यास वर मिळतांच त्यानें सर्व त्रिभुवन जिंकलें. तोच या नगरांत आहे. यानें अश्व धरिल्यास सर्वांचा क्षय होईल. असें ऐकतांच सर्वांस भीति पडली. मग श्रीकृष्ण ' जें होणार तें होईल ' असें सांगून सर्वांसह पुढें चालला. अश्व महाद्वारांत जातांच, तेथें नगरांतील एक लक्ष बाळें खेळत होतीं, त्यांनीं अश्व धरिला. व धर्माचा असें जाणून नगरांत पाठविला. तीं बाळें पार्थसैन्याशीं युद्ध करूं लागलीं. असंख्य सैन्य रणांत मारिलें. तो अनुशाल्वानें बाण सोडून बाळांस पळवून लाविलें. नंतर तेथील द्वार सैन्य घेऊन निकरानें लढला. त्याचा अनुशाल्वानें प्राण घेतला. उरलेलें सैन्य नगरांत पळालें. पुढें दारुण युद्ध होईल.

# अध्याय ७९ वा.

## सिंहध्वज-आख्यान.

अंत्यजपाळ रणांत पडतांच, तेथील ग्रामवाशाचे सेवेक-रितां तक्षक ठेविला होता. त्यानें पांडवसैन्याबरोबर तुंबळ

युद्ध मांडलें. त्याचें अनुशाल्वानें शिर उडविलें. घायाळ नगरांत गेलें. नंतर ग्रामाधीश आला त्यासही अनुशाल्वानें मारिलें. मग घायाळांनीं प्रधानास सर्व झालेला प्रकार कथन केल्यावर प्रधानास क्रोध येऊन एक कोटी वीर घेऊन रणांत आला. त्यास सुकेत नामक सेनापति ह्मणाला - आधीं मी युद्धास जाऊन सर्वांस मारून येतों. मग तो रण-पती बंधुसह रणांत येतांच, दोन्ही दळें निकरानें लढूं शेवटीं अनुशाल्वान दोघांचे प्राण घेतले. शेष सैन्यानें प्रधा-नास जाऊन सांगतांच तो असंख्य दळासह रणभूमीवर आला आणि अनुशाल्वास ह्मणाला—तूं दैत्यकुळीं जन्मून मानवांस शरण गेलास ! तें तुला पातक घडलें ह्मणून आतां माझ्या शरतीर्थास आपला देह सोड. जसें शिवचापास संगदोषामुळें रामहस्तानें प्रायश्चित मिळालें. तसें तुला मी देतों. त्या दोघांचीं शरीरें शरघातानें छिन्न भिन्न होऊन आरक्त दिसत होतीं. अनुशाल्वानें सुमित्र प्रधानाचे एक हजार रथ चूर्ण केले. शेवटीं शूळावर बाण सोडून प्रधानानें अनुशाल्वाचा प्राण घेतला. पांडवदळ भीतीनें पळूं लागलें तो प्रद्युम्नानें धांवणें केलें आणि शंभर बाण सोडून अश्व रथ ध्वज पार चूर्ण केलें. प्रधानानें दुसरा रथ घेतला. अशा सातशें रथांचा निकाल झाला. शेवटीं सुमित्रानें नेम करून निर्वाण बाणानें प्रद्युम्नाचा प्राण घेतला. तों कृतवर्मा येतांच त्यासही मूर्च्छित केलें. मग वृषकेतु बाण सोडूं लागला. प्रधानानें भैरवास्त्र सोडतांच असंख्य भैरव लढूं लागले. कर्णपुत्रानें

नृसिंहास्त्र सोडिलें. शेवटीं नारायणास्त्रानें सुमित्राचा प्राण घेतला व वृषकेतू विजयी झाला. पुढें सिंहकेत रणांत येईल.

# अध्याय ८० वा.

## सिंहध्वज-आख्यान.

सुमित्र प्रधान पडल्याचें सिंहकेतास कळतांच तो प्रळयाग्नीसारखा संतप्त होऊन रथास बत्तीस हजार सिंह जोडून शंभर अक्षौहिणी सैन्यासह बाहेर पडला. तो येतांच कृष्ण पार्थास टाकून पर्वतदरींत दडून बसला. इकडे दारूण युद्ध जुंपून बभ्रुवाहनानें दैत्याचें तीन अक्षौहिणी सैन्य मारिलें, सात बाण सोडून धनुष्य सारथी रथ व सिंह यांचा निःपात करून दैत्यास मूर्च्छित पाडलें. सिंहकेत सावध होऊन सहस्र बाणांनीं बभ्रुवाहनास मूर्च्छित केलें: तोंच वृषकेतूनें धांवून नृसिंहास्त्रानें दैत्यरथाचे उरलेले सिंह मारले. शेवटीं सूर्यमूखशरानें वृषकेतूस मूर्छित केलें. नंतर चंद्रहासादिक वीर लढूं लागले. दैत्य रथावर उभा राहून पाहूं लागला तों कृष्ण दिसला नाहीं, मारुती व राजे मात्र दृष्टीस पडले. तेव्हां चिंतेंत पडून ह्मणाला—कृष्ण कां आला नाहीं? माझ्या पूर्वपापानें माझ्या मनोरथतरूचा भंग झाला. आतां पार्थवध करावा ह्मणजे नारायण दृश्य होईल. मग असुरी मायेनें सर्वांवर मोहन घातलें. त्यांत बभ्रुवाहन व वृषकेतू मात्र सावध होते. दैत्यानें पार्थावर चपळेसारखे बाण सोडले. तों बभ्रुवहान सावध होऊन कृष्णचिंतन करून. बाण सोडून

दैत्यास ध्रुवमंडळास नेला. रथासह सिंहकेत सत्यलोकांत भ्रमत होता. इतक्यांत वृषकेतू सावध झाला. पार्थादिक सर्व देहभान विसरले, बभ्रुवहान व वृषकेतू पूर्वींच मूर्छित होते ते मागील मोहनांत सांपडले नव्हते. त्या दोघांनीं साठ कोटी सैन्य यमसदनास पाठविलें. वृषकेतूनें दैत्यास सात दिवस पर्यंत आकाशांत भ्रमविलें व बभ्रुवाहनानें सैन्य मारिलें. तो कपटी दैत्य दोघांचा पराक्रम पाहून संतोष पावला आणि ह्मणाला—माझी राज्यादि संपत्ती तुह्मांस देतों. माझ्या घरीं चिरकाल रहा चला.

असें ऐकून बभ्रुवाहन क्रोधानें ह्मणाला—आसुरी संपत्तीचा उपभोग घेणारा मी नव्हे. मला कृष्णप्रसादानें काय कमी आहे? आह्मांवर संतोषित झालास तरी युद्धच दे. मग दैत्य बाणाचा वर्षाव करीत एका बाणानें वृषकेतास मूर्छित पाडलें, तोंच बभ्रुवाहनानें निर्वाण मांडून सत्तर अक्षौहिणी सैन्याचा संहार केला. देव त्याची कीर्ति वर्णन करूं लागले. ज्याच्या भीतीनें नारायण पळाला त्याला आठ दिवसपर्यंत आठ दिशा भ्रमण्यास लाविल्या. सिंहकेत ह्मणाला—आजपर्यंत असें युद्ध कधींच झालें नव्हतें? असें बोलून दिव्यबाण बभ्रुवाहनावर सोडिला; त्यानें प्राणच जावयाचा पण त्याची पार्थसुतानें खंडें केलीं. इतक्यांत वृषकेतू सावध झाला. त्यास दैत्य ह्मणाला—तूं मला लाजित केलेंस तर आतां त्या रुद्रबाणापासून तुला कोण रक्षील? त्याचा रुद्रबाण बभ्रुवाहनानें एकादश रुद्रानें तोडून टाकिला. त्यावेळीं देवांनीं

पुष्पवृष्टि करून आशिर्वाद दिला. असा त्या तिघांचा अद्भुत संग्राम झाला. या नंतर नृपकेतूचें बाळ रणांत येईल ती कथा एकाग्रचित्तानें श्रवण करावी.

# अध्याय ८१ वा.

## सिंहध्वज--आख्यान.

वृषकेतु जेव्हां युद्धास निघाला तेव्हां त्याची प्रभावती स्त्री गर्भिणी होती, ती नवमास भरतांच प्रसूत होऊन पुत्ररत्न प्रसवली धर्मराजानें मुनि, राजे व सर्व लोकांस बोलावून, मंडप घालून पुत्रोत्साह मोठ्या थाटानें केला. सर्वांस वस्त्रेंभूषणें, भोजनें देऊन तृप्त केलें. त्याचें नांव धृततेज असें ठेविलें. उत्सव आटोपतांच सर्व आपल्या स्वस्थानीं गेले. मग द्रौपदीनें बालकास पाळण्यांत घालून झोंके देत श्रीकृष्णाचें गीत गाऊं लागली. ती म्हणाली--हे माधवा तूं भक्त रक्षणार्थ नाना अवतार घेऊन, गोकुळांत जन्मून पोरांबरोबर खेळ खेळून लीला दाखविलीस. अनेक चरित्रें व अनेक कौतुकें दाखवून आईचे नेत्र संतोषित केलेंस, पांडवांचा ऋणी होऊन लाक्षागृहांतील संकटसमयीं धांवणें केलेंस. सभेंत मला लुगडीं पुरवून अर्जुनाचा गडी झालास, क्षीरसागर, वैकुंठ टाकून पांडवांचे घरीं वास्तव्य केलेंस. असें अनेक प्रकारें गुण गाऊन द्रौपदीनें गीत गाईलें, तें बालकास गोड लागून त्याचें चित्त श्रीकृष्णचरणीं जडलें देवाच्या अघटित लीलेनें त्यास' वाचा फूटून

द्रौपदीस ह्मणाला--ज्यानें पांडवांस रक्षून कौरवसंहार करून भक्तपण सत्य केलें तो सारथी मला दाखीव, असा छंद घेतला. द्रौपदीनें त्याला पुष्कळ समजाविलें पण तो छंद न सोडतां जास्त रडूं लागला. तेव्हां ती कष्टी होऊन बाळास धर्माजवळ आणून दिलें. धर्मानें अश्वशाळा कुंजरशाळा रथशाळा चित्रशाळा इत्यादि ठिकाणीं फिरविलें व समजावूं लागला तरी न समजतां सारथी दाखवा असा हट्ट धरून रडूं लागला. शेवटीं भीमास धर्मानें सांगितलें, या बाळास जेथें कृष्ण असेल तेथें नेऊन दर्शन करून येऊन ये. नाहीं तर हा रडून रडून प्राण सोडील. नंतर भीम बाळास घेऊन रथांत बसून कृष्णदर्शनास निघाला. त्याच्या बरोबर घटोत्कचपुत्र मेघवर्णही चालला. हें लीलालाघव सिंहध्वजाचा गर्व झाडण्याकारितां भगवंतानें रचिलें.

नंतर ते दोघे बाळास घेऊन वनोपवनीं लंघित चालले मार्गांत जे राजे वगैरे भेटले. त्यांनीं भीमाची स्तुति व पूजा केली. पुढें कुसुमावतीच्या रणभूमींत पार्थादिक मृत पडलेले आढळले, तेव्हां त्यांस आश्चर्य वाटलें. मेघवर्णासह भीमसेनास सिंहध्वजानें पाहतांच त्याचें मन भयाभीत होऊन भीमावर त्यानें अकस्मात् बाण सोडिला. त्यानें भीम मूर्च्छित पडला. तोंच मेघवर्णानें राक्षसी मायेनें सिंहकेतूस भ्रमवून पर्वतदरीसारखें मुख पसरून सारथ्यास गिळलें. असें पाहतांच दैत्यानें नृसिंहास्त्र टाकून त्यासही मूर्च्छित केलें. इतक्यांत बाळ आकाशांत उडालें. तें वृषकेतु व बभ्रुवाहनानें पाहतांच दैत्य

बाळरूपी झाला असें समजलें. मग बभ्रुवाहन ह्मणाला-तूं दळसंहार कर, मी दोघांस मारतों. नंतर बभ्रुवाहन बाळास बोलला-अरे दैत्या ! तूं देवादिकांस त्रासलेंस आणि आत बाळ झालास ? आतां प्राणाचें रक्षण कर असें बोलू ब्रह्मशक्ती बाळावर सोडिली. ती शक्ती पाहतांच बाळ भया व्याकुळ होऊन नेत्र झांकून द्रौपदीनें गाईलेल्या श्रीकृष्ण गीताचें स्मरण केलें. तों असा चमत्कार झाला कीं, वायू भवताची काडी बाळाच्या हातांत उडाली, त्याचा बाण होऊन त्यानें शक्तीचें खंडण झालें. मग बालक गर्जना करू ह्मणाला-मी सोमवंशी बालक, माझें पांडवांचा सारथी रक्षण करील. असें ऐकतांच बभ्रुवाहन ही कृष्णाची करणी अ समजला. पुढें बाळ दैत्यावर निर्वाण करील.

# अध्याय ८२ वा.

## सिंहध्वज-आख्यान.

बाळाचें वचन ऐकतांच बभ्रुवाहन साशंक होऊन ह्म णाला-हा जर दैत्य असता तर सोमवंशाचें नांव व पा सारथ्याचें स्मरण करताच ना. असा तर्क करून त्याचेजव उडून गेला आणि तूं कोणाचा कोण ह्मणून विचारूं लागला बाळ ह्मणाला-माझा पिता वृषकेतु, आई भद्रावती व माझें नां धृततेज धर्मराजानें ठेविलें. असें ऐकतांच बभ्रुवाहनास संतो झाला. मग सिंहध्वजास बाण मारून मूर्च्छित केला आणि वृषकेतूस बोलावून सर्व वर्तमान कथन केलें. तों दैत्य सा

होऊन दोघांस रणांत विकळ केलें. दोघींस दोन हातांत धरून जों मुखांत घालावें, तोंच बाळानें पाहून हरिस्मरण केलें, त्याबरोबर एक शर हातांत येऊन पडला तो टाकून देतांच दैत्याचें हृदय भेदून आकाशांत उडविला. पुनः खालीं उतरून वृषकेतु व बभ्रुवाहनाबरोबर कधीं झाला नाहीं व पुढें होणार नाहीं असा घोर संग्राम केला.

त्यावेळीं ईश्वरी मायेनें बाळास स्फुरण येऊन भीमाचे रथांत बसून धनुष्य घेतलें आणि बभ्रुवाहन वृषकेतूस म्हणाला—तुह्मीं आतां विश्रांति घ्या, मी दैत्यास मारितों. नंतर हरिनामाची आरोळी देऊन मजबरोबर द्वंद्व युद्ध कर असें दैत्यास सांगितलें. दोघांचें शस्त्रास्त्रांचें युद्ध जुंपलें, दैत्यास बालकांशीं युद्ध करण्याची लज्जा वाटूं लागली. बाळ ह्मणाले—दैत्या ! मी वृषकेतूचा बाळ तुझा काळ आहें, आतां सावध होऊन नारायणाचें स्मरण कर. असें बोलून वस्त्रानें बाण पुसून अग्रावर हरिनाम लिहून जनार्दनाचें चिंतन व धर्माचरण आठवून बाण सोडून दिला. त्यावेळीं पृथ्वी कंपायमान होऊन देव भयानें पळूं लागले. तो बाण सिंहध्वजाचे कंठनाळीं बसून शिर आकाशांत उडून खालीं पडलें. त्यावेळीं जयजयकार होऊन देवांनीं बाळावर पुष्पवृष्टी केली. बभ्रुवाहन व वृषकेतु धांवत येऊन बाळास आलिंगन मुखचुंबन केलें नंतर दैत्यघडानें शस्त्र घेऊन तिघांस मूर्च्छित केलें. तेव्हां पर्वतदरींतून श्रीकृष्ण दीर्घश्वास टाकीत भीत भीत बाहेर धांवत आला. रणांत सिंहध्वज पडलेला पाह-

तांच श्रीकृष्णास आनंद होऊन नाचूं लागला व कृपादृष्टीनें बभ्रुवाहनास उठविलें. त्यानें बालकाचा वृत्तांत कथन केला तसाच वृषकेतू उठतांच कृष्णचरण वंदून अनंत नामानें स्तवन मांडलें; मग बाळास उठवून श्रीकृष्णानें आलिंगन देऊन मुखचुंबन केलें, देवांनीं दुंदुभी वाजवून पुष्पवर्षाव केला,

नंतर श्रीकृष्णानें शेषाकडून अमृत आणवून सर्व नृपादिक उठविले; पार्थ सावध होतांच श्रीहरीस नमन केलें; हंसध्वजादि परिवारानें हरिदर्शन घेतलें; मग रणांत मंडप घालून भीम मेघवर्णादि सर्वांच्या परस्पर भेटी झाल्या; भीमानें बाळकाचा वृत्तांत कृष्णास सांगितला, तो ऐकतांच सर्व धन्य धन्य बाळाची! असें ह्मणूं लागले; नंतर कृष्णानें दैत्यनगर लुटण्यास आज्ञा दिली; सात दिवस अहोरात्र द्रव्य लुटीत होते; तरी सुवर्ण रत्नांच्या पर्वतासारख्या राशी पडल्या होत्या; तें नगर पाहण्यास श्रीकृष्ण जातांच तेथील संपत्ती पाहून आश्चर्य पावला; मग भीमास सांगितलें कीं, तूं द्रव्य-रत्नराशी व बालकास घेऊन अनुशाल्वाबरोबर हस्तनापुरास जा; धर्मास कुशलवृत्त सांग; तुला पोंचवून अनुशाल्व परत येईल; भीम श्रीकृष्ण आज्ञा वंदून हस्तनापुरास गेला; इकडे कृष्णानें बभ्रुवाहन व वृषकेतुला श्यामकर्ण पुढें सोडण्यास आज्ञा केली; हें सिंहध्वजाचें आख्यान जे श्रवण पठण करतील ते निःपाप होऊन ब्रह्मसदनास जातील पुढें अश्व शोणितपुरांत जातांच, शिवभक्त बाणासुर श्रीकृष्णाचा सन्मान करील.

# अध्याय ८३ वा.

## बाणासूर-आख्यान.

सिंहध्वजास मारून पुढें श्यामकर्ण सोडले. त्यांच्या मागून श्रीकृष्णार्जुन तीस अक्षौहिणी सैन्यासह व कर्ण कुमार तितक्याच सेनेसह निघाला. पुढें चौदाहजार योजनांचा पर्वताचा कडा लागला. त्यावरून एकेक वीर कृष्णाश्रयानें निघाला. तो मार्ग चढल्यावर पुढें बाणासुराचें शोणितपुर लागलें; त्याचा विस्तार पांचशें योजनांचा असून ती सुंदर नगरी अमरावतीसारखी होती; कृष्ण ह्मणाला— तो शंकराचा वरदपुत्र शिवनाम जपत असे. त्याची कन्या उखा अनिरुद्धास दिली होती. तिला स्वप्नांत भोग होतांच तिच्या चित्ररेखा सखीनें, स्वप्नपुरुषास द्वारकेहून नेऊन तिचें पाणिग्रहण करविलें.तेथें अनिरुद्धास बंधन झाल्यामुळें मला तेथें जावें लागलें, तेव्हां दैत्यांचा व माझा दारुण संग्राम झाला. मी चक्रानें दहा हजार त्याच्या भुजा छेदून टाकिल्या, शेवटीं शंकराच्या विज्ञप्तीवरून त्याचा जीव राखिला.तो बाणासूर अनिरुद्धाचा सासरा व मदनाचा व्याही होय.त्यानें अश्व धरल्यास तो शरीरसंबंध न मानून दारुण युद्ध करून अश्व देणार नाहीं. आपण आप्तसंबंधानें मागावें तर स्वधर्म भ्रष्ट होतो !

असें बोलत असतां नगर दिसलें. अश्व नगरद्वारांत जातांच बाणासुराच्या सैन्यानें धरिले. तेथें दोन अक्षौहिणी पांडवदळांचें व चार अक्षौहिणी दैत्यसैन्याचें चार घटिका युद्ध होऊन पांड-

वांचा पराजय झाला. सेवकांनीं अश्व धरून राजाजवळ नेले. बाणासुरानें पत्रिका वाचून धर्माचे अश्व जाणून ह्मटलें-नरनारायण घरीं आल्यामुळें जन्मसार्थक झालें. पण मन संशयांत पडलें. तेव्हां कुंभक प्रधानास ह्मणाला–हे धर्मराजाचे अश्व ! त्यांचा सहाय्यकर्त्ता श्रीकृष्ण,तो आमचा सोयरा होतो, प्रद्युम्न व्याही व अनिरुद्ध जांवई,त्यास कन्यारत्न उखा दिली आहे. आतां युद्ध न करावें तर स्वधर्म भ्रष्ट होतो, करावें तर सोयरे तुटतात याचा विचार काय करावा? प्रधान ह्मणाला–धर्मभ्रष्ट झाल्यानें नरकीं पतन होतें तसें सोयरेपण तोडल्यानें होत नाहीं. क्षात्र धर्मास आप्त संबंध मुळींच नाहीं, यास्तव युद्ध करावें.

असें ऐकतांच बाणासुरानें दळ सिद्ध करविलें. दोनशें कोटी हत्ती, शंभर कोटी अश्व, पन्नास कोटी रथ, असंख्य पायदळ व खड्गधर व त्रिशूळधर एकेक कोटी, मुद्गल, पट्टीश, पाश, तोमर, गदा, परिघ, फरशु, कुंत यष्टिका, धारक. एकेक कोटी, वेत्रधर साठहजार, स्तुतिकार एक लक्ष, इतक्या सैन्यांसह बाणासुर रणांत आला. चतुःसमुद्रासारखें पांडवदळ पाहतांच दैत्यांचें मन भय पावलें; दोन्ही सैन्याची मिळवणी होऊन खणाखणी सुरू होणार तोंच तेथें नारदमुनि आला. कृष्णानें बसावयास आसन देऊन सर्वांनीं वंदन केलें. मग नारदानें ही तयारी कशाकरितां ह्मणून विचारतांच बाणासुराबरोबर युद्धाची ह्मणून कृष्णानें सांगितलें. नंतर नारद ह्मणाला–आप्तपणा तोडून युद्ध करणें यांत गोडी नाहीं. शंकरपुत्र बाणासुर हा अनिरुद्धाचा सासरा व प्रद्युम्नाचा व्याही

त्याला काय वैरी मानतोस? आह्मांचें हेंच थोरपण कीं दुःखाचें हरण करावें; तें सोडून पीडा करणें याला काय ह्मणावें? बळसंपन्न बाणासुर तुह्मांस आटपणार नाहीं, हें मी पूर्वींच सुचविलें आहे. यास्तव अविचार करूं नकोस.

असें ऐकून कृष्ण ह्मणाला—तुह्मीं आमचे गुरु असून तुमचें वचन प्रमाण आहे. तरी आप्तपण न भंगून श्यामकर्ण प्राप्त होतील असें कार्यसाधल्यास मग युद्धाची जरूर काय? या करितां आपण बाणासुरास बोध करावा. मग नारद बाणासुराकडे गेला. त्याला पाहतांच कळलाव्या आला असें बोलून वीर कांपूं लागले. बाणासुरानें आसनावर बसवून कुशल विचारलें. नारद ह्मणाला—सैन्य सिद्ध कां केलें? दैत्य बोलला—पांडवांशीं लढण्याकरितां. नंतर नारद ह्मणाला—तुझ्यावर माझी ममता आहे ह्मणून हीत सांगतों एक, रागावूं नको. ज्या वेळीं तुझ्या साह्यास शंकर आला त्याला जर्जर करून हजार भुजांचा संहार केला. तेव्हां तो एकटाच रणावर होता, आतां असंख्य वीर आहेत, त्यानें शंकर इंद्र पृथ्वीचे राजे, दुंदुभी सारखा दैत्य त्यांस जिंकलें! तूं ह्मणशील माझा कृष्ण सोयरा आहे पण त्याचा प्राण पार्थ आहे, त्या प्राणावर आल्यावर कोण ओळखील? तरी कृष्णार्जुनांस भेटून श्यामकर्ण द्यावे आणि आपलें कुळ वांचवावें. हा विचार बाणासुरास मानवला. परंतु त्याचे लवणासुर व दवणासुर पुत्रांस आवडलें नाहीं, ते ह्मणाले—अश्व द्यावयाचे नाहींत व भेटावयाचेंहि नाहीं. आह्मीं युद्ध करूं. हिरण्यकश्यपूचा पुत्र

प्रल्हाद, त्याचा विरोचन, त्याचा बळी जन्मला, त्यानें देवाला दारांत द्वारपाळ केला त्याचा पुत्र तूं निर्बल झालास? तूं शिववरदी असून धर्मयुद्ध नको ह्मणतोस ? स्वधर्मत्यागानें पाप लागेल. त्यांस बाणासुर ह्मणाला—तुमचा विचार खरा, पण ते साक्षात् नरनारायण आहेत, युद्ध केल्यानें उभयतांचा नाश होऊन पार्थासच यश येईल. मग त्यांनीं पांडवसैन्य पाहतांच भय प्राप्त होऊन जनकाचा विचार मान्य केला. पुढें बाणपुत्रांस नारद घेऊन जाऊन सख्य करून, श्रीकृष्णादिक बाणसदनास येतील.

# अध्याय ८४ वा.

## बाणासुरआख्यान.

बाणासुर नारदास ह्मणाला—आतां उशीर न करितां दोघां पुत्रांस व प्रधानास घेऊन भेटीस जावें. नारद बरें आहे असें सांगून एक अक्षौहिणी सैन्यासह प्रधान व राजपुत्र भेटीस निघाले. नारद पुढें जाऊन कृष्णार्जुनांस भेटून सर्व वृत्तांत निवेदन केला. तो ऐकतांच यानें मरण निवारिलें असें समजून समाधान पावले. नंतर पार्थआज्ञेनें सभास्थान सुशोभित करून, बभ्रुवाहन, व वृषकेतू सैन्यासह सामोरे पाठविलें. त्यांच्या परस्पर भेटी होऊन समाधान पावले. मग सभास्थानीं येतांच सर्वांच्या प्रेमपूर्वक भेटी झाल्यावर प्रधानानें श्रीकृष्णाची स्तुति केली. ती ऐकतांच श्रीकृष्णास संतोष झाला. प्रधानानें प्रार्थना केली कीं, देवा! बळीसुताची इच्छा आहे कीं, परिवा

रासह सदनीं येऊन मला धन्य करावें. जे चरण जनकाच्या माथ्यावर दिलेत ते दाखवून मला पित्याप्रमाणें कृतार्थ करावें. असें ऐकून कृष्णानें बरें आहे ह्मणून सांगितलें आणि प्रधानास ह्मणाला–मला ज्याही प्रेमभावानें बोलावितआहे त्याची उपेक्षा मी करणार नाहीं. भक्तकार्यापुढें वडील बंधूची चाड व स्त्रीची भीड ठेवून मला जीवित गोड वाटत नाहीं. बळरामास दोषी करून तीर्थास पाठविला व नानायुक्तीनें पांडवांचें रक्षण केलें. कृष्णाहातीं शस्त्र धरवीनअसा भीष्मानें पण केला होता व माझा शस्त्र धरणार नाहीं असा होता, तेथें मी लटकेपणा घेऊन भक्तास सत्य केला. लक्ष्मी चरणसेवेस लागली पण मी गोपाळांस खांद्यावर घेऊन कुंजवनांत क्रीडा केली. ब्रह्मदेवास कर्मांत गोंविला बळीचा द्वारपाळ झालों, जन्मापासून पांडवांच्या हातींत सांपडलों, त्यांच्या कार्यास कुटुंब सोडून धांवत येतों, मग सर्वांस नगरांत जाण्याची आज्ञा केली. नंतर सर्व वीर उभे राहून ह्मणाले जिकडे हा जीव जाईल तिकडे गात्रें जातील मग पार्थानें बाणपुत्रांस व प्रधानास वस्त्रालंकार देऊन गौरविलें. कृष्णानें प्रधानास सांगितलें– तुह्मीं पुढें चला, आह्मीं परिवारासह मागून येतों.ते तिघे नगरांत जाऊन बाणासुरास सर्व वृत्तांत कथन केला आणि ह्मणाले– जे सुख ब्रह्मदेवास मिळत नाहीं तें आह्मांस मिळालें. धन्य आमचे नेत्र व धन्य ती उखा भगीनी? ज्यांनीं कृष्णवदन पाहिलें. पुत्राचें वचन ऐकतांच दैत्य संतोषानें फुगून, पुरोहितास राणीस कळविण्यास सांगून कृष्ण सोयऱ्याकरितां षड्रस अन्नें निर्माण करण्यास सांगितलीं. पुरोहि-

तानें मागतांच गण्यांस हर्ष होऊन कोण कोण येत आहेत ह्मणून विचारिलें. तो ह्मणाला–कृष्ण, त्याचा मित्र अर्जुन, व्याही प्रद्युम्न, जांवई अनिरुद्ध व चंद्रहासादिक राजे येत आहेत. पक्वान्नें सिद्ध होतांच पुरोहितानें राजास कळविलें, नंतर बाणासुर सैन्याची तयारी करून सामोरा जातांच नारदानें श्रीकृष्णास बाणासुर आल्याचें कळविलें बाणासुरानें नारायणास पाहतांच रथाखालीं उतरून चरण धरले व हृदयांत ध्यान रेखीलें. कृष्णानें त्यास आलिंगन दिल्यावर सर्वांच्या भेटी झाल्या. कृष्णानें दुंदुभीपुत्र दाखवून त्याचें आख्यान बाणासुरास सांगितलें. बाणानें हे भगीनी पुत्र असें बोलून त्यांस क्षेमालिंगन दिलें. मग दैत्यानें प्रार्थना केली कीं, आतां भोजनास चला व पंक्तिलाभ द्या. कृष्ण ह्मणाला– माझ्यावर शंकर रुसेल, यास्तव त्यास घेऊन येतों. तुह्मीं पार्थादिक घेऊन चला. कृष्णाज्ञेनें बाणासुर सर्वांस घेऊन चालला. इकडे नारदास पाठवून कृष्ण शंकराची वाट पहात राहिला. पुढें शंकर व कृष्ण नगरप्रवेश करतील व देवभक्तांचें भोजन होईल.

# अध्याय ८९ वा.

## बाणासुरआख्यान.

नारद कैलासास जाऊन शिवपार्वतीस वंदन करितांच शिवानें कोठून आगमन झालें ह्मणून प्रश्न केला, तेव्हां नारदानें बाणासुराचा वृत्तांत सांगून. पांडवांच्या श्यामकर्णा-

निमित्त भगवंत युद्धास सिद्ध झाल्याचें कळवून उभयतांचें समाधान करून परस्पर भेटी केल्या व पार्थादिक पुढें पाठवून कृष्ण तुमची वाट पाहात आहे असें सांगितलें. तें ऐकतांच शिवानें नंदीस आणून गणांसह जाण्यास निघाला. तेव्हां पार्वतीनें ' मीही बाणाचें नगर पाहण्यास येतें ' असें बोलतांच तिलाही बरोबर घेऊन शंकर शोणितपुरास आला. बाणासुरानें शंकराचे पायांस मिठी घालून सर्व वृत्तांत कथन केला आणि श्रीकृष्ण तुमची वाट पाहात आहे असें सांगितलें. मग पार्वतीस वंदून वीरभद्रादिकांस नमन करून शिवाची स्तुति केली.

शंकर आल्याचें श्रीकृष्णास कळतांच, सैन्यांसह भेटीस गेला. उभयतांच्या परस्पर प्रेमभेटी झाल्या. मग बाणासुरानें प्रार्थना केली कीं, आतां कृपा करून लौकर चलावें व प्रसाद द्यावा. तेव्हां शंकर नंदीवर बसून व कृष्ण रथारूढ होऊन सर्वांसह मोठ्या वाद्यसमारंभानें बाणसदनास चालले. तो सोहळा पाहण्यास देवांच्या विमानांची दाटी झाली. पृथ्वी जिंकली तो युद्धाचा वृत्तांत कृष्णानें शंकरास सांगितला. नगरांतील स्त्रिया श्रीहरीस खिडक्यांतून तन्मयरूपी होऊन पाहावयास धांवल्या. बाणासुराचें भाग्य ह्मणून असा समारंभ त्याच्या घरीं झाला. बाणासुरानें नगर शृंगारून सभामंडपास अवर्णनीय शोभा आणिली होती. सभामंडपाजवळ येतांच सर्वांनीं आपापलीं वाहनें सोडून आंत प्रवेश करितांच दैत्यानें सर्वांस दिव्यासनावर बस-

त्रिलें. हरिहारांस पूज्यस्थानीं पाहतांच पार्थादिकांनीं लोटां-
गणें घातलीं. शिवानें पार्थास पोटाशीं धरून बा किरीटी !
तुला फार श्रम झाले असें ह्मटलें. हरिहरांनीं उठून सर्वांस
आलिंगनें दिलीं. शंकर राजांस ह्मणाला—धन्य तुमचें जी-
वित्व ! तुह्मीं स्वार्थप्रपंचाचा त्याग करून धर्मकार्यीं मन
लाविलेंत ! श्रीहरि तुह्मांस बरोबर फिरवून संकटें निवा-
रतो. हा मला बरोबर नेत नाहीं. असें शंकर बोलतांच
राजे कर जोडून ह्मणाले—भक्तप्रिया ! तुह्मांस पाहतांच
आमचा उद्धार झाला.

नंतर बाणास्त्रियांनीं पार्वतीस नमस्कार करून सिंहास-
नावर बसवून पूजा केली. मग बाणानें विनंती करतांच
सर्वजण स्नानास उठले. अंगास सुगंधीं तेलें लावून स्नानें
होतांच, पितांबर नेसून केसरी गंध व चंदन लेप करून
पुष्पमाळा अर्पण केल्या. नंतर रत्नखचित ताटें मांडून बाण
स्त्रियांनीं पक्वान्नें वाढिलीं. भवानीसही ताट वाढून हजार
स्त्रिया जवळ सेवेंत राहिल्या. बाणासुरानें आतां सावकाश
भोजन करा ह्मणून प्रार्थना केली. भोजनें झाल्यावर परिमळ-
द्रव्यें व तांबूल विडे दिले सभास्थानीं नृत्य गायन सर्वांच्या
मनाचें रंजन केलें.

मग राजानें प्रधानाकडून अमूल्य वस्त्रालंकार आणवून
हरिहरांजवळ ठेविलें. नारदानें प्रथम शिवपार्वतीस गौरवि-
ण्यास सांगितलें. शंकर नारायणास ह्मणाला—आधीं तुह्मीं
स्वीकार करावा. हरि ह्मणाला असें कसें होईल ? नंतर

यादवांनीं पर्याय काढिला कीं—आधीं प्रद्युम्न अनिरुद्ध यांचा गौरव करून मग राजे, पार्थ ! त्यानंतर शंकर व शेवटीं आह्मांस द्यावे. त्याप्रमाणेंच सर्वांचा गौरव केला. नारायणानें बाणास अमूल्य वस्त्रें दिलीं. बाण शंकरास ह्मणाला—माझ्या पोटीं उखा येऊन सोयरा हृषीकेशी झाला. हेंच मला जन्मो-जन्मीं द्यावें. मग अश्व पार्थाजवळ देऊन, लवणासुर व दवणा सुरास आज्ञा केली कीं, तुह्मीं दहा अक्षौहिणी सैन्यासह पार्थाबरोबर जावें. कृष्णार्जुन बाणपुत्रांस घेऊन निघाले व शिव-पार्वती कैलासीं गेलीं. हें आख्यान जे श्रवण पठण करतील, ते अंतीं शिवपदास जातील. पुढें अश्व किष्किंधेस जातांच वानर धरतील व तुंबळ युद्ध होईल.

# अध्याय ८६ वा.

## सुग्रीवपुत्रआख्यान.

मग दोघे श्यामकर्ण वनोपवनें उल्लंघन करित दक्षिणेकडे चालले असतां वीस योजनें विस्तीर्ण एक रम्य नगर लागलें. तें पाहतांच पार्थानें चंद्रहासास तें कोणाचें नगर व येथील राजा कोण ह्मणून प्रश्न केला. चंद्रहास ह्मणाला—पूर्वीं येथें वानरांचा राजा सुग्रीव राहात होता. त्याचा स्वामी श्रीराम असून वानरसैन्य अठरा पद्में आहे वानरांनींच रामास साह्य करून शिळासेतु बांधून सीताशुद्धि केली व लंकेचा विध्वंस करून रावणास मारिलें. त्याचा प्रधान मारुती हा सांप्रत तुमच्या रथध्वजाग्रीं बसलेला आहे. त्या सुग्रीवाचा बारा

हजार हत्तींचें बळ असलेला द्विरद नामक पुत्र तेथें राज्य करितो. त्यानें श्यामकर्ण धरल्यास प्रचंड युद्ध होऊन सर्वांचे प्राण जातील.

इतक्यांत अश्व नगरांत जातांच, सेवकांनीं धरून राजाजवळ नेला. त्यानें पत्रिका वाचून पाहिली. धर्मराजास गोत्रवध घडला ह्मणून अश्वमेधार्थ श्यामकर्ण सोडिले आहेत, त्यांच्या रक्षणास अर्जुन सर्व राजांसह आहे. असें वाचून सेवकास अश्व बांधून ठेवण्यास आज्ञा दिली व आपणांस कृष्ण पांडवांचें दर्शन होईल असें ह्मटलें. कपिपाळानें वानरसैन्य सिद्ध केलें, तों पांडवसैन्य नगरद्वारांत येतांच, त्यावर वानर धांवत सुटले. त्यांस रथ अश्व गज शस्त्र यांचें कारण नव्हतें. पर्वत, वृक्ष, पाषाण, नखें, मुख, पुच्छ हींच त्यांचीं युद्धसाधनें, दोन्ही सैन्यें एकत्र मिळून दारुण युद्ध झालें. अठरा पद्में वानरांनीं अनेक प्रकारच्या मर्कटचेष्टा दाखऊन पार्थसैन्याचा संहार केला. कार्या कार्याचा विचार कोणास कांहीं सुचेना, तेव्हां पार्थ चंद्रहासास ह्मणाला आतां काय विचार करावा ? चंद्रहास ह्मणाला हे अनिवार वानर सर्वांचा संहार करतील, यास्तव युद्ध करूं नये. जर येथें आतां मारुती असता तर त्यानें वानरांस बोध करून युद्ध मिटविलें असतें.

असें ऐकून जन्मेजय मुनीस ह्मणाला–पार्थध्वजाग्रींचें स्थान सोडून मारुती कोठें गेला होता ? कृष्णहीजवळ असतां त्यानें यांची अपेक्षा कां केली ? मुनी ह्मणाला–त्यावेळीं दोघेही सैन्यांत नव्हते. किष्किंधेपासून एक कोसावर एक रमणीय

भाग होता, तेथें सुग्रीवाचे प्रीतीस्तव श्रीरामानें आत्ममूर्ती स्थापून ठेविली होती. तिच्या दर्शनार्थ कृष्ण व मारुती पार्थाच्या आज्ञेनें गेले होते. त्यांनीं श्रीरामदर्शन घेतांच, त्यांस तेथेंच समाधि लागली व पार्थाचीही आठवण विसरले.

इकडे रणांत वीर क्षीण झाल्यामुळें पार्थ, कृष्णाचें व मारुतीचें चिंतन करून धांवा करूं लागला. ते भक्तशब्द ऐकतांच दोघेही गजबजून श्रीरामास विनवूं लागले कीं, तुमच्या दासांनीं आमच्या पार्थास गांजलें. माझ्या भक्तांस जर दुःख झालें तर समाधिसुख काय करावयाचें ? भक्तकार्यापुढें मी जीवित व्यर्थ मानतों. असें बोलून रामपायीं मस्तक ठेवून दोघे रणभूमीस आले व पाहतात तों सर्व मृतप्राय पडले आहेत आणि पार्थ चिंतेंत बुडाला होता. त्याची चिंता दर्शन देऊन दूर केली. पार्थ कृष्णास ह्मणाला—तुझ्या वियोगानें ही व्यथा झाली होती. आतां कळिकाळ आल्यास मला चिंता नाहीं. अर्जुन मारुतीस ह्मणाला—वानरांनीं माझा घात केला, आतां तुला पाहिजे तसें कर. मारुती बोलला—या वानरांचा स्वभाव मला ठाऊक आहे हे काळासही आवरणार नाहींत. नंतर कृष्ण मारुतीस ह्मणाला तूं द्विरदास जाऊन बोध कर. जर तुझी नीति न ऐकतील तर मीं कोपून सर्वांचा लय करीन. मग मारुती द्विरदाजवळ जातांच सर्वांनीं नमस्कार करून कुशलक्षमालिंगन झाल्यावर मारुती ह्मणाला—तुह्मीं माझे आप्त व सुग्रीवाचे गणगोत, सर्वांनीं सुखरूप नांदावें यांतच मला सुख आहे पण तुह्मीं माझ्या स्वामीशीं [illegible] द्विरद ह्मणाला—तुमचा स्वामी कोणता व

मैत्री कशी झाली हें मला काय ठाऊक ? मारुतीनें सांगितलें— माझा स्वामी श्रीराम. तो कृष्णमूर्ती धरून अर्जुनाचा सारथी झाला. त्या अर्जुनानें माझा पण जिंकून मला ध्वजस्थान दिलें व त्याला संकट पडतांच युद्ध करावें अशी बोली झाली त्या पार्थानें शंकरासही जिंकलें ! तुह्मीं श्रीरामचिंतन करीत होतेत ह्मणून तुमच्या अपराधाची क्षमा केली, नाहीं तर त्या पार्थास तुह्मांस मारण्यास काय उशीर लागता ?

असें मारुतीचें वचन ऐकतांच सर्व थरथर कापूं लागले व ह्मणाले–आतां उभयतांचें कल्याण होईल असें करावें. मग मारुतीनें सांगितलें–श्यामकर्ण सोडून कृष्णार्जुनास शरण जावें. नंतर द्विरदानें श्यामकर्ण व वस्त्रें रत्नें द्रव्य चरणीं अर्पण करून सर्वांसह नमन केलें. कृष्णार्जुनास क्षेम देऊन सर्वांचा गौरव केला व अमृतदृष्टीनें कृष्णानें वीर उठविलें. पुढें अश्व जालंदर पुरास जातील, तेथें दारुण युद्ध होईल.

# अध्याय ८७ वा.

## चंद्रमौळीकथन.

पुढें अश्व उत्तर दिशेस चालले असतां, हिमाद्री पाठार लागलें, तेथील एक हजार योजनें विस्तीर्ण दुस्तर मार्ग मोठ्या कष्टानें लंघून सर्व वीर जालंदर नगरांत गेले, त्या छत्तिस गांव विस्तीर्ण अमरपुरासारख्या रम्य नगरांत दैत्यवंशीय चंद्रमौळी राजा दुंदुभीसारखा प्रबळ राज्य करीत होता; त्याला नारदानें चिडवून ह्मटलें–तला श्रीकृष्ण [illegible]

येत आहे. तरी वीर पाठवून त्याचें श्यामकर्ण धरून त्यासीं युद्ध कर, असें त्यास सांगून पार्थाजवळ धांवत येऊन ह्मणाला अरे मरावयास कां जातां ? पुढें चंद्रमौळी महायोद्धा तुमचा सर्वांचा एकच घांस करिल. याकरितां हस्तनापुरचा रस्ता धरा, असें नारद सांगत आहे तों चंद्रमौळीच्या वीरांनीं अश्व धरून राजाजवळ नेले व बांधून ठेविले. तें पाहून वृषकेतु क्रोधानें धांवत गेला. त्यावर दोन कोटी दैत्य येऊन सैन्याचा विध्वंस करूं लागले. तोंच बभ्रुवाहन धांवला. त्यानें दोन कोटी दैत्यांचा संहार केला. घायाळांनीं राजास सांगतांच, चंद्रमौळी सैन्यासह आला. बभ्रुवाहनाचें व त्याचें दारुण युद्ध होऊन बभ्रुवाहन खालीं पडला. पांडवसैन्य मागें फिरलें.

तेव्हां पार्थास कृष्ण ह्मणाला—आतां लौकर शरसंधान कर. दैत्यानें पार्थाचे एक कोटी बाण व्यर्थ दवडले आणि कृष्णास ह्मणाला—तूं उगाच कां आलास? आतां सर्व वीरांसह प्राणास मुकशील. असें ऐकून पार्थ खवळून दैत्यदळाचा संहार करूं लागला. सात दिवस घोर युद्ध होऊन दुंदुभीनें पार्थास जर्जर केलें. मारुती ह्मणाला—हा दुंदुभीच्या दसपट बलाढ्य आहे. हा सर्व सैन्य ग्रासील, याचा प्राणहर्ता कोणी वीर जन्मला नाहीं. मग कृष्ण पार्थास ह्मणाला—आतां आपलें विद्याबळ बाहेर काढ. अर्जुन जें जें संधान करी त्याचें दैत्य क्षणांत निवारण करी. त्या वेळीं अर्जुनासह सर्व भयाभीत झाले. दैत्य एक ओंठ भूमीस व एक आकाशास लावून पार्थसैन्य गिळूं लागला, [illegible] सर्व वृत्तांत कथन करून

ह्मणाला-तुझ्या पुत्राचा नंदन यास ढेंकणासारखा मारिला, त्या तुला आज्याला उमनें घेतां येत नाहीं ? असें ऐकून सूर्य क्रोधानें रथांत बसून रणांत आला आणि पार्थास हांक मारून ह्मणाला-भिऊं नको, मी तुझ्या साह्यार्थ आलों. आपण तिघांनीं मिळून याचा संहार करूं. नंतर दैत्यानें उडी घालून तिघांची मुरकुंडी पाडिली. कृष्ण अर्जुन मूर्च्छित पडले व सूर्य पळून गेला. दैत्य जय घेऊन नगरांत आला.

एक प्रहरानंतर कृष्ण सावध होऊन मारुतीस व सर्वांस उठवून पार्थास ह्मणाला-आतां दैत्य मारावयास काय उपाय करावा ? अर्जुन ह्मणाला-तुझ्या श्वासांतून चार वेद निघाले. तुझी लीला ब्रह्मादिकांस कळत नाहीं, तो तूं आह्मांस विचार पुसतोस याचें कौतुक वाटतें. असें ऐकून कृष्ण क्षणभर ध्यानस्थ होऊन कपटानें दैत्यास मारावा असा विचार करून. ब्राह्मणाचा वेष घेऊन सभास्थानीं आला व आशिर्वाद देऊन कल्याण असो असें बोलला. तें ऐकतांच राजा साशंकित होऊन ह्मणाला-आपण कल्याण असो असें बोललेत त्या वचनाचा अभिप्राय काय ? ब्राह्मण ह्मणाला-माझें दर्शन ज्यास होतें त्याला पुनः जन्म नसून तो प्रपंच सुख संहारून निजध्यानीं लक्ष लावितो. तें सुख तुला प्राप्त होईल. ह्मणून माझें मुख बोललें. असें ऐकतांच दैत्यास आनंद झाला. मग दैत्यानें स्थान व येण्याचें कारण विचारिलें द्विज बोलला-मी द्वारकेंतील कृष्णशर्मा ब्राह्मण, पुत्र विवाहानिमित्त द्रव्य संपादण्यास चाललों असतां पांडव अश्वमेध करिताहेत असें

ऐकिलें. पण त्यांचे अश्व तुह्मीं धरलेत, सबब अश्वमेध राहिला व माझ्या आशेच्या भंग झाला, ह्मणून येथें आलों.

चंद्रमौळी ह्मणाला—आपली द्रव्यइच्छा मला कळवावी. ब्राह्मणानें ह्मटलें—माझें मंत्रपठण व विद्यागुण ऐकून द्रव्य द्यावें. नंतर मारक मंत्रपठण बोलून अक्षतां मंत्रून दैत्यमस्तकावर टाकतांच, सुदर्शनानें जीवनमुक्त करून दैत्यमंडळाचाही अंत झाला. तेव्हां तेथून कृष्ण पळून रणांत येऊन सैन्य जीवंत करून नगर लुटण्यास आज्ञा दिली. अशा प्रकारें दैत्य मारून संपदा लुटवून त्याच्या पुत्रास राज्यावर बसविलें. मग श्यामकर्णाची पूजा करून पुढें सोडिले ते हिमालयनगरीं आले.

# अध्याय ८८ वा.

## हिमगिरिसुत मैनाकआख्यान.

श्यामकर्ण जालंधरपूर सोडून हिमालयाचे बागेंत जाऊन उभे राहिले. तेथें हिमालयाचा पुत्र मैनाक दहा कोटी वीरांसह शिकारीस आला होता. त्याच्या सेवकांनीं अश्व धरून राजाजवळ नेले. त्यांच्या मस्तकावरील पत्रिका वाचून ह्मणाला—माझ्यासारखा बळी ब्रह्मांडांत कोण आहे ? मी पृथ्वीचे दैत्य देवेंद्र व राजे जिंकले ! माझ्या प्रतापाच्या ज्वाळेनें कूर्मराज संतापून देह शीतळ करण्यास उदकांत गेला. माझ्यापुढें हें त्रिभुवन मशकासारखें आहे तेथें अर्जुनादिक मोरींप्रमाणें समजावें. त्याला जरी कृष्ण साह्य असला तरी

मी भीत नाहीं, कृष्ण पार्थास जिंकून जीवंत घरास नेईन! असें बोलून कृष्णार्जुनाची वाट पहात उभा राहिला. तों वृषकेतु व बभ्रुवाहन काळासारखे खवळून शस्त्रास्त्रें सोडून मैनाकाच्या वीरांचा संहार करते झाले; तेव्हां मैनाक क्रोधानें बभ्रुवाहन व वृषकेतुवर बाणांचा वर्षाव करून दोघांस मूर्च्छित पाडून पांडवसैन्य मारित चालला व रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या; चंद्रहासादिकांचें बळवैभव हरण केलें.

इकडे नारद हिमगिरीजवळ जाऊन, ह्मणाला-कृष्णअर्जुनांचें व मैनाकाचें युद्ध होऊन, त्यांनीं तुझ्या पुत्रास जर्जर केलें. तरी धांवत येऊन पुत्रास सोडीव. तें ऐकतांच हिमगिरी सैन्यासह रणांत आला. तिकडे मैनाकाचें व कृष्णार्जुनांचें युद्ध चाललें होतें. त्यानें पृथ्वीचे राजे गतप्राण केले. घोर रण माजून कबंधें नाचूं लागलीं. इतक्यांत नारद पार्थाजवळ येऊन हिमगिरी आल्याचें सांगतांच, पार्थ भय पावला. मग कृष्ण मारुतीस ह्मणाला-तूं आतां शिष्टाईस जा. पुढें युद्ध केल्यास पर्वताचा जांवई शंकर युद्धास येईल. नंतर मारुती हिमगिरीजवळ गेला. त्यास पर्वतानें नमस्कार केला आणि ह्मणाला-कपीश्वरा ! कां येणें झालें, तें मला सांग; मी त्याप्रमाणें आचरण करीन.

मारुती ह्मणाला-तुझें भाग्य होय. गौरीसारखें रत्न पोटीं येऊन शंकर जांवई झाला. तुझे जन सुखानें नांदावें व कल्याण असावें असें मी इच्छितों. तरी अनंतकोटी ब्रह्मांड-

नायक श्रीकृष्ण तो पार्थाचा सारथी झाला. त्या पार्थानें शंकर इंद्र यांस जिंकून, माझ्यासारख्या रामदूतासही ध्वजाग्रावर बसविलें! त्या पार्थाचे श्यामकर्ण तुझ्या पुत्रानें धरून भांडत आहे तरी तो मरण पावेल, याचा विचार कर. तूं शिवाचा सासरा व तुझा ज्येष्ठ मैनाक अशा संबंधामुळें श्रीकृष्ण उगाच आहे. जों अर्जुन सक्रोध झाला नाहीं तोंच श्यामकर्ण सोडून शरण जाऊन आत्मरक्षण कर. मारुतीचे वचनानें पर्वत संतोषित होऊन. श्यामकर्ण घेऊन सहपरिवारासह भेटीस घेऊन दुरूनच नरनारायणास लोटांगण घातलें. त्यास कृष्णार्जुनांनीं क्षेमालिंगन दिलें. बाप शरण आला असें पुत्रानें पाहतांच, धांवत येऊन त्यानेंही दोघांस वंदन केलें. चंद्रहासादिकांस कृष्णानें उठवितांच, सर्वांच्या पर्वतावरोबर भेटी झाल्या. एकमेकांस वस्त्रेंभूषणें रत्नें दान दिलीं, येथें युद्ध समाप्त झालें. आतां अश्व मागें परतून उत्तरसागरास जातांच, ऋषींची भेट होईल. त्यास हस्तनापुरास यज्ञसमाप्तीस नेतील.

# अध्याय ८९ वा.

## बकदाल्भ्याख्यान.

हिमालयाजवळ कृष्णार्जुन गौरव पावून चार दिवस तेथें राहून पुढें श्यामकर्ण सोडले. त्यांच्या मागून पृथ्वीचे राजे, मैनाक, आदिकरून सैन्यासह मोठ्या वाद्यगजरानें हरिहर नर एका आसनीं बसून उत्तर समुद्रावर आले.

तेथील अगाध सिंधुजळ उल्लंघून अश्व पलीकडे गेले. पार्थादिक तीरावर येऊन उभे राहिले. त्यांस श्रीकृष्ण ह्मणाला-हंसध्वज, पार्थ, प्रद्युम्न बभ्रुवाहन व मयुरकेतु यांचे रथ पाण्यावर चालतात. मग फक्त पांच सारथ्यांस बरोबर घेऊन श्रीकृष्ण पुढें गेला. तेथें एक बेट लागलें त्यांत बकदाल्भ्यमुनि पद्मासन घालून ध्यानस्थ बसला होता, त्यानें वटपत्र शिरीं धरलें होतें. शरीर अशाश्वत समजून पर्णकुटीसुद्धां केली नव्हती. त्याच्यावर वारुळें वाढून जटेंत पक्ष्यांनीं घरटीं केलीं होतीं ? अशा त्या मुनीस पाहतांच, पांचजणांनीं रथाखालीं उतरून दंडवत घालून जयजयकार केला. मुनि नेत्र उघडून पाहूं लागला, तों श्रीकृष्णचरण पाहून समाधान पावला व ह्मणाला-जो त्रिभुवनाचा गोसावी, ज्याची गोडी अनुभवी घेतात तो येथें आला ! आतां तनुगांवीं राहणें अयोग्य होय.

असें ऐकतांच पार्थ पुनः नमस्कार करून ह्मणाला-महाराज ! आपण मंदिर न करितां वटपत्र मस्तकीं कां धरलेंत ? तुमच्या मस्तकावरील वृक्षलतांत अनंत पक्षी घरटीं करून क्रीडा करीत आहेत व मृग सर्पही वास करितात ! असें ऐकून मुनि हांसून ह्मणाला-घर न करण्याचें कारण सांगतों ऐक-स्त्रियेमुळें क्लेशभोग व अधःपतन प्राप्त होतें. उत्तम साधन सोडून अधर्मानें कष्ट करून द्रव्य मिळवून स्त्री करावी. ती कर्कशा मिळाली असतां तेथेंच नरकदशा भोगावी लागते. तापट स्वभावाची मिळाल्यास आईबाप बंधुजनांची आस तुटून त्यांस घरीं येऊं देत नाहीं. तिच्याच करितां घर करून

कन्यापुत्र झाल्यावर, त्यांच्या लग्नाकरितां भिक्षा मागून क्लेशानें द्रव्य मिळवावें, तें खर्चण्यास जिवावर येतें. लग्न केल्यावर तिचें गांजणें आहेच. कदाचित् कन्या पुत्र मेल्यास त्यांचें दुःख किती मानावें ? त्यांच्या शोकानें स्त्रीस मरण आलें मग घरास काय करावें ? घराचाही नाश झाल्यास त्या दुःखानें मरण येणार ! मग दुसऱ्या जन्मीं दुसरी स्त्री करून तिच्यासारखें वागावें. मग तिला पुत्र होतांच भावांत मत्सर वाढून ती करकर सोसावी. पुत्रांच्या कर्कशा स्त्रियांनीही वृद्धापकाळीं लौकिक तमाशा दाखवावा. अशा दुःखसागरांत सुख तिळभर नाहीं. उदरनिर्वाहासाठीं व्यवहार करावा. तेथें आत्मविचार कशाचा ह्मणून ? मी गृहाचार केला नाहीं, माझी स्त्री, माझें शेत, घर, पुत्र, बंधु, लेकी, नातु पशु जन आहेत. पुत्रांस कन्या कोण देईल, पुत्र नातु कधीं होतील, लग्नें कशीं होतील, अशा गृहचिंतेंत भगवंताची आठवण होत नाहीं. ह्मणून देह क्षणभंगुर समजून स्त्री, घर केलें नाहीं.

नंतर अर्जुन ह्मणाला—तुह्मांस वटपत्र धरून दिवस किती झाले ? मुनि बोलला—आयुष्याची गणती नाहीं तरी अनुमान सांगतों. मार्कंडेय,लोमेशादिकांसारखे अनंत ऋषि होऊन गेले. ब्रम्ह्याच्या अंतकाळीं हें जग जलमय होऊन वटवृक्ष उत्पन्न होतो, त्याच्या पत्रावर बालक जन्मून पदांगुष्ठ मुखांत घालून आक्रोशानें रडतें. त्याचें मला दर्शन होतांच मी साग रांत बुडी देतों. तुह्मीं स्वदेश सोडून येथें कां आलेत ? ५

जळांतून पुढें कसे तराल ? या वटपत्रीं कृष्णाचें दर्शन होऊन पुनःपुनरागमन झालें, तरी मी याशीं कांहीं मागितलें नाहीं. आतां हा कृष्ण तरुण होऊन लक्ष्मीवंत झाला, याशीं मी काय दान मागूं ? तरी धर्मदर्शन करावें. असें बोलून कृष्णार्जुनांस व चौघांस मुनीनें आलिंगन दिलें आणि ह्मणाला-कृष्णा ! तुझें दर्शन झालें तरी स्त्री पुत्र धन न मागतां काळ क्रमण्याकरितां वटपत्र मस्तकावर धरलें. असें ऐकून कृष्णानें स्तवन मांडलें. तो ह्मणाला—तूं साक्षात् पुराणपुरुष असून तूं वीस मुखें ब्रम्ह्याचीं पाहिलींस ? स्वामी ! तव प्रसादानें धर्मयाग सफल होवो. मुनी बोलला-तूं माझ्याठायीं गर्वभार ठेविलास पण तो मी धरला नाहीं. पूर्वीं ब्रम्ह्यास गर्व झाला, तोही मी कसा तोडला ऐकः-

मी ब्रह्मकल्पीं राहतों हा मला अभिमान झाला, तेव्हां ब्रह्मदेव चोविस वर्षांचा होता. मग तो मजजवळ येऊन ह्मणाला-अनुष्टान कां करितोस ? मी प्रसन्न झालों वर माग. मी त्यास ह्मणालों-तुझें येथें काय कारण आहे ! तुझ्यासारखे ब्रह्मे मी अनंत पाहिले ! तूं मला प्रसन्न होऊन काय देणार ? असें बोलतांच प्रचंड वायु सुटून पृथ्वी आकाश व्यापून आह्मां दोघांस अन्य ब्रह्मांडांत उडविलें. तेथें देव ब्रह्मांडफळाचा वृक्ष होऊन, त्या फळांत आह्मां दोघांस घातलें. तो चराचर दृष्टीस पडलें. तेथें आठ मुखांचा ब्रह्मा आह्मांला बोलावून, बाळांनो ! यावयाचें कारण काय ह्मणून विचारूं लागला. त्यास ब्रह्मदेव ह्मणाला-मी ब्रह्मा

व हा बकदालभ्य माझा शिष्य ! तेव्हां अष्टवदन ब्रह्मा गर्वानें बोलला—मी गुरुशिष्यप्रतिष्ठा जाणत नाहीं. तुह्मीं माझे शिष्य होऊन मला शौचार्थ पाणी माती आणून देत जा. इतक्यांत पुनः वायु सुटून आह्मां तिघांस ब्रह्मसदनास उडविलें. तेथील लोक हांसून ह्मणाले—तुह्मीं कोठचे कृमी ! अष्टवदन बोलला—माझें नांव ब्रह्मदेव, आह्मीं ब्रह्मलोकाहून आलों. तें ऐकून ते लोक ह्मणाले—असें बोलूं नका. येथें सोळा मुखांचा ब्रह्मा आहे तो तुह्मांस ताडण करील. त्यांनीं सोळा मुखांचा ब्रह्मा दाखवितांच; तो हांसून ह्मणाला—हे जीव कोठून आले, यांचीं नावें काय ? असें सोळा मुखाचा ब्रह्मा बोलतांच, पुनःवाऱ्यानें चौघांस उडवून बत्तीस मुखांच्या ब्रम्ह्याजवळ नेलें. तोही मी ब्रह्मा थोर म्हणतांच, पुनः वायूनें चौसष्ट मुखाच्या ब्रम्ह्याजवळ पांचा जणांस नेलें. तेथून एकशें अठावीस मुखांच्या ब्रम्ह्याजवळ उडविलें. मग दोनशें छप्पन्न मुखांच्या ब्रम्ह्याजवळ गेलों, पुढें हजार मुखांचा ब्रह्मा पाहतांच आमचें मन शांत झालें. ज्याला तिळमात्र गर्व नाहीं अशा त्या ब्रम्ह्यानें आमचें आदरातिथ्य करून नेत्र झांकावयास सांगतांच आह्मीं पूर्वस्थानीं आलों. ह्मणून अल्पविद्या अल्प धन यांस अभिमान असून सर्व गुण संपन्नास नसतो. याकारितांच मी अभिमान सोडून समुद्रांत राहून श्रीकृष्णदर्शनानें आंत बाहेर शांत झालों. असें बोलत आहे तोंच श्यामकर्ण आले. मग पाल्खींत मुनीस

यास पडें न्हालें

# अध्याय १० वा.

## दुःशीलाकथाकथन.

पुढें श्यामकर्ण जयद्रथाचे नगरांत जातांच, त्याचे पुत्रांनीं दूतद्वारें पार्थाची वार्ता ऐकिली. तेव्हां आपल्या बापाचा अंतकरणारा अर्जुन आला, हें ऐकून ते कंपायमान होत्साते भीतीनें निचेष्टित पडले. तोंच त्यांची आई दुःशीला तेथें धांवत आली. तिनें कृष्णास पाहतांच म्हणाली—हे अनंता! तार तार! माझा भर्ता अर्जुनानें मारिला आणि पुत्र तेही निमाले! तरी तुला शरण आलें आहे. असें बोलून साष्टांग नमन केलें तिला अर्जुनानें उठवून वंदन करून ह्मटलें—तुझ्या पुत्रानीं भीतीनें प्राण सोडिले, त्यांत माझा अपराध काय! सभेंत पंडित आल्यास मूर्खास मोहन पडतें, तो काय पंडितांचा दोष? तसाच न्याय येथें झाला. भगिनी! माझा अपराध असेल तर क्षमा करून एक लक्ष रथाश्वगज तुला देतों. आणि तुझ्या वैऱ्यांस जिंकून तुझें राज्य तुला देतों. असें ऐकतांच ती रुदन करूं लागली.

मग कृष्णास नमस्कार करून ह्मणाली—दुखितांच्या हृदयांत तूं राहतोस, द्रौपदीनें स्मरण करितांच तिचे दुःखाचें हरण केलेंस, तसेंच सर्वांचें करतोस. तरी माझें वचन ऐक मी पतीहीन झालें व पुत्रही मरून गेले. अर्जुन मला बहिण मानतो तरी मला यज्ञास घेऊन जा. पतिपुत्रांच्या दुःखपर्वतामुळें हा बंधु न्यावयास लज्जा पावतो. मला गजाश्वांचें कारण नाहीं असें बोलून कृष्णचरण अश्रूंनीं धुतले.तिचें दुःख पाहून

कृष्ण पार्थास घेऊन तिच्या घरीं गेला. सभास्थानीं जाऊन मृतपुत्रांस अमृतहस्त लावितांच ते सजीव होऊन, केशवाची स्तुति करूं लागले व अर्जुनमामास वंदन केलें. पार्थानें त्यांस मांडीवर घेतलें. मग दुःशीलेस अर्जुन ह्मणाला—वर्ष भरतांच आह्मीं नगरांत येऊं, तरी तूं आतां पुत्रांसह यज्ञोत्सव पाहण्यास हस्तनापुरास जा. नंतर तिनें कृष्णार्जुनांचा गौरव केला व ह्मणाली—तुह्मीं माझे पांच बंधु व श्रीकृष्ण समर्थ असतां मला काय उणें आहे. तेथून श्यामकर्ण सोडून कृष्णार्जुन पुढें चालले भगिनीस अपार द्रव्य देऊन तेथें रक्षक ठेवून, दुःशीला पुत्रांसह हस्तनापुरास गेली. पुढें वर्ष पुरें होऊन श्यामकर्ण हस्तनापुरास जातील.

# अध्याय ६१ वा.

## श्रीकृष्णाचें हस्तनापुरीं गमन व धर्मभेट.

श्रीकृष्ण वर्षांत जाणून, श्यामकर्ण लीलेनें धरून ह्मणाला—हे अश्व महत्भाग्यानें पृथ्वीपर्यटन करून आले आहेत, तरी तूं सर्व राजांसह धर्मदर्शनास सावकास ये. श्यामकर्ण पुढें सोडून वाद्य नृत्य गजरांत अनिरुद्ध प्रद्युम्न वृषकेतु बभ्रुवाहन नीलध्वज मयुरकेतु सात्यकी कृतवर्मा अनुशाल्व हंसध्वज यौवनाश्व चंद्रध्वज इत्यादि राजे सेनापतीसह सुवेष धारण करून तेलदीप सुगंध लावून, रात्रीच्या वेळीं नगरप्रवेश करावा. मी पुढें धर्मदर्शनास जातों. असें सांगून कृष्णानें धर्मदर्शन घेतलें. धर्मानें प्रीतीनें वंदन केलें. मग

कृष्ण सन्मुख बसून ह्मणाला-पार्थ सर्व राजांसह पृथ्वी जिंकून सुखरूप आला. त्यानें यौवनाश्व, नीलध्वज. त्याचा पुत्र वीरध्वज, सुधन्वा, सुरथ, यांस प्रयत्नानें मारिलें. पुढें माणिपुरांत पुत्राचें युद्ध होतांच पार्थशीर छेदलें गेलें. मग उलूपीनें माणि आणवून पार्थसुतादिक समुदाय उठवून बभ्रुवाहनासह नगरांत गमन केलें. तेथून मयुरकेतुचें नगर दाखवून ताम्रध्वजानें युद्ध केलें. त्यानें सर्वांस जिंकलें. मग मयुरध्वजाचें शरीर कर्वतलें. त्यानें यज्ञ मांडला होता, त्याचा श्यामकर्ण व मयुरध्वजास घेऊन पुढें सारस्वतपुरांत वीरवर्म्याशीं युद्ध झालें. त्यास जिंकून कुंतलपुरांत चंद्रहासासीं लढून अश्व उत्तरसमुद्रास, तीनशें मुखांचा व हजार भुजांचा दुंदुभी दैत्य मारिला. त्याचे पुत्र व संपदा हरल्यावर सैन्यपाळ भेटला. तेथें भानुकांत चंद्राकांत शरण व शेवटीं सैन्यपाळ शरण आला. पुढें सिंहध्वज दैत्याचा वृषकेतु नंदनानें प्राण घेतला. नंतर शोणितपुरांत बाणासुर भेटून त्याचे पुत्र बरोबर घेतले. मग किष्किंधेस सुग्रीवपुत्र द्विरदानें युद्ध करितांच मारुतीनें सख्य केलें. पुढें सह्याद्रीचे पाठीवर जालंधर नगरीस चंद्रचूडास विप्रवेष घेऊन मारला. मग हिमाद्रीपुत्र मैनाकाचे युद्धांत मारुतीनें मैत्री करविल्यावर उत्तर समुद्रांतून अश्व तरून जातांच बकदालभ्यमुनीच्या दर्शनास पांच रथांसह गेलों व ऋषीस यज्ञास आणिलें. अशा प्रकारें कल्याणयुक्त अर्जुन आतां धांवत येईल.

नंतर भीम नकुळ सहदेव कुंती द्रौपदी सुभद्रा गांधारी धृत

राष्ट्र विदुर आदिकरून कृष्णास भेटले. मग भीमाला हातांत धरून कृष्णानें गृहप्रवेश केला. देव आल्याची बातमी सर्वांस कळली. रुक्मिणी, सत्यभामा, लक्ष्मणा, जांबुवंती आदि स्त्रियांनीं कृष्णवंदन केलें. सत्यभामा बोलली—अर्जुनानें तुह्मांसह श्यामकर्ण पाळिला. असे देशांतरांत फिरत असतां दुसऱ्या नारी मिळविल्या काय ? जशी पार्थानें वाटेंत प्रेमळा वरिली ! असें तिचें भाषण ऐकून कृष्ण हांसून भीमास ह्मणाला—या सत्यभामेचें भाषण तुझ्या मनास आलें काय ! पहा कशी नेत्रकटाक्षानें वक्र भाषण करते ती ! मी आतां वृद्ध झालों, इनें बाळपणींच्या चेष्टा आतां बोलाव्या. इतक्यांत तेथें धर्म येऊन आतां यज्ञोत्साह कर असें कृष्णास बोलला. कृष्ण ह्मणाला—तुह्मीं यज्ञमंडपीं आसन घाला, आह्मीं सर्वांनीं यज्ञकार्य संपादन करूं. नंतर सर्वांसह श्रीकृष्ण पार्थास सामोरा निघाला. हत्तींवर कुमारिकांच्या हारी बसवून त्यांच्या हातांत दुर्वाक्षता पार्थावर टाकण्यास दिल्या. सर्व नगर शृंगारून सुशोभित केलें व मोठ्या उत्साहानें सर्व जन नगराबाहेर येऊन पार्थाची वाट पाहात राहिले. देव विमानांत बसून कौतुक पाहूं लागले. पुढें सर्व जनांसह अर्जुन नगरप्रवेश करील.

# अध्याय ९२ वा.

## अश्वमेध, दांपत्ययोजना व अश्वस्नानवर्णन.

नंतर जेथें कृष्ण होता तेथें सर्व भूपांसह अर्जुन येऊन उभा

राहिला व कृष्णास पाहतांच रथाखालीं उतरून चरणांवर माथा ठेवून हात जोडून उभा राहिला.कृष्णसैन्य व पार्थसैन्य एकत्र मिळालें, धर्मराजाचें वैभव जें नरनारी अश्व गज; त्यांत अधोक्षजानें प्रवेशून तें तेजःपुंज केलें. पद्मनाभानें सर्व व्यापून सूर्यप्रभेस उणें आणिलें. तें पाहतांच राजे तटस्थ होऊन धर्मासारखा राजा व अशी संपदा त्रिभुवनांत नाहीं असें बोलूं लागले. सैन्य कोटी अक्षौहिणी किंवा हजार कोटी अक्षौहिणी याची गणती नाहीं. अशी ती सर्वसंपन्न व आधिव्याधीरहीत धर्मनगरीची कोण गणना करील? जेथें चांडाळादि रूपें नारायणाची दिसतात. अशा जणांचें वर्णन कोण पामर करील. तेथें अठ्यायशीं हजार ऋषि नांदत असून, होमधूम्रानें गगन कृष्णवर्ण झालें होतें, मंगळतुरांच्या ध्वनीनें दाही दिशा कोंदल्या होत्या. जेथें साक्षात दैवत वैकुंठपती तेथील अपूर्वता काय वर्णन करावी?

श्यामकर्ण पुढें चालत असून, त्यांच्या मागें बकदालभ्य व महाजन जात होते. त्या सर्वांस पार्थानें क्षेमालिंगन दिलें धृतराष्ट्राचे चरण वंदून क्षेम दिलें. कुंती, गांधारी, देवकी, रोहिणी यांस पाहून राजे संतोष पावले. भीम, धृतराष्ट्र व विदुर यांस पार्थ राजे दाखवूं लागला.हा बाळपणापासून कृष्णभक्ती करणारा विषयापती चंद्रहास, यानें त्रिभुवनांत अद्भूत कीर्ति केली. तो प्रतापार्क वीरवर्मा यानें वीरांस काजव्याप्रमाणें मानलें. तसेंच ताम्रकेतु, मयुरध्वज, ममपुत्र बभ्रुवाहन, सुधन्वा, सुरथ यांचा पिता हंसध्वज, नीलध्वज, यौवनाश्व, अनुशाल्व, सैन्यपाळ, चंद्रकांत, भानुकांत अशीं राजांचीं नांवें घेऊन व त्यांचे पराक्रम

युद्धांस कथन केलें. नंतर सर्वांचीं क्षेमालिंगनें होऊन कुंतीस वंदन केलें. सर्वांच्या भेटी व वस्त्रें भूषणें दिल्यावर नगरप्रवेश केला. मग सर्वत्रांनीं धर्मदर्शन करितांच, धर्मानें यथायोग्य सन्मान केला. त्यानंतर दीक्षा घेतलेल्या धर्मानें द्रौपदीस योगसाधनास औषधी बीज भूमींत पेरलें. देवकी यशोदा व कुंती यांनीं कर्पूर चंदन शिंपीलें. पत्न्यांसह ऋषींनीं मंत्रघोष केला. असें शेत नांगरणें केल्यावर त्यास बकदाल्भ्य वशिष्ठादिकांनीं भूमिका साधून अष्टद्वारांचा मंडप उभारला त्यांत अष्टकुंडें बांधिलीं. यज्ञपात्रांची व समिधांची तयारी केल्यावर आचार्य वेदव्यास व ब्रह्मत्व बकदाल्भ्यास दिलें. वशिष्ठ वामदेव गौतम अत्री पराशर जमदग्नी कहोळ भरद्वाज भागुरी रैभ्य सुमंत सुतेज कौंडण्य जातुकर्ण्य गालव लोमेश सौभरी यांस ऋत्विज केलें. विश्वामित्र धौम्य पुलह उपमन्यु मधुच्छंद वायु भक्ष विभांडक व सुशिक्ष यांस द्वारपाळ स्थापिलें.

नंतर धर्मानें हातांत शृंग धारण केल्यावर वेदव्यास ह्मणाला—आतां चौसष्ठ दंपत्यांकडून अश्वस्नानार्थ गंगोदक आणवावें. नंतर अत्रिअनुसुया, वशिष्ठअरुंधती, कृष्णरुक्मिणी अर्जुनसुभद्रा, रतिप्रद्युम्न, उखाअनिरुद्ध सुकांतीभीमसेन, भद्रावती वृषकेतु, कुमुद्वती मयुरध्वज, सुनंदा नीलध्वज, यौवनाश्व प्रभावती, विषया चंद्रहास, धम्मिला अनुशाल्व इत्यादि चौसष्ठ दंपत्यें वस्त्रपल्लवास गांठी देऊन गंगेवर निघालीं. कृष्ण रुक्मिणीची पल्लवगांठ अरुंधतीनें बांधिली. तोंच कलहप्रिय नारद सत्यभामेकडे विनोद करण्यास गेला व भामेस ह्मणा-

ला-यज्ञस्थानीं कृष्णरुक्मिणीचा जोडा पल्लवगांठ देऊन कसा शोभत आहे ? त्या पट्टराणीस नारायण राजसन्मान देतो आणि इतर स्त्रिया व्यर्थच काय ? सर्वांदेखत जो मान तोच सन्मान ! एकांतीचा मान तृणासमान होय. असा सन्मान पाहून मी तुला सांगावयास आलों. सवतमान्यता ऐकून तूं निश्चल कशी बसलीस ! असें ऐकून भामा हांसून ह्मणाली-ज्यांस श्रेष्ठ मानावें तेही खोटें बोलतात ! चक्रपाणी झोंपी गेले आहेत. मुनी म्हणाला-मी खोटें बोललों नाहीं. प्रत्यक्ष पाहून आलों. मला झोंपलेले दाखीव पाहूं ? म्हणजे संशय फिटेल. त्या लीला विग्रहीनें शयन केलेलें पाहतांच, नारद ओशाळा होऊन देवास ह्मणाला-ही कांय करणी केली ! माझा विश्वास बुडविला ? आतां तुझ्या सर्व स्त्रिया मला लटका ह्मणतील.

मग तेथून जांबुवंतीच्या मंदिरांत जाऊन तिलाही तसेंच सांगितलें. तेथेंही श्रीकृष्ण निजलेला पाहतांच खोटेंपण पदरांत आलें. नंतर सोळासहस्र स्त्रियांचीं घरें फिरला तेथेंही श्रीकृष्ण होताच. असें पाहून गंगातिरीं गेला. तो रुक्मिणी सह पाणी भरीत आहे. तेथून यज्ञमंडपांत येतांच, सर्वांनीं आदरसत्कार करून उत्तम आसनीं बसविला. इकडे व्यासानें उदक मंत्रून कलशांत भरून सुपुष्पघट स्त्रियांनीं मस्तकावर घेतलें. तेव्हां अरुंधती रुक्मिणीस ह्मणाली-पुष्पभारानें तुझ्या मस्तकास भार होतो, ती तूं उदककलश घेऊन धर्ममंदिरीं कशी जाशील ? तें ऐकून रुक्मिणी हांसली. सुभद्रा बोलली ज्याच्या रोमरंध्रांत अनंत ब्रह्मांडें व देवादिक असतात ज्यानें

गोवर्धन नखाग्रीं सात दिवस धरिला त्याला रुक्मिणी हृदया-वर धरते तिला कलश कसा नेशील ह्मणून काय विचारतां ! हें सुभद्रेचें वचन ऐकतांच रुक्मिणी बोलली-माझा स्वामी ज्याला मनांत आवडतो त्यानें धरावा. तो स्त्री बाळ वृद्ध तरुण पशुपक्षी वृद्ध यांचे हृदयांत आराम पावतो. अशा त्या नृपअंगना भाषण करित गंगाजीवन घेऊन यज्ञस्थानीं येतांच द्रौपदीनें अश्वास पाजून उरलेल्या जळाचें स्नान घातलं. मग उभयतांनीं पूजन केलें पुढें अश्वहनन व हवन होईल.

# अध्याय १३ वा.

## अश्वहनन व अवभृतस्नानकथन.

धर्मानें अश्व पुजून मंत्रोक्त स्नान केल्यावर, कृष्ण भीमार्जुनादिक यज्ञकर्मास प्रवृत्त झाले. कृष्णानें मुनीचरण धुवून यथास्थानीं बसवून उच्छिष्टें काढावीं. अर्जुनानें ब्राह्मण-पूजन करावें. भीमानें इच्छित पुरवावें. गंधमाल्यानें विप्रांस वस्त्रें पुष्पमाळा व कर्पूर विडे अर्पावे. नकुळानें भोजन द्यावें, रुक्मिणी द्रौपदीनें अन्नें वाढावीं. धर्मानें रत्नें, जरीचीं वस्त्रें, धोत्रें, पात्रें, आसनें व सर्व प्रकारचीं दानें द्यावीं. अशी योजना होऊन धर्मानें यज्ञाजवळ अश्व आणितांच त्यास ऋषी ह्म-णाले-आतां यज्ञांत हवन करण्याचा तूं पशु हो. तुला स्वर्ग-लोक प्राप्त होईल. मग अश्वानें मान हालवून दोन्हीं ओंठाचें स्फुरण केलें. तें नकुळानें जाणून ह्मटलें-अश्व ह्मणतो कीं, जे यज्ञांत मरतात ते स्वर्गभुवन पावतात, परंतु जेथें यज्ञभोक्ता

श्रीकृष्ण, त्या यागाचा मी श्यामकर्ण स्वर्ग तुच्छ मानतों. मी कृष्णहृदयांबुजीं प्रवेश करीन. असें ऐकतांच ऋषींनीं जयजयकार केला. मग अश्व खांबास बांधल्यावर धौम्यानें कान पिळला. त्यांतून दुग्धधारा निघाल्या. मग भीमास ह्मणाला- आतां तीक्ष्ण शस्त्रानें शीरछेदन कर. नंतर भीमानें श्रीकृष्ण स्मरून अश्वमस्तक छेदतांच, शीर आकाशांत उडून सुखांतील तेज कृष्णमुखांत शिरलें व धडांतून दुधाच्या धारा लोटल्या. नंतर धडाची कापुराची रास झाली. ती पाहून ऋषि आश्चर्य पावून ह्मणाले-आजपर्यंत असा याग झालेला कधीं पाहिला व ऐकिला नाहीं. मग त्या कापराचीं अवदानें यज्ञांत टाकून यज्ञनारायणाची तृप्ति केली. व्यासानें सर्व देवांस अवदानें देऊन ह्मटलें-येथून पुढें कलियुगांत यज्ञ होणार नाहींत. यास्तव अवदानें घ्या. मग सर्व देव संतुष्ट झाले धर्मयागानें पृथ्वी तृप्त झाली.

नंतर कृष्ण धर्मास ह्मणाला-राजा ! आतां आह्मांसह वर्तमान यज्ञाचें शेवटचें स्नान कर. धर्मानें कृष्णचरण वंदून ह्मटलें-हे भक्तरक्षक भगवाना, हा सर्व तुझाच प्रसाद होय असें बोलून स्तवन केलें. मग धर्मानें कृष्णादि सर्व मंडळीसह अवभृतस्नान करून पुरोडाश भक्षण केला. व्यासानें राजास शेष प्रसाद वांटिला. कुंती सुनांसह आनंद पावली. व्यासपूजन बकदालभ्याचें पूजन व सर्व ऋषींचें पूजन वगैरे होऊन सर्वांस वस्त्रें भूषणें अश्व रथ गज सुवर्ण मौक्तिक भूमि, गाई आदिकरून अपार दानें नको नको ह्मणतपर्यंत दिलीं, धर्मानें

कृष्णाचें यथासांग पूजन करून किरीटकुंडलें अर्पून दिव्यजळ हातावर सोडून यज्ञाचें फळ अर्पण केलें व चरणावर मस्तक ठेविलें. नंतर राजाचें पूजन करून एकेकास हजार हत्ती, तीन हजार अश्व, पुरूषांचे अलंकार, कोटी सुवर्ण, रथ, पायदळ, रत्नें, वस्त्रें अर्पण केलीं. शतगुण संपत्ति यादवांस दिली.

मग अनुसूया, अरुंधती आणि ऋषिपत्न्या, देवकी, यशोदा रोहिणी, द्रौपदी, सोळाहजार कृष्णास्त्रिया, रुक्मिणी, राजपत्न्या वगैरे सर्व स्त्रियांस वस्त्रालंकारानीं गौरवून सौभाग्यद्रव्यें दिलीं. सेवकजनांस तृप्त केलें. त्यावर निजमातेचें पूजन, धृतराष्ट्र गांधारी भीमादिक बंधू यांचा गौरव केला. मग कृष्णाचें उत्तर पूजन करून झालेलें सुकृत कृष्णकरीं अर्पण केलें. वाद्यगजर व पुष्पवर्षाव होऊं लागला बंदिशाळा मुक्त करून, कृष्णदर्शनास आलेल्या जनांस इच्छित वस्तु दिल्या. हस्तनापुरांत दरिद्री कोणी राहिला नाहीं. अशा प्रकारें श्रीकृष्ण प्रसादानें अश्वमेध संपूर्ण होतांच, जगज्जीवन संतुष्ट होवो असें धर्म बोलला. या दिव्ययज्ञप्रकरणाचें जो पारायण करील, त्याचें भवबंधन तुटेल. ही सत्य सत्य त्रिवाचा होय. पुढें भोजनाख्यान कथन केलें आहे.

# अध्याय १४ वा.

## भोजनविधिकथन.

अर्जुनानें अश्वमेध संपादिला त्यांत द्रव्याचा खर्च केला, त्यामुळें पार्थ भूतलावर कुबेरासारखा शोभला. अशा त्या धर्म

यागांत अन्नाचे पर्वत निर्माण केले. त्यांचा सुवास सुटला. तूप, दहीं, दूध, मध, साखर यांच्या जशा काय नद्याच भरल्या होत्या. सावकाश भोजन करा हेंच बोलणें अहोरात्र चाललें होतें. जसा नक्षत्रांत चंद्र तसा धर्मराज शोभत होता. दरिद्री दुःखी कृपण क्षुधित रोगी कोणी नव्हता. धर्मयागांत सर्वांस सुख झालें. हृदयांतील गोत्रवधाचा पापरूपी चिखल नाहींसा झाला. कृष्णप्रसादानें कुंतीसुत यज्ञानंदानें डोलूं लागला. मग श्रीकृष्णआज्ञेनें पार्थानें प्रमळेशीं विवाह केला व आणखी आलेल्या कुमारिकांचे यादवांबरोबर विवाह केले बभ्रुवाहनाचा पार्थ धर्म भीमानें गौरव केला. नंतर जाऊं इच्छिणारे ऋषी कृष्णास ह्मणाले—आपल्या प्राप्तीकरितां आम्हीं अनुष्ठानें करितों पण प्रत्यक्ष दर्शनानें कृतार्थ झालों. आतां आमचें जन्ममरण चुकवून स्मरण असों द्यावें. कृष्ण म्हणाला—तुम्हीं देवांचें बंधन तोडतां त्या तुम्हांस संसारबंधनाची बाधा होणार नाहीं. तुम्हीं स्वधर्माचरण हरिस्मरण करून सर्वांभूतीं माझें स्वरूप पाहावें. मन जिंकून नियम पाळून, स्वरूपमंदिरांत जागून सद्भक्तसभेंत वागावें व भाविकांस पाहून कीर्तनांत रंगावें.

असें कृष्णवचन ऐकून ब्राह्मण तृप्त झाले. मग भूपतींनीं प्रार्थना केली कीं, आमचें मन तुमचे पायीं राहावें, असा वर द्यावा. देव ह्मणाला—तुह्मीं स्वधर्माचरण प्रजा विप्र पालन, माझें स्मरण व नित्य कथामृतपान करावें ह्मणजे तुमच्या जन्ममरणाचा अंत होईल. हें अमृतवचन ऐकतांच राजे समाधान पावून वंदन करते झाले. मग धर्मानें यज्ञांतीचें दिव्यान्न भोजन भीमाहातीं सर्वांस घातलें.

जन्मेजयानें इतकी कथा ऐकून भीमानें दिव्यान्न कसें घातलें तें जैमिनीस विचारतांच, मुनी ह्मणाला—त्या नवरत्नखचित कनकमय मंडपांत रत्नखचित आसनें मांडून सभोंवत्या दीपमाळा लावून रत्नजडित ताटें मांडिली प्रत्येक पात्राजवळ चौसष्ट वाट्या व एकेक जल भरलेला रत्नकमंडलु व रत्न दीप ठेविले. ती धर्मसभेची रचना पाहतांच नृपांचीं मनें हर्षित झालीं. तेथें श्रीकृष्ण सुगंध तिलक लावूं लागला; अर्जुनानें पुष्पमाळा सर्वांच्या गळ्यांत घातल्या; भीम कनकपात्रांतून भात तूप, खीर, वरण, पोळ्या, मान्बर, मांडे, अनारसे, फेण्या, गुरवळ्या, पुऱ्या, घाऱ्या, दूधसाखर, वडे, दहीं, चिंचरस, मीठ, मिरें, हिंग, खाज्या, करंज्या, सांडगे, पापड, अनेक जातीच्या भाज्या, कढी, फळें इत्यादि पक्वान्नें वाढून सर्व मंडळी जेवित असतां, एक अपूर्व कौतुक झालें असें—

जे अरण्यांत राहणार, ज्यांस दिव्यान्नें स्वप्नांत ठाऊक नाहीं, जे कंदमुळें खाणारे त्यांनीं पक्वान्नें पाहतांच ते भांबावून कोणतें अन्न भक्षण करावें अशा फिकीरींत पडले. कित्येक शंका मांडूं लागले, कोणी ध्यानस्थ बसले, वर्तुळ पदार्थांस चंद्रबिंब, फेणि-यांस पक्षी, मोदकांस घुबड, भातास कुंदपुष्पें व मालतीच्या कळ्या, वड्यास कंद रथचक्र असें ह्मणूं लागले. मग भीमानें भोजनाचा मार्ग दाखविला. कित्येकानीं दहीं दूध साखर तूप एकत्र केलें. भातावर द्राक्षारस घेतला ताकांत क्षीर घातली सालीं-सह आंबे खाऊं लागले. अशा प्रकारें भोजन करित असतां भीमानें अरण्यवाऱ्यांस व राजादि जनास तृप्त करून तांबूल विडे दिले.

नंतर घनदाट सभा भरून कृष्ण मध्यें बसले असतां, दोघे ब्राह्मण भांडत सभेंत येऊन धर्मास आमचा न्याय निवडा ह्मणून सांगूं लागले. धर्म ह्मणाला-येथें बकदालभ्य मुनी असतां न्याय निवडण्याचें संकट तें काय ? एक ह्मणाला-यानें मला शेत दिलें तें मी पिकवून खातों. त्यांत मी नांगरित असतां द्रव्य मिळालें, तें याला देत असतां तो घेत नाहीं. मी धान्य भक्षावें, त्या धनाला काय करूं ? तरी तो तें तूंच घे ह्मणून मला पीडा करितो. दुसरा ह्मणाला-याला मी शेत दान दिलें, त्यांत जें उत्पन्न होईल तें त्याचेंच. मी काय ह्मणून घेऊं ? या त्यांच्या भांडणाचें सर्वांस आश्चर्य वाटून राजादिकांनीं पुष्कळ समजाविलें पण ते ऐकेनात. मग कृष्ण ह्मणाला-तें द्रव्य येथेंच ठेऊन कालांतरानें तुह्मांस बोलावून वाद निवडूं. असें ऐकून ते राजाच्या घरीं द्रव्य ठेऊन निघून गेल्यावर धर्म कृष्णास ह्मणाला आतां वाद निवडला असता तर आह्मां सर्वांस कळला असता ! कृष्ण ह्मणाला-कालांतरावर टाकण्याचें कारण असें कीं, आतां पासून तीन महिन्यानीं कलियुग निघणार आहे. तेव्हां तु-लाच लोभ उत्पन्न होऊन तें भूमींतील द्रव्य राजाचें ह्मणून ठरविशील. विप्र कर्मभ्रष्ट होतील, श्रुतीस्मृतीचा लोप होऊन राजे प्रजा अधर्मी होतील; पाप निंदा द्वेष मत्सर वाढतील, व्यसनें, साधुनिंदा, प्रजापीडन होईल, वेदविक्रय पिता माता पुत्र यांत द्वेष, कन्याविक्रय, स्त्री प्रिय. भावांत भांडणें, स्त्रिया व्यभिचारिणी, भोगविक्रय व गर्भपात करतील.

वर्णावर्ण व्यभिचारांत भेद मानणार नाहींत, वेश्या कपटानें जन मोहितील, शूद्र धर्म सांगतील. ब्राह्मण नीचसेवा करून स्वधर्म सोडून पापानें पोटें भरतील. सर्वत्र वर्णसंस्कार व व्यभिचार होऊन अधर्माचा प्रसार होईल फाटकें वस्त्र मातेस, उत्तम बायकोस व जरीचें वेश्येस देऊन तिची सेवा करतील, अशा या दुस्तर युगधर्माचें वर्णन कोण करील ?

असो; अश्वमेध पूर्ण होतांच, धर्म सर्वांस ह्मणाला—अश्वमेध बरा झाला ना ? अर्जुनासारखें युद्ध कोणी केलें नाहीं असें ऐकतांच बकदाल्भ्य बोलला—राजा ! कृष्णचरण पाहून अहंकार धरूं नये. मग धर्मास अहंकार झाला असें कृष्णानें जाणून विदान केलें तें पुढें नकुलाख्यानात सांगितलें आहे.

# अध्याय ९५ वा.

## नकुलाख्यान—धर्मगर्वनिरसन.

यज्ञ समाप्त झाल्यावर उत्साह होऊन, धर्माच्या मनांत मी चराचर तृप्त केलें, असा अहंकार होतांच, कृष्णानें लाघव केलें. त्या सभेंत एका बिळांतून सुवर्णवर्णाचें मुंगूस निघून तें बोलूं लागलें—राजा ! तूं अभिमानानें यज्ञ केला ह्मणतोस, पण सक्तुप्रस्थ ( यवदान ) सारखा तुझा यज्ञ नव्हे. असें ऐकून मुनी राजे आश्चर्य पाऊन ह्मणाले—अरे तूं अकस्मात येथें यज्ञ निंदा करावयास कोठून आलास ? येथें वेदविद्येंत प्रवीण ब्राह्मणांनीं मंत्रविधीनें यथासांग यज्ञ करून, पितर, देवगण व इतर सर्वांस तृप्त केले. येथें विश्व-

रूप जगदात्माही बसलेला आहे. तरी यांत न्यून काय घडलें तें प्रगट कर.

नकुल हांसून ह्मणाले–काय मी खोटें बोललों ? तुह्मीं मनांत जाणतच असाल, मी गर्वानें बोललों नाहीं. तरी सक्तु प्रदान आख्यान सांगतों ऐका. एक कुरुक्षेत्रांतील धर्मात्मा ब्राह्मण शेतकीवर आपल्या कुटुंबाचें रक्षण करित असे. शेतांत पडलेल्या धान्याचे कण पक्ष्याप्रमाणें वेंचून त्यांचा संग्रह करून देह रक्षण करित होता. त्याचे पांच विभाग करून एक अतिथीस व चार कुटुंबासह भक्षण करी. पुढें दुष्काळ पडून धान्याचा कण मिळेनासा झाला; तरी कुटुंबांतील चारी माणसांनीं स्वधर्म नित्य नेमाचें आपलें सत्व सोडलें नव्हतें. त्यांचीं शरीरें कृश होऊन फक्त हाडें मात्र उरलीं होतीं. पुढें कांहीं काळानें देशांत सुकाळ होतांच, भिक्षा मागून त्यांनीं एक शेर यव मिळविलें. ते कांडून अन्न शिजवून अतिथीची वाट पहात बसलीं. तों अकस्मात् एक ब्राह्मण आला. त्याचें यथाशक्ती आदरातिथ्य करून अतिथीस विभाग अर्पण केला तो त्यानें खाल्ला पण अतृप्त राहिला. ह्मणून तो कुटुंबी ब्राह्मण चिंतेत पडला. मग त्यानें आपला भाग दिला. तरीही तृप्ति झाली नाहीं. त्याची कृश व उपोषणानें नेत्र गरगर फिरवित असलेली बायको पतीस ह्मणाली–माझा विभाग अतिथीस देऊन तृप्त करा म्हणजे मला आनंद होईल. तिचें भाषण ऐकून नवरा काय बोलला तें ऐका. जैमिनी सांगतात–कीटक, पतंग, मृगादिक प्राणी-

नाहीं. तूं वंशवृक्षाचें मूळ, कुळास पैलपारास नेऊन, नरका-र्णवांतून तारशील अशी पुत्रनौका आहेस. असें बापानें सांगितलें तरी त्यानें आपला भाग अतिथीस देवविला. तरी तो अतृप्त राहिला.

मग सुनेनें आपला भाग देण्यास सांगितला. तो भक्षण करून अतिथी संतोष पावला. त्या चौघांच्या मनांत तिळ-भरही क्रोध आला नाहीं. त्यांनीं तीन वर्षें कण वेंचले त्यांतील जरी एक शीत राहिलें तरी तीं आनंदित असत. नंतर अतिथी सुप्रसन्न होऊन ह्मणाला—तुझी परिक्षा पाहण्याकरितां मी आलों. तूं कुटुंबासह सक्तुप्रस्थाचे दानाचें ब्रह्मलोकीं गमन कर. देव. महर्षि व भूतळीचे जन या दानाचें वर्णन करतील. असें ऐकतांच धर्मास आश्चर्य वाटलें. मग यमधर्मानें ब्राह्मणरूपें त्यास दर्शन देऊन ह्मटलें तूं क्षुधा जिंकून चतुर्दश लोक आपलेसे केलेस हें तुझें धैर्य पाहून मी संतुष्ट झालों, तरी माझ्या आज्ञेनें स्वर्गांत अक्षयी राहा. असें सांगतांच विमान येऊन तो कुटुंबासह स्वर्गांत गेला. त्यावेळीं देवांनीं पुष्पवृष्टि केली.

ते सर्व गेल्यावर मी तेथें प्रगट होऊन सक्तुसंकल्पाचें पड-लेलें पाणी व पुष्पें पडलीं होतीं तेथें जाऊन लोळलो तो माझ्या पाठीचा भाग सुवर्णाचा झाला. नंतर मी सर्व भाग तसा व्हावा ह्मणून अनेक तीर्थाटणें केलीं पण कांहीं उपयोग झाला नाहीं. ह्मणून तुझा अश्वमेध ऐकून सुवर्णासारखा हो-ण्यास आलों व येथें लोळलों, सुवर्णाचलासही शरण गेलों,

परंतु तसाच राहिलों. ह्मणून सक्तुयज्ञासमान हा यज्ञ नव्हे असें बोललों. जो गर्वहीन तो सर्वांचें दुःख हरण करितो. अहंकाऱ्यास नारायण दूर होतो. असें सांगून नकुल निघून गेला. नकुलवचनानें धर्माच्या गर्वाचें खंडण झालें.

यास्तव अहंकारानें पुरुषार्थ जातो. नहुष इंद्रपदास गेला, तेथें गर्व होतांच द्विजशापानें सर्प होऊन पडला इंद्राची अभिमानानें संपत्ती नष्ट झाली. समुद्रानें अभिमान केला त्याला अगस्तीनें गिळला व मूत्रमार्गानें सोडतांच क्षार झाला. रावण वानरांहातीं मेला, बळीस पाताळांत घातला. ह्मणून जे अहंकार धरतात त्यांचें तपसत्व जाऊन यशबुद्धि शेवटीं पतन पावतात. अशा प्रकारें धर्माचा अहंकार देवानें निरसन केला. पुढें नकुल कोण होता तें सांगितलें आहे.

# अध्याय ९६ वा.

## नकुळउत्पत्तिकथन व ग्रंथसमाप्ति.

नंतर त्या मुंगुसाची कथा जैमिनी सांगूं लागला. परशुरामाचा पिता जमदग्नी यानें बापाच्या श्राद्धाकरितां कामधेनु आणून दुधाची भांडीं भरलीं. तो पूर्वी अति क्रोधी असून मग शांतत्व पावला होता. त्याचा भेद पाहण्याकरितां क्रोध पितृरूपानें येऊन तीं दुधाचीं भांडीं उपडी केलीं, तरी त्यांस क्रोध आला नाहीं. ज्याच्या हातात क्षमा शस्त्र त्याचें दुर्जन काय करणार ? तेव्हां तो मूर्तिमंत क्रोध-ऋषीस हात जोडून ह्मणाला—माझ्या अपराधाची क्षमा करावी.

भक्तींत निरंतर निमग्न राहून प्रजेचें पुत्राप्रमाणें पालन करूं लागले. देशांतील दुःख दरिद्र नाहींसें होऊन प्रजा आनंदानें काळक्रमण करूं लागली. हें अश्वमेध पर्व श्रवण केल्यानें सर्व पापें जळून जातात.

या अश्वमेधाची फलश्रुती अशी आहे कीं, श्रवणमात्रें पातकें दग्ध होऊन, एक हजार गाई दान दिल्याचें व ग्रहणांत सुवर्ण पृथ्वी दान दिल्याचें पुण्य लागतें. मयुरध्वज चंद्रहासादि पुण्यश्लोक राजांच्या कथा श्रवण केल्यानें जन्म मरण तुटतें. सर्व सिद्धी मंदिरीं राबतात, विद्यार्थ्यास विद्या, धनार्थ्यास धन, पुत्रार्थ्यास पुत्र प्राप्त होऊन मोक्ष मिळतो. याचें पुस्तक लिहून दान केल्यानें जितके अध्याय, श्लोक व अक्षर ओळी आहेत तितकीं वर्षें स्वर्गात राहील असें त्यांस वचन आहे. ब्राह्मणांस विद्या, क्षत्रियांस राज्यधन व शूद्र पालन होईल. अठरा पुराणांचें फल अश्वमेध श्रवणानें मिळतें. हें पर्व समाप्त झाल्यावर विधियुक्त चार तोळे सोन्याचा अश्व करून, त्याची पूजा करावी. मग पुराणिकाचें यथासांग पूजन करून तो अश्व दान करावा व दक्षिणा देऊन ग्रंथपूजन करावें, किंवा शक्तीप्रमाणें अश्व करून तो द्यावा, वाचकाचें पूजन करून त्याच्या श्रमाप्रमाणें त्यास द्रव्य द्यावें. द्रव्य असून जो खर्चकरणारनाहीं त्यास विष्णु दुर झाला असें जाणावें.यथाशक्ति अन्न देऊन कृष्णाप्रीत्यर्थ विप्रसंतर्पणकरावें.

ही कथा जैमिनीनें जन्मेजयास व सूतांनीं शौनकादिकांस कथन केली. श्रीधर ह्मणतो—जैमिनीवाक्यावरून देश

मापंत ही कथा ब्रह्मानंदानें माझ्या मुखानें वदविली. विभ्रशी दुंदुभी सैन्यपाळ यांच्या कथा हें व्यासाचें वाक्य आहे. संतांनीं मला अभय देऊन जन्ममरण निवारावें व अक्षय पदीं स्थापावें हें मला वरदान द्यावें, असें बोलून श्रीधरानें चरणावर मस्तक ठेविलें. माझा पिता ब्रह्मानंद, माता सावित्री यांस नमन करून हा ग्रंथ संपविला. शेषशाई नारायणाचा शिष्य ब्रह्मदेव, त्याचा अत्री, त्याचा दत्तात्रय, त्याचा सदानंद, त्याचा रामानंद, त्यानें वाराणशीस समाधी घेतली. तेथून विमलानंद, गंभीरानंद, ब्रह्मानंद, सहजानंद त्याचें वास्तव्य कल्याणास होतें. तेथून पूर्णानंद त्याचा दत्तानंद त्याची नाझरे गांवीं समाधि होती, तो आमचा आजा, त्याचा पुत्र ब्राह्मानंद तोच माझा गुरू व पिता होय. त्याची समाधि पंढरीस आहे, त्याचे चरणीं नमस्कार असो. शके सोळाशें सदतीस दुर्मुख नाम संवत्सर पौषमास शुक्लपक्ष सप्तमी सोमवारीं ग्रंथ समाप्त केला, तो पांडुरंग चरणीं अर्पण केला. असो. या ग्रंथाच्या श्रवणानें सर्वांच कल्याण होऊन संतती संपत्ती विद्या धन सौख्य निरंतर प्राप्त होईल.

समाप्त.

---

मुद्रक व प्रकाशक-पंढरिनाथ विनायक पाठक, जगदीश्वर प्रेस गिरगांव